ही 'श्री' ची इच्छा
आत्मकथा

लेखक : डॉ. श्री ठाणेदार
shrithanedar@gmail.com
marathiusa@gmail.com

2479 WoodView Lane
Ann Arbor , Michigan
48108 USA
www.shrithanedar.com
www.thanedar.com

शब्दांकन : शोभा बोंद्रे

Paperbook Publisher: Avomeen Publications
2479 WoodView Lane
Ann Arbor , Michigan
48108 USA

मूळ मुखपृष्ठ : कैलास वेर्णेकर

ई बुक मुखपृष्ठ : Last Bench Designs

©ShriThanedar2014

या पुस्तकातील लेखनाचे सर्व हक्क डॉ. श्रीनिवास ठाणेदार यांचेकडे सुरक्षित असून पुस्तकाचे किंवा त्यातील अंशाचे पुनर्मुद्रण, आवृत्ती, भाषांतर, डिजीट्ल, टिव्ही वा नाट्य, चित्रपट किंवा इतर रुपांतर करण्याचे अधिकार डॉ. श्रीनिवास ठाणेदार यांच्याकडे आहेत.
डॉ ठाणेदार यांची लेखी परवानगी घेतल्याशिवाय या पुस्तकातील कोणतेही भाग कोणत्याही माध्यमातून प्रकाशित करू नयेत. तसे केल्यास कायदेशीर कारवाई होऊ शकते.

पहिली आवृत्ती : 2005
दुसरी आवृत्ती : 2005
तिसरी आवृत्ती : 2005
चौथी आवृत्ती : 2005
पाचवी आवृत्ती : 2005
सहावीआवृत्ती : 2005
सातवी आवृत्ती : 2005
आठवी आवृत्ती : 2005
नववी आवृत्ती : 2006
१० वी आवृत्ती : 2006
११ वी आवृत्ती : 2007
१२ वी आवृत्ती : 2007
१३ वी आवृत्ती : 2008
१४ वी आवृत्ती : 2008
१५ वी आवृत्ती : 2008
१६ वी आवृत्ती : 2008
१७ वी आवृत्ती : 2008
१८ वी आवृत्ती : 2008
१९ वी आवृत्ती : 2008
२० वी आवृत्ती : 2008
२१ वी आवृत्ती : 2008
२२ वी आवृत्ती : 2008
२३ वी आवृत्ती : 2009
२४ वी आवृत्ती : 2009
२५ वी आवृत्ती : 2009
२६ वी आवृत्ती : 2009
२७ वी आवृत्ती : 2009
२८ वी आवृत्ती : 2009
२९ वी आवृत्ती : 2009
३० वी आवृत्ती : 2010
३१ वी आवृत्ती : 2010
३२ वी आवृत्ती : 2010
३३ वी आवृत्ती : 2010
३४ वी आवृत्ती : 2010
३५ वी आवृत्ती : 2010
३६ वी आवृत्ती : 2010
३७ वी आवृत्ती : 2011
३८ वी आवृत्ती : 2011
३९ वी आवृत्ती : 2012
४० वी आवृत्ती : 2012

ई-प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान
G1102, Eternity, Teen Hath Naka, Thane
www.esahity.com
esahity@gmail.com

निर्मिती सहाय्य : तनुजा इनामदार

- हे ई पुस्तक विनामूल्य वितरणासाठी उपलब्ध आहे.
- आपले वाचून झाल्यावर आपण हे फ़ॉरवर्ड करू शकता.
- हे ई पुस्तक वेबसाईटवर ठेवण्यापुर्वी किंवा वाचनाव्यतिरिक्त कोणताही वापर करण्यापुर्वी ई-साहित्य प्रतिष्ठानची परवानगी घेणे आवश्यक आहे.



माझ्या आयुष्यातल्या

दोन सर्वाधिक महत्त्वाच्या स्त्रिया...

इन्नी... माझी आई... जिनं मला घडवलं.

शशी... जिनं माझं घर सावरलं.

ह्या दोघींना हे आत्मकथन

कृतज्ञतापूर्वक अर्पण

---श्री

# ई साहित्य प्रतिष्ठान

खेळांचे कितीतरी प्रकार असतात. त्यातला एक आहे पहाड किंवा कातळांशी झुंज देणं. रॉक क्लायंबिंग, माउंटेनिअरिंग, पर्वतारोहण, प्रस्तरारोहण. दयामाया नसलेला खेळ. पाय घसरला, अंदाज चुकला की मरण किंवा अपंगत्व. खरा धाडसी खेळ.

अखिल भारतात या खॆळात महाराष्ट्र पुढे आहे. इतका की जवळपास साठ टक्के पदकं मराठी माणसांच्या खिशात असतात. जिवाची तमा न बाळगता, छातीतली धडधड वाढवत नेत, राकट काळजाची ही रॉकिंग पोरं सह्याद्री किंवा हिमालयाच्या दऱ्याखोऱ्यांतून बिनधास्त भटकंती करत असतात. यातून अनुभवाला येणारा थरार हेच यांचं साध्य. आणि प्रत्येक पावलावर डोळ्यांना डोळे भिडवणारा मृत्यु हाच त्यांचा प्रतिस्पर्धी. शिवबाच्या सह्याद्रीला आपल्या या बेडर मुलामुलींचा अभिमान आहेच. पण...

पण हीच तरुणाई जेव्हा जमिनीवर येते तेव्हा मात्र सुखासीन नोकरीच्या उबदार कोशात स्वतःला गुरफ़टवू पहाते. त्यात कसलीही रिस्क नको. कसलाही थरार नको. सगळं धाडस गुंडाळून ठेवायचं. बॉस सांगेल ते करायचं. महिन्याच्या अखेर एक ठराविक रक्कम घेऊन महिना काढायचा. कसलीही चॅलेंज नको. कुठे उंची, खाचखळगे नको. कुठे पाय घसरायला नको. धंदा केलाच तरी तो एखादा बारीकसा ज्यात फ़ार तोटा नाही आणि मोठा फ़ायदा होऊन मोठी उंची गाठायचं स्वप्न नाही. शाळेत असल्यापासून अगदी असंच. मुंबईत येऊन बाहेरचे लोक अब्जपती झाले. आणि त्यांना धनी करण्यात आमच्या मुलांनी स्वतःला धन्य मानलं. का? मराठी माणसाच्या रक्तात धंदा करणं नाहीच का?

आज आम्ही आपल्यासमोर एका मराठी माणसाची आत्मकथा पेश करत आहोत. बेळगावी एका डेंटिस्टकडे साफ़सुफ़ीसकट सगळी वरकामं करणारा हा निम्न-मध्यमवर्गीय मुलगा अमेरिकेतला एक बडा बिझनेसमन म्हणून कसा नावारुपाला आला त्याची कथा. आत्मकथा. समस्त गुजराथी-पंजाबी-मारवाडी बिझनेसमनना मागे टाकून अमेरिकेत मराठी व्यावसायिकतेचा झेंडा उभारणारा हा मुलगा, त्याचं वैयक्तिक जीवन, त्याच्या आयुष्यातील संकटं, थरार आणि आनंदाचे, विजयाचे क्षण यांचं एक सुंदर चित्रण. एखाद्या हॉलिवूड सिनेमात शोभेल अशी कथा.

२०१५ या वर्षात ई साहित्य प्रतिष्ठानतर्फ़े मराठी मुलांना व्यवसायासाठी प्रेरणा देणारी पुस्तकं देण्याचे आणि मार्गदर्शक ठरतील असे कार्यक्रम करण्याचे योजतो आहोत. धंदा किंवा व्यवसाय म्हणजे फ़क्त पैसे कमावणं नव्हे. ती एक नवनिर्मितीच आहे. स्वतःबरोबर असंख्य लोकांचं कल्याण करण्याची एक संधी म्हणून व्यवसायाकडे पहा. अनेक कुटुंबांना पोसण्याची एक संधी म्हणून पहा. एक धुंदी चढवणारा खेळ म्हणून पहा. एका नव्या देशाची उभारणी करण्याची संधी म्हणून पहा. आपल्या कस्टमर्सची, समाजाची सेवा करण्याची, त्यांना उत्तम प्रतीची सेवा, नाविन्यपूर्ण वस्तू उपलब्ध करून देण्याची संधी म्हणून पहा. नवीन जग उभारणीतील आपला वाटा, आपला ठसा उमटवण्याची एक संधी म्हणून पहा.

जास्तीत जास्त तरुण मुलांना आणि विद्यार्थ्यांना या कार्यक्रमांत सहभागी करण्याचा आमचा मानस आहे. आपल्या आसपासच्या तरुण विद्यार्थ्यांना आमच्या या कार्यक्रमांची माहिती देऊन, व त्यांना ई साहित्य प्रतिष्ठानचे सभासद करून आपणही या मोहिमेत सामिल व्हावे. मराठी मुलांनी यशस्वी उद्योजकांची चरित्रं वाचावीत. वाचावीतच. पण तिथेच न थांबता स्वतःचं आयुष्य यशस्वी घडवून स्वतःची आत्मचरित्रं लिहावीत. नुसतं 'जय महाराष्ट्र' म्हणून घोषणा दिल्याने महाराष्ट्राचा जय होत नाही. त्यासाठी स्वतःपासून, स्वतःचा जयघोष करण्यापासून सुरुवात करावी लागते. महाराष्ट्राची आणि मराठी माणसांची प्रतिमा बदलायला लागू. त्याची सुरुवात आज "ही श्रीची इच्छा" या पुस्तकापासून करीत आहोत. मराठी माणसाच्या हृदयाजवळचा हा मंत्र आहे. नेमकं त्याच नावाचं पुस्तक तुमच्या हाती देताना आज आम्हाला अभिमान वाटतो आहे.

"ही 'श्री'ची इच्छा" या बेस्टसेलरची ई आवृत्ती प्रसारित करण्यासाठी आणि ती विनामूल्य देण्यासाठी डॉ. श्री ठाणेदार यांनी ई साहित्य प्रतिष्ठानची निवड केली याबद्दल त्यांचे आम्ही कायमचे ऋणी आहोत. त्यांच्या पुढील वाटचालीसाठी त्यांना ई साहित्यच्या लक्षावधी वाचकांच्या वतीने आम्ही शुभेच्छा देतो.

आपले विश्वासू

टीम ई साहित्य प्रतिष्ठान

# इच्छा असेल तर !

अमेरिकेतल्या लहान-थोरांचा आवडता कवी शेल सिल्व्हरस्टीन म्हणतो,

Listen to the MUSTN'TS, child,
Listen to the DON'TS
Listen to the SHOULD'NTS
The IMPOSSIBLES, the WON'TS
Listen to the NEVER HAVES

Then listen close to me_
Anything can happen, child,
ANYTHING can be.

लहानपणापासून अशीच एक प्रखर इच्छाशक्ती मनाशी बाळगून, मी पुढे जात राहिलो.

मॅट्रिकला मला फ़क्त पंचावन्न टक्के मार्क्स होते. पण जेव्हा कळलं की आयुष्यात काहीतरी चांगलं करून दाखवायचं असेल, तर आधी परिक्षेत चांगले मार्क्स मिळवायला हवेत, तेव्हा मी इच्छेला प्रयत्नांची जोड दिली. बी.एस्सी आणि एम. एस्सीला फ़र्स्टक्लास मिळाला आणि माझ्यावर हुशार विद्यार्थी असा अधिकृत शिक्का मारला गेला. आहे की नाही

गंमत? ह्यानंतर अमेरिकेत केमिस्ट्रीमधली डॉक्टरेट आणि बिझनेस अॅडमिनिस्ट्रेशनमधील MBA ह्या पदव्याही सहजपणे नाही, पण ठरवून, परिश्रम करून मिळवल्या.

अमेरिकेत स्वतःचा व्यवसाय सुरू केला, तोही लोकांच्या किंवा कंपन्यांच्या रासायनिक समस्या सोडविण्याचा. म्हणजे इथेही 'कुठलीही कठीण समस्या असू दे, मी ती सोडवून दाखवीनच', ही प्रबळ इच्छाच उपयोगी पडली.

नशिबाचं सर्वच दान मनासारखं पडलं नाही. टोकाचं अपयश, टोकाची निराशा, टोकाची हार पत्करावी लागली. पण ती केवळ एक तात्पुरती गोष्ट. इच्छेच्या जोरावर मी परत परत प्रतिकूल परिस्थितीवर मात केली. म्हणूनच माझी गोष्ट लिहावीशी वाटली;

ही 'श्री' ची इच्छा!

--डॉ. श्री ठाणेदार



. 1..

गुरुवार, सतरा ऑक्टोबर १९९६. इन्नी (माझी आई) आणि रवी (माझा धाकटा भाऊ) भारतातून आले होते. मी सुट्टी घेतली होती. आमचं अमेरिकेतलं गाव सेंट लुईस आणि आसपासच्या भागात, 'रवीला कुठे फिरायला न्यावं' असा विचार करीत होतो. असं ठरलं, की ' सुमारे तास दीड तास अंतरावर असलेल्या मेरॅमॅक केव्हज बघायला जाऊ. नील आणि समीरला शाळेतून थोडंसं लवकर पिकअप करून त्यानाही बरोबर नेऊ. '

मी श्यामलला (डॉक्टर श्यामल माझी बायको) विचारलं, " काय गं, तू येणार आहेस का? "

श्यामल हॉस्पिटलमध्ये जाण्याच्या गडबडीत होती. ती म्हणाली, "नाही. आज मला हॉस्पिटलमध्ये खूप काम आहे. तुम्ही जाऊन या. "

घराबाहेर पडण्याआधी तिनं नेहमीप्रमाणेच भराभर काही सूचना दिल्या.

" श्री, समीरचं आज स्विमिंग आहे. लक्षात आहे ना? त्याचा कॉस्च्युम घ्यायला विसरू नको. " वगैरे वगैरे.

शाळा सुटण्याच्या नेहमीच्या वेळेआधी एक तास मी मुलांना शाळेतून पिकअप केलं आणि आम्ही मेरॅमॅक केव्हज पाहायला गेलो. रवी, मी आणि मुलं. ह्या गुहेत, जमिनीच्या पोटात सुमारे शंभर फुट खोल, कॅल्शियमची नैसर्गिक शिल्पं पाहायला मिळतात. स्टॅलॅगमाइट्स आणि स्टॅलॅकटाइट्स! काही गुहेच्या जमिनीतून वर उगवलेली, तर काही गुहेच्या छतातून नक्षीदार खांब खाली यावेत, तशी! निसर्गाच्या अप्रतिम कलाकारीची साक्ष इथे मिळते.

केव्हजमधून आम्ही बाहेर पडलो, तेव्हा संध्याकाळचे सहा वाजले होते. मुलांना गाडीत बसवलं. मी आणि रवी गाडीत बसत होतो, एवढ्यात माझा सेल फोन वाजला. बिझनेस चालवत असल्यामुळे सतत सेल फोन बाळगण्याची सवय आणि सतत फोन वाजत राहणार, हेही ठरलेलं. ' केव्हजमध्ये असताना फोन वाजू शकत नाही, हे नशीब!' असं म्हणत मी फोन कानाला लावला.

" हॅलो, मिस्टर ठाणेदार? मी सेंट जॉन मेडिकल हॉस्पिटल मधून बोलतो आहे. कुठे होतात तुम्ही? मी एक तास तुम्हाला फोन करण्याचा प्रयत्न करतो आहे. "

" सॉरी. आम्ही मेरॅमॅक केव्हजमध्ये होतो म्हणून... ”

माझं वाक्य अर्धवट तोडून पलीकडचा माणूस म्हणाला, " तुमच्या बायकोला इथे ॲडमिट केलेलं आहे. शी इज सिरियस. "

माझ्या पायाखालची जमीन निसटली. कसाबसा मी गाडीत बसलो. आवाज घशातच अडकल्यासारखा झाला होता. एक आवंढा गिळून, प्रयत्न करून माझ्या तोंडातून शब्द बाहेर पडले,

" काय झालं? नक्की काय झालं? सकाळी तर ती ठीक होती. "

"तुमची बायको गाडीतून पडली. ती सिरियस आहे. तुम्ही ताबडतोब इथे निघून या."

फोन बंद झाला आणि माझ्या हातातून गळून पडला.

मी आत्ता ऐकलं, ते खरं की खोटं? खरंच असं झालंय का? पण का? असं कसं झालं?

डोक्यात प्रश्नांची इतकी गर्दी दाटून आली की मला काही सुचेना. एकदा वाटलं, गाडीबाहेर पडून मोठ्यानं ओरडावं. भोकांड पसरून रडावं. पण मी मुठी वळून ओठ घट्ट आवळून समोरच्या काचेतून पाहत राहिलो. शून्यात नजर लावावी तसा. रवी घाबरला. तो मला काहीतरी विचारायला लागला. माझं लक्ष नव्हतं. मला काही कळत नव्हतं. बेभान असे काहीच क्षण.

मग मात्र मी स्वतःला सावरलं. सावरणं भागच होतं. आत्ता माझं पहिलं कर्तव्य होतं, लवकरात लवकर हॉस्पिटलमध्ये पोचणं. थरथरत्या हातांनी मी गाडी सुरु केली.

दिवसभर हवामान ठीकठाक होतं. गाडी हाय वे वर आली. तोपर्यंत अचानक अंधारून आलं आणि पाऊस पडायला लागला. साधासुधा पाऊस नव्हे. तर वादळ सुटल्यावर अंगात आल्यासारखा कोसळतो तसा, तुफानी, धो धो! परत फोन वाजला. एक हाताने स्टीअरिंग व्हीलवर ताबा ठेवत, मी दुसऱ्या हातानं फोन कानाला लावला. सेंट जॉन मेडिकल हॉस्पिटल मधले डॉक्टर बोलत होते.

" मिस्टर ठाणेदार, कुठे आहात तुम्ही? "

" हायवेवर! गाडी चालवतो आहे. "

"तुम्ही लवकरात लवकर या. मला तुमच्याशी काही बोलायचं आहे. "

माझा धीर सुटत चालला.

" काय बोलायचं आहे? आत्ताच बोला. "

" तुमच्या बायकोला काही प्रॉब्लेम होतं का? तिला बरं नव्हतं का? "

" नाही. बरी होती. पण का? कशासाठी विचारता आहात? नक्की काय झालं आहे?"

"तुमची बायको हॉस्पिटलमधून निघाली, गाडी चालवीत तुमच्या घराजवळ पोचली, पण घराच्या रस्त्यावर वळण्याआधीच तिनं गाडी थांबवली. ती धडपडत गाडीच्या बाहेर आली आणि खाली पडली. रस्त्यावर खेळणाऱ्या मुलांनी तिला पाहिलं. ॲम्ब्युलंस बोलावली आणि तिला इथे आणलं. तिची कंडीशन खूप वाईट आहे. तुम्ही लवकर या. "

कोसळणाऱ्या पावसात मी अंदाजाने गाडी चालवतो आहे, एका बाजूला डॉक्टरांचं बोलणं ऐकतो आहे, त्यांना मोघम उत्तर देतो आहे आणि विचार करतो आहे.

" आता मुलांचं काय? चार वर्षाचा समीर आणि आठ वर्षाचा नील, ह्यांना त्यांच्या आईबद्दल मी आत्ता सांगू की नको? आणि काय सांगू? "

रवी माझ्याकडे पाहत होता. मुलं बिचारी कानकोंडी होऊन चूप बसली होती. आम्ही कोणीच एकमेकांशी चकार शब्द बोललो नाही. तरीही वातावरणातला चमत्कारिक ताण सर्वांना जाणवत होता.

शेवटी मी ठरवलं, ' मुलांना आधी घरी सोडावं आणि तसंच उलट्या पावली हॉस्पिटलमध्ये जावं.

गावातली आमची एक फ़ॅमिली फ्रेंड कल्पना हिला मी फोन केला.

" कल्पना, तू आत्ता थोडा वेळ, प्लीज आमच्या घरी जाऊन थांबशील? घरी इन्नी एकटी आहे आणि मी मुलांना घरी सोडतो आहे. ”

माझ्या आवाजावरून कल्पनाच्या लक्षात आलं असणार की 'काहीतरी प्रॉब्लेम आहे'. पण माझ्या सुदैवानं कुठलेही प्रश्न न विचारता ती पटकन 'हो' म्हणाली.

मुलांना मी घरी सोडलं. कल्पना आणि इन्नी दारात उभ्या होत्या. मुलं धावत जाऊन इन्नीला बिलगली. मला भडभडून आलं. रवीला मी खुणेनेच सांगितलं, 'तू चल माझ्याबरोबर हॉस्पिटलमध्ये. '

आम्ही हॉस्पिटलला पोचण्याआधीच परत एकदा माझा फोन वाजला. हॉस्पिटलमधल्या चॅपेलचे मुख्य, फादर अॅग्नेल ह्यांचा फोन होता.

" मिस्टर ठाणेदार..... "

मी घाईघाईनं म्हणालो, “मी पाच मिनिटात तिथे पोचतो आहे. "

फादर अॅग्नेल म्हणाले. "या, पण तुमच्या बायकोबद्दल तुम्हाला कोणाला कळवायचं असेल, तर कळवा. शी इज नो मोअर. "

मी आता बोलण्याच्याच नव्हे, तर ऐकण्याच्याही परिस्थितीत नाही. नुसता सुन्न!

मी आणि रवी हॉस्पिटलमध्ये पोचलो. धावत आत गेलो. डॉक्टर मान हलवीत म्हणाले, "आता पंधरा मिनिटांपूर्वीच तिने शेवटचा श्वास घेतला. "

मी श्यामलच्या जवळ गेलो. तिच्या चेहऱ्यावरून हात फिरवला. तिचं अंग अजून गरम होतं.

डॉक्टर म्हणाले, म्हणूनच केवळ 'ती गेली' हे खरं मानायचं. मला हुंदके अनावर झाले.

" पण काय झालं डॉक्टर? हे असं कसं झालं? "

" तिनं ॲन्टिडिप्रेसंट गोळ्यांचा ओव्हर डोस घेतला होता. त्याची रिॲक्शन आली. तेव्हा ती गाडीतून बाहेर आली आणि बेशुद्ध होऊन पडली. आम्ही प्रयत्नांची पराकाष्ठा केली, पण... आय ॲम सॉरी!"

डॉक्टर बोलत होते, त्यांचे प्रश्न माझ्या कानावर पडत होते.

“तिला काही मानसिक त्रास होता का? तिला नैराश्याचे झटके यायचे का? ती ह्या गोळ्या घेते हे तुम्हाला ठाऊक होतं का? "

मी मान हलवीत होतो आणि श्यामलच्या चेहऱ्याकडे पाहत होतो. तिचा चेहरा शांत होता. श्यामल! माझी बायको! आमच्या दोन सोन्यासारख्या मुलांची आई! एक यशस्वी नुरोलॉजिस्ट डॉक्टर! मी एक यशस्वी बिझनेसमॅन!



महिना दीड महिनाही झाला नसेल त्या गोष्टीला! नीलची मुंज आम्ही खूप थाटामाटात साजरी केली होती. एका सुंदर संध्याकाळी मी श्यामलला म्हटलं, "आपलं सर्व किती छान चाललं आहे, नाही श्यामल?" आनंद किवा दुःख मोकळेपणी व्यक्त करण्याचा तीचा स्वभाव नव्हता. ती किंचित हसली फक्त.

आणि आज हे असं?

अचानक मला मुलांची आठवण आली. श्यामलसाठी मी आता काही करू शकत नव्हतो, पण आता मुलांना माझी गरज होती. त्यांना त्यांच्या आईबद्दल सांगण्याचं कठीण

काम मला करायचं होतं. मुख्य म्हणजे त्यानंतर त्यांना सावरायचा होतं. जडशीळ हृदयाने मी तिथून उठलो. रवीला म्हणालो,

" घरी जाऊ या. मुलं आपली वाट पाहत असतील. "

आजचा दिवस सुरु झाला तेव्हा वाटलं नव्हतं की ही एक न संपणाऱ्या काळरात्रीची सुरुवात आहे. हे वर्ष होतं १९९६.

कॅलिडोस्कोप किंचित हलतो, आणि एखादं नवं नाटक असावं, तसं एक वेगळंच दृश्य दिसायला लागतं. गंमत म्हणजे इथेही ह्या दृश्याची सुरुवात होते, ती सेल फोनच्या आवाजानं. २००३ साल. जुलै महिन्यातला एक दिवस. जमैका बेटाजवळच्या समुद्रात विहार करणारी ही एक अलिशान अशी बोट आहे. डेकवरच्या एका खुर्चीत मी आराम करतो आहे. अचानक माझा सेल फोन वाजतो.

' ऑफिसचा फोन असणार, ' असं म्हणत मी फोन कानाला लावला. तर पलीकडून एक अदबशीर भारतीय आवाज. "हेल्लो.. मिस्टर श्री ठाणेदार? नमस्कार आणि अभिनंदन. "

किंचित गोंधळून मी म्हणालो,

" नमस्कार! पण अभिनंदन कशासाठी? "

" मी दिल्लीहून बोलतो आहे. 'आऊटस्टॅंडिंग ओव्हरसीज ऑंत्रप्रिनर" म्हणून भारत सरकारतर्फे आपली निवड झाली आहे. आम्ही आपल्याला पत्र पाठवलं होतं. त्याचं उत्तर आलं नाही. शेवटी आपला हा फोन नंबर मिळाला. म्हणून फोन केला. वॉशिंग्टन डीसीमध्ये माजी पंतप्रधान श्री नरसिंह राव यांच्या हस्ते आपला सत्कार केला जाईल. आपण त्या समारंभाला उपस्थित राहणार आहात ना?

मी म्हटलं, "मी आपल्याला कळवतो, पण आपल्या ह्या ॲवार्डबद्दलची थोडी माहिती आपण मला पाठवू शकाल का? "

" अवश्य. आपण कुठे आहात? "

मी म्हटलं, "गेला महिनाभर मी कुटुंबासोबत सुट्टी एन्जॉय करतो आहे. म्हणूनच आपलं पत्र मला मिळालं नाही. सध्या मी जमैका बेटाजवळच्या ह्या बोटीवरून सफर करतो आहे. बोटीचा फ़ॅक्स  नंबर मी आपल्याला देतो. आपण मला फ़ॅक्स करून सर्व माहिती पाठवा.

हा फोन झाला, तेव्हा क्षणभर मी विचारात पडलो. मला वाटलं, कोणीतरी आपली चेष्टा करत आहे. परत म्हटलं, 'बघू या, खात्री करून घेऊ या. '

मी कॅलिफ़ोर्नियात माझ्या एका मित्राला फोन केला. त्याला इकडची तिकडची बरीच माहिती असते. फोनवरचं संभाषण मी मित्राला सांगितलं, तेव्हा तो उत्साहात म्हणाला, "कॉंग्रॅच्युलेशन्स! हे ॲवार्ड खूप प्रेस्टीजियस आहे. तुला मिळत आहे, तर अवश्य घे."

थोड्या वेळानं फ़ॅक्स वरून ह्या ॲवार्डची सर्व माहिती आली आणि माझ्यासाठी खास निमंत्रणही आलं.

वॉशिंग्टन डीसीमधल्या हायात ह्या पंचतारांकित हॉटेलमध्ये हा सोहळा पार पडणार होता. मी माझी संमती कळवून टाकली.

ह्या नंतरचा दुसराच दिवस. बोटीवर मी, समीर, नील आणि शशी, माझी दुसरी बायको, आम्ही सर्व काहीतरी मजा करत होतो. परत एकदा फोन वाजला. मी फोन उचलला. ह्यावेळी एका अमेरिकन माणसाचा आवाज,

" मिस्टर ठाणेदार? हाय! मी 'इंडिया - अमेरिका फ्रेन्डशिप कौन्सिल" ह्या संस्थेतर्फे बोलतो आहे. 'एस्टीम्ड आन्त्रप्रिनर' म्हणून आम्ही आपली  निवड केली आहे. व्हाईट हाउसमध्ये होणाऱ्या एका बिझनेस कॉन्फरंसच्या वेळी आपल्याला हे ॲवार्ड मिळेल. आपण हे ॲवार्ड स्वीकारणार आहात ना? "

आता मात्र मी अवाक झालो. हा एक विलक्षण असा योगायोग आहे, की कोणीतरी मला जुलैमध्ये 'एप्रिल फुल' बनवतो आहे?

दोन दिवस लागोपाठ दोन ॲवार्ड्स? दोन्ही समारंभ वॉशिंग्टन डीसीमध्ये? आणि समारंभाचे दिवसही, आज आणि उद्या, असे लागोपाठ? काय चाललंय काय?

" काय चाललंय काय, श्री? " शशीनं मला हलवलं. हातातल्या फोनकडे पाहत मी नुसताच विचारात हरवल्यासारखा उभा होतो. भानावर येत मी फोन परत कानाला लावला. पलीकडचा माणूस माझ्या उत्तराची वाट पाहत होता. त्याला मी "येस, मी हे ॲवार्ड स्वीकारीन. " असं सांगून टाकलं. माझे आभार मानत तो पुढे म्हणाला,

" आम्हाला तुमची आणि तुमच्याबरोबर समारंभाला हजर राहणाऱ्या सर्वांची माहिती लागेल सर! व्हाईट हाउसच्या सिक्यूरिटीचा एक भाग म्हणून!"

मी होकार दिला. त्यालाही बोटीवरच्या फ़ॅक्सचा नंबर दिला आणि मग माझ्याकडे उत्सुकतेने पाहणाऱ्या शशी, नील आणि समीरला ही बातमी सांगितली. क्षणभर तेही माझ्यासारखेच आश्चर्याने अवाक् झाले. माझ्याकडे पाहत राहिले. मग मात्र तिघांनी आनंदाने जल्लोष केला.

जल्लोष ओसरला आणि आम्ही उत्साहाने वॉशिंग्टन डीसीतल्या समारंभाचे बेत ठरवायला लागलो. समीरनं हळूच विचारलं,

" डॅड, ॲवार्ड घ्यायला तू एकटाच जाणार? "

मी हसलो, " मी एकटाच गेलो तर चालेल तुला? "

त्यानं जोरात मान हलवली.

मी म्हणालो, "आपण सर्वांनी जायचं. अजून पाच दिवसांनी आपली बोट मायामीला पोचेल. त्याच्या दुसऱ्याच दिवशी वॉशिंग्टन मधल्या हायात हॉटेलमध्ये पहिला बक्षीस समारंभ आहे. तेव्हा आपण मायामीहून तडक वॉशिंग्टनच्या विमानात चढायचं. "

नील म्हणाला, "डॅड, कपड्यांचं काय करायचं? "

त्याचा मुद्दा बरोबर होता. एरवीच्या वेळी, अशा महत्वाच्या प्रसंगासाठी आम्ही सर्वांनी हौशीनं नवीन कपड्यांची खरेदी केली असती, पण आता तेवढा वेळच नव्हता.

त्यातून आम्ही क्रुझसाठी बोटीवर! त्यामुळे फक्त सुट्टीचे इन्फ़ॉर्मल कपडे बरोबर घेतले होते. शॉर्ट्स, कॉटनचे शर्ट, किंवा टी शर्ट, जीन्स वगैरे वगैरे! आता काय करायचं?

शशी पटकन म्हणाली, " नो प्रॉब्लेम! बोटीवरच्या फ़ॉर्मल डिनरसाठी आपण काही चांगले फ़ॉर्मल कपडे बरोबर ठेवले आहेत ना? तेच ह्या समारंभासाठी वापरू.

हुश्श! काळजी संपली.

अमेरिकेत ड्रेस कोड फार महत्वाचा आणि तो अगदी काटेकोरपणे पाळला जातो. पण आता तो प्रश्न उरला नाही.

ठरल्याप्रमाणे आम्ही चौघं मायामीहून वॉशिंग्टनला पोचलो. हायात हॉटेलमध्ये मी आमच्यासाठी खोल्या राखून ठेवल्या होत्या. समारंभाचे प्रमुख पाहुणे, माजी पंतप्रधान श्री. नरसिंहराव हेही ह्याच हॉटेलात उतरले होते.

दुसऱ्या दिवशीचा भारतीय बक्षीस समारंभ खूप छान पार पडला. थोडीफार भाषणं झाली. मग जेवण आणि अनौपचारिक भेटीगाठी. श्री. नरसिंहराव माझ्याशी छान मराठीत बोलले. पण सर्वात खुश झाला समीर. कारण भारताच्या ह्या माजी पंतप्रधानांनी समीरच्या चक्क खांद्यावंर हात ठेवले आणि मित्राशी गप्पा माराव्यात, तसे ते समीरशी हसून खेळून बोलले.

दुसऱ्या दिवशी सकाळी 'अमेरिकेच्या कॉंग्रेसमेन बरोबर ब्रेकफास्ट ' असा एक कार्यक्रम होता. वॉशिंग्टन डीसीमध्ये सत्तेच्या वर्तुळातलं वातावरण पाहताना मजा वाटत होती आणि हा एक अनोखा ग्रेट अनुभव आपण घेत आहोत, ह्याचा थरारही जाणवत होता. सिनेटर्स आणि कॉंग्रेसमेन ह्यांच्याबरोबर बिझनेसच्या संदर्भात खूप मोकळं ढाकळं बोलणं झालं. पॉलीसी मॅटर्सपासून टॅक्सेसपर्यंत अनेक विषयांवर आम्ही आमची मत मांडली. मग संध्याकाळी व्हाईट हाउसच्या परिसरातल्या कॅनन ह्या बिल्डींगच्या सभागृहातलं बॅंक्वेट डिनर! खास अमेरिकन पद्धतीचं, श्रीमंती थाटामाटाचं. इथे फ़्रॅंक पलोन ह्या कॉंग्रेसमनच्या हस्ते मला ॲवार्ड मिळालं.

समारंभ संपवून आम्ही हॉटेलवर परत आलो. मन आनंदाने भरलं होतं. मी खिडकीशी उभा राहिलो. काचेतून वॉशिंग्टन डीसीची स्कायलाईन दिसत होती. वॉशिंग्टन मॉन्युमेंट, लिंकन मेमोरिअल, कॅपिटोलचा डोम! अमेरिकेच्या राजधानीतल वैभव पाहताना मला आठवण झाली, बेळगावहून विजापूरला पहिल्या नोकरीसाठी जायला निघालो, तेव्हा फक्त अठरा वर्षांचाच होतो. निरोपादाखल माझ्या हातावर दह्याची कवडी ठेवताना इन्नीचे डोळे भरून आले होते. ' कुठे लांब चालला आहे हा मुलगा? " ही तिच्या मनातली खंत तिच्या अश्रूंमधून ओघळत होती. आज मात्र तिनं मला पाहिलं, तर तिच्या डोळ्यात अश्रू येतील, पण ते आनंदाचे! अगदी मी जगाच्या दुसऱ्या टोकाला आहे, तरी! आयुष्य किती बदलतं आणि आपल्यालाही किती बदलवतं!

माजी पंतप्रधान श्री. नरसिंह राव यांचेकडून मानपत्र स्विकारताना














शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे, निर्माते महेश मांजरेकर, स्वरसम्राज्ञी आशा भोसले, माजी केंद्रिय मंत्री मा. विलासराव देशमुख, माजी केंद्रिय मंत्री मा. मनोहर जोशी यांचेसमवेत.

वयाच्या फक्त अठराव्या वर्षी मी बी. एस्सी. ला सत्तर टक्के मिळवून, फर्स्ट क्लास विथ डिस्टिंक्शन असा पास झालो आणि घरात आनंदी आनंद पसरला. साहजिकच होतं.

एकतर मॅट्रिकला मला फक्त पंचावन्न टक्के मार्क्स होते, त्यामुळे आता माझ्यावर 'हुशार विद्यार्थी' असा अधिकृत शिक्का बसला आणि दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे, घरची कठीण परिस्थिती आता बदलेल, अशी सर्वांना आशा वाटायला लागली.

मला माझ्यावरच्या जबाबदारीची पूर्ण जाणीव होती. म्हणूनच मी धारवाडला एम. एस्सी. ला ॲडमिशन घेतली खरी, पण त्याचवेळी नोकरीचे अर्ज टाकायला सुरुवात केली. माझं नशीब इतकं चांगलं की एम. एस्सी. ची पहिली टर्म जेमतेम संपली आणि मला विजापूर स्टेट बँकेत नोकरी मिळाली. अठराच वर्षाचा असलो, तरी मी अचानक नोकरीवाला पगारदार इसम झालो.

धारवाडला मी माझ्या कॉलेजच्या प्रिन्सिपलना जाऊन भेटलो आणि 'मी नोकरीसाठी विजापूरला जाणार आहे' अशी बातमी दिली.

त्यांनी विचारलं,

" मग काय? आता एम. एस्सी. करणार नाही? कॉलेज सोडणार?"

मी सरळपणे म्हणालो,

" छे छे! माझी प्रॅक्टीकल्स बुडतील, पण बाकीचा अभ्यास माझा मी करीन, कधी सुट्टी मिळाली, तर जमतील तेवढी प्रॅक्टीकल्स आणि लेक्चर अटेंड करीन आणि परीक्षा देईन."

ते माझ्याकडे क्षणभर पाहत राहिले. मग मात्र मान हलवून रागाने म्हणाले,

" छे छे, असं मी अलाउ करणार नाही. तुला परीक्षेला बसता येणार नाही. "

मी त्यांच्याशी बोलण्याचा प्रयत्न केला,

" सर, माझं कॉलेज बुडेल, कबुल आहे. पण म्हणून मला परीक्षेला बसू द्यायचं नाही, हा कुठला न्याय? "

पण एक ना दोन! त्यांनी माझी बाजू ऐकून घ्यायला स्पष्ट नकार दिला.

कर्नाटकात प्रोफेसरना अगदी देवासारखा मान दिला जातो. रस्त्यात दिसले, तर मुलं वाकून वगैरे नमस्कार करतात, मीही करत होतो.

पण म्हणून देवाला आपलं म्हणणं पटवून द्यायचं नाही, हे माझ्या स्वभावात बसत नव्हतं. मी उपकुलगुरुना जाऊन भेटलो. त्यांना माझी परिस्थिती सांगितली आणि ' माझ्या रिझल्टची जबाबदारी माझ्यावर राहील, पण मला परीक्षेला बसू द्या, ' अशी विनंती केली. तेही आधी 'नाही'च म्हणत होते. पण शेवटी माझ्या विनंत्या, आर्जव आणि थोडासा वादही कामी आला. मला एम. एस्सी. च्या पहिल्या वर्षाची परीक्षा देता येईल, असं उपकुलगुरूंनी मान्य केलं.

अभ्यासाची पुस्तकं बरोबर घेऊन मी विजापूरला नोकरीवर रुजू झालो.

पहिल्यांदाच घराबाहेर पडलो होतो. स्वतंत्र राहण्याचा अनुभव रोमांचकारी होता. दर महिन्याला घरी पैसे पाठवता येत होते, तोही आनंद होता. त्यातून माझ्यावर नेमकं कॅशिअरचं काम सोपविलं गेलं, त्यामुळे कोणाचे का असेनात, ' आपण आपले दोन लाख रुपये दररोज मोजतो आहोत ' ह्यानेच फुशारून जायला व्हायचं. स्टेट बँकेतला कॅशिअर म्हणून विजापुरातल्या प्रतिष्ठित लोकांच्या ओळखी झाल्या आणि ते लोक पण मला मान द्यायला लागले.

बाकी बघायचं, तर मोजक्याच पैशात, छानपैकी ताजं सुग्रास जेवायला मिळत होतं. स्वतःची भाड्याची पण स्वतंत्र खोली होती. अधून मधून सिनेमा पहायची चैन सहज जमत होती. अठरा वर्षाच्या मुलाच्या दृष्टीने ही सुखाची परिसीमा होती. मी स्वतःवर आणि जगावर अगदी खुश होतो. ह्या सर्व सुखसमाधानात बुडल्याने मला अभ्यासाचा पूर्ण विसर

पडला. एम. एस्सी. ची पहिल्या वर्षाची परीक्षा पंधरा दिवसांवर आली आणि मी खडबडून जागा झालो.

धारवाडला कॉलेजचे प्रिन्सिपल आणि कुलगुरू ह्यांच्याशी घातलेला वाद आठवला. मी त्याच दिवशी बँकेच्या मॅनेजरना जाऊन भेटलो आणि म्हटलं,

" साहेब, मला पंधरा दिवसांची सुट्टी हवी आहे. "

ते म्हणाले

" ठाणेदार, नोकरीला लागून अजून सहा महिनेही झाले नाहीत. तुम्हाला मी अशी पंधरा दिवस सुट्टी देऊ शकत नाही. "

नेहमीप्रमाणे माझ्याकडून विनंत्या, आर्जवं, विनवण्या कशाचा काही उपयोग नाही. आणखी चार दिवस वाया गेले. परीक्षेला आता आठ दिवसच उरले. मग मात्र मी हातघाईवर आलो. मॅनेजरना जाऊन सांगितलं,

" मी धारवाडला परीक्षा द्यायला जातो आहे. उद्यापासून कामावर येणार नाही. "

ते चमकले. म्हणाले, "अरे वेडा आहेस का तू? तुझी नोकरी जाईल. उगाचच उतावीळपणे काहीतरी करू नको. "

मी निर्णायक स्वरात सांगितलं, "तुम्हाला हवं ते करा." आणि सामान घेऊन धारवाडला कॉलेजच्या हॉस्टेलवर निघून आलो.

हॉस्टेलवर एका मित्राच्या खोलीत राहिलो. दिवाकर नावाच्या एका मित्रानं मला आपल्या नोट्स दिल्या. चार महिन्यांचा एका टर्मचा अभ्यास मला आठ दिवसात पूर्ण करायचा होता. शिवधनुर्भंगासारखं हे अवघड आव्हान मी उचललं आणि अभ्यासाला लागलो.

हॉस्टेलच्या खोलीत मी स्वतःला गाडून घेतलं. दिवसरात्र फक्त अभ्यास, अभ्यास, अभ्यास. परीक्षेआधीचे आणि परीक्षेचे दिवस. मी रात्रीचा फक्त एक तास झोपायचा. मित्रांना सांगून ठेवलं होतं, की 'माझ्या अंगावर कळशीभर पाणी ओतलंत तरी चालेल, पण एक तासानं मला उठवायचं म्हणजे उठवायचं!'

माझ्या अंगावर कळशीभर पाणी ओतून मला उठविण्याचं पुण्यकर्म मित्रांनी अगदी आनंदानं केलं, हे सांगायला नको. परीक्षेआधीचे आठ दिवस पाहता पाहता संपले. परीक्षा सुरु झाली. शेवटच्या अभ्यासाची आपण काही विशिष्ट आखणी करतो. मी प्रत्येक विषयाचा एक महत्वाचा टॉपिक ठेवून दिला होता. हॉस्टेलपासून परीक्षेचा हॉल दीड मैलावर होता. परीक्षेच्या दिवशी हे अंतर चालत जाताना मी ह्या राहिलेल्या टॉपिकचा अभ्यास करीत असे. एक डोळा पुस्तकावर नि एक डोळा रस्त्यातल्या वाहनांवर! परीक्षा संपण्याआधीच केव्हातरी माझी नोकरी गेली, ही बातमी कळली. क्षणभर वाईट वाटलं. कारण मला नोकरीची नितांत गरज होती.

पण तेव्हा विचार करायला, दुः ख करायलाही वेळ नव्हता.

'आता विचार करायचा, तो फक्त परिक्षेचा! नोकरीचं नंतर बघू.' असं म्हणून मी परत अभ्यासाचं पुस्तक उघडलं.

परीक्षा संपवून मी बेळगावला घरी आलो. काही दिवस मला विलक्षण अस्वस्थ वाटायचं. 'परीक्षेचा रिझल्ट काय लागणार? आणि नोकरीचं काय होणार?' अशा दोन मोठ्या काळज्या होत्या. अचानक दोन्ही काळज्या एकापाठोपाठ एक संपल्या. एम. एस्सी. ला पहिल्या वर्षाच्या परीक्षेत मला परत एकदा चक्क फर्स्ट क्लास मिळाला, आणि मुंबईच्या भाभा अॅटोमिक रिसर्च सेंटरकडून मला इंटरव्ह्यूचा कॉल आला.

मुंबईला फारसं कोणी ओळखीचं नव्हतं. आऊचा काऊ, असं म्हणत एका लांबच्या नातेवाईकाकडे उतरलो. दुसऱ्या दिवशी सकाळी बीएआरसीला जाणारी बस पकडण्याकरिता दादरच्या एका बस स्टॉपवर उभा राहिलो. पावसाळ्याचे दिवस आणि मी मात्र इंटरव्ह्यूसाठी खास पांढराशुभ्र  शर्ट आणि पांढरी पॅंट अशी वेशभूषा केलेली.

३५१ नंबरची बस आली. मी ती चपळाईने पकडली. दोन मिनिटांनी कळलं की ही बस उलट दिशेनं जाणारी आहे. मुंबईत आलेल्या नवख्या माणसाच जे होतं, तेच माझं झालं. मी गांगरलो, घाबरलो, नर्व्हस झालो आणि चालत्या बसमधून धाडकन खाली उडी टाकली. पाय घसरला आणि मी रस्त्यात आडवा.

उठून उभा राहिलो तेव्हा कळलं, माझ्या पांढऱ्याशुभ्र पॅंटला पाठीमागून छानपैकी चिखल-माती लागली आहे. परत एकदा ३५१ बस, पण योग्य मार्गाने जाणारी पकडली आणि ट्रॉम्बेला बीएआरसीच्या ऑफिसमध्ये पोचलो.

ऑफिसमध्ये खूप माणसं होती. लगबगीने इकडे तिकडे जात होती. माझ्याकडे कोणाचं लक्ष नव्हतं. मला मात्र सारखं वाटत होतं, सर्वजण माझ्या अवताराकडे पाहत आहेत आणि बोट दाखवून हसत आहेत.

इंटरव्ह्यूसाठी माझा नंबर आला, मी आत गेलो. समोरच्या भल्या मोठ्या टेबलमागे आठ शास्त्रज्ञ बसले होते. त्यांच्यापैकी एकानं विचारलं,

"तुझ्या आवडीचा विषय सांग".

फारसा विचार न करता मी ठोकून दिलं, ' रेडीओ केमिस्ट्री '! मग काय? रेडीओ केमिस्ट्रीतल्या प्रश्नांचा माझ्यावर भडीमार झाला. ते सर्व रेडीओ केमिस्ट्रीतले तज्ञ, तर मी एम, एस्सी. ची पहिली परीक्षा पास झालेला. रेडीओ केमिस्ट्री असा विषय सांगून, मी नको ते धाडस केलं होतं. ते काय विचारीत होते आणि मी काय उत्तरं दिली, आता आठवत नाही.

आठवते ती एकच गोष्ट! असा नमुनेदार इंटरव्ह्यू होऊनही एक महिन्याच्या आत मला घरी पत्र आलं.

***भाभा अॅटोमिक रिसर्च सेंटरमध्ये सायंटिफ़िक असिस्टंट म्हणून तुमची नेमणूक झाली आहे. '***

बिएआरसीमध्ये नोकरी मिळाली? मी टुणकन उडीच मारली. इन्नीला आणि काकांना ही बातमी सांगायला गेलो, तर इन्नीनं आपला डोळयाला पदरच लावला. मुसमुसत हुंदके देत ती दुःखाने म्हणाली,

" कुठे लांब जातो आहेस बाबा! मुंबईला ओळखीदेखीचं कोणी नाही. उगीच विजापूरची बॅंकेची नोकरी सोडली, आणि आता सुखाचा जीव दुःखात टाकायला मुंबईच मिळाली तुला? "

इन्नीचे मुद्दे मला कळले. आमच्या आजूबाजूच्या लोकांमध्ये 'बँकेत नोकरी लागली, म्हणजे आयुष्याची इतिकर्तव्यता झाली, बँकेची नोकरी म्हणजे सुख आणि स्वास्थ्याची शिदोरी' असा समज होता.

त्यातून विजापूर बेळगावपासून तुलनेने जवळ! असं असताना, हे मुंबईला जायचं आणि आई वडिलांना दुरावायचं, म्हणजे काय? ह्याची काय गरज आहे का?

काका, माझे वडील मात्र शांत आवाजात, समजुतीच्या सुरात म्हणाले, "अगं, मुलांना असं अडवू नये. त्यानं काही विचार करूनच निर्णय घेतला असणार, तो आपण आनंदानं मान्य करायला हवा. "

असो, तर अशा ह्या थोड्याश्या संघर्षमय, थोड्याश्या चिंतेच्या वातावरणातच मी माझी नवी बॅग भरली आणि मुंबईला जायला निघालो. इन्नीने मला निरोप दिला, पण डोळ्यांना लावलेला पदर काही दूर झाला नाही.

मुंबईला पहिल्यांदा आलो, तो इंटरव्ह्यू द्यायला आणि आता नोकरीसाठी, म्हणजे मुक्कामाला. आत्तापर्यंत बेळगाव, धारवाड, विजापूरशिवाय दुसरं जग पाहिलं नव्हतं. त्यामुळे मुंबईच्या स्मार्ट, चटपटीत, मॉडर्न वातावरणात रुळायला थोडा वेळ लागला.

दादर स्टेशन जवळच्या कृष्ण लॉजमध्ये मी पहिल्यांदा राहिलो. इथे एकेका खोलीत चार कॉट टाकलेल्या होत्या. प्रत्येकाने आपापली बॅग आणि इतर सामान आपली कॉट खाली ठेवायचं. माझ्या खोलीतला एक माणूस भयंकर देवभक्त होता. तो पहाटे पाचला उठून मोठमोठ्याने देवाचे नामस्मरण करायचा. इतकंच नाही तर तो मोठ्या आवाजात आरत्याही म्हणायचा. बाकीच्यांच्या झोपेचं खोबर झालं, तर तो त्यांचा प्रॉब्लेम. देव भक्ताला त्याची फिकीर नव्हती.

दुसरा माणूस हसतमुख, मोकळा ढाकळा, बडबड्या. पण तो चोरटा निघाला. लॉजमध्ये कितीतरी जणांना फसवून तो पळून गेला. सुदैवाने मला थोड्याच दिवसात बीएआरसीच्या कॉलनीत एक भाड्याची खोली मिळाली आणि लॉजवाल्यांची संगत सोबत संपली.

बीएआरसीमध्ये मी ज्या विभागात काम करायला लागलो. तिथे काही विशिष्ट चाचण्या केल्या जायच्या. बीएआरसीच्या न्युक्लिअर रीॲक्टरचं रेडिएशन कामगारांसाठी हानिकारक आहे का? की हानिकारक नाही? ' हे आम्ही तपासून पाहायचो. हे काम २४ तास चालू असल्यामुळे आम्हाला शिफ्टमध्ये काम करायला लागायचं.

बहुतेकांना रात्रीची शिफ्ट नको असायची, विशेषतः लग्न झालेल्या आणि कुटुंबाची जबाबदारी असलेल्याना तर ही शिफ्ट खूपच अडचणीची वाटायची. मी एकटाच सडा फटिंग! त्यामुळे मी आपणहून ही रात्रीची शिफ्ट घेतली.

हळूहळू मुंबईत छान बस्तान बसलं. बीएआरसी मधलं काम, राहाणं, हिंडणं फिरणं, जेवणखाणं सर्व काही सुरळीत पार पडायला लागलं. महिन्याच्या आठशे रुपये पगारात माझं नीट भागत होतं. आणि घरीही पैसे पाठवता येत होते. सर्व घडी नीट बसली की मला बेचैनी येते. काहीतरी नवीन शोधून काढण्यासाठी मी धडपडायला लागतो. आत्ताही तसंच झालं.

एम. एस्सी.चं राहिलेलं वर्ष पूर्ण करावं अन डबल ग्रॅज्युएट व्हावं, ह्या विचारानं मी झपाटून गेलो. एक दिवस उठलो तो तडक कालीनाला मुंबई युनिव्हर्सिटीमध्ये गेलो. नीट सर्व चौकशी केल्यावर कळलं की धारवाड युनिव्हर्सिटीतलं माझं एम. एस्सी.चं पहिलं वर्षं इथे जमेत धरलं जाणार नाही.

" अहो, पण मला फर्स्ट क्लास मिळाला आहे. " माझ्या फर्स्टक्लासमुळे मुंबई युनिव्हर्सिटीचा नियम बदलणार नव्हता. मला एम. एस्सी. साठी प्रवेश मिळाला असता पण दोन्ही वर्षाच्या परीक्षा द्यायला लागल्या असत्या.

'दोन तर दोन वर्ष! एम. एस्सी. व्हायचं. ' माझा निश्चय ठरला.

आता प्रश्न होता, नोकरी आणि कॉलेज दोन्ही गोष्टींचा मेळ कसा घालायचा? मी माझ्या सहकाऱ्यांशी बोललो. त्यांनी सांगितलं,

" युनिव्हर्सिटीला ॲडमिशन घेण्याआधी तुला आपल्या सोमण साहेबांशी बोलावं लागेल. पण ते तुला परवानगी देतील असं वाटत नाही. "

सोमण साहेब! आमचे विभाग प्रमुख. अतिशय कडक शिस्तीचे आणि कर्तव्य कठोर. त्यांचा इतका दरारा आणि धाक होता की आमच्या विभागातील जुनी जाणती माणसंही त्यांच्यासमोर जायला घाबरायची.

पण मनात आलेलं मोकळेपणी बोलायचं, हा माझा खाक्या. त्यामुळे इतरांनी सोमण साहेबांची बागुलबुवासारखी भीती दाखवली, तरी मी त्यांना भेटायला गेलो. दारावर टकटक करून, 'मे आय कम इन सर?' अशी परवानगी घेऊन आत जाऊन अदबीनं उभा राहिलो.

सोमण साहेबांनी वर पाहिलं नाही, ते आपलं हातातलं काम करीत राहिले.

काही क्षण (की काही मिनिटं?) अवघडलेली शांतता! शेवटी मीच पुढे होऊन म्हणालो, "सर, मला आपल्याशी काही बोलायचं आहे." ते मराठी, म्हणून मी मराठीत बोललो.

तर ते इंग्रजीत गुरकावले, " स्पीक अप! मेक इट फास्ट!"

थोडक्यात काय? तर 'तुझ्याशी फालतू काहीतरी बोलायला मला अजिबात वेळ नाहीये.'

मी त्याना एम. एस्सी. करण्याचा माझा इरादा सांगितला आणि त्यांची परवानगी मागितली.

त्रासलेल्या आवाजात ते म्हणाले " अशी कशी परवानगी देत येईल? " ही सरकारी नोकरी आहे. इथे असलं काही करता येणार नाही. "

मी थक्क झालो, त्याना विचारलं “सर, त्यात वाईट काय आहे? "

ह्यावर माझ्या प्रश्नाचं उत्तर न देता ते म्हणाले, " यु मे गो नाऊ. "

नाईलाज होता, तेव्हा मी बाहेर आलो. पण त्यांचे 'असलं काही' हे शब्द डोक्यातून जात नव्हते.

'एम. एस्सी. होणं म्हणजे असलं काही? '

सोमण साहेबांनी निर्णय दिला होता. पण मी खमक्या, मी ठरवलं ' त्यांचा निर्णय त्यांच्याकडे. आपण एम. एस्सी. ला ॲडमिशन घ्यायचीच.

मी कालीनाला युनिव्हर्सिटीत गेलो. ईनॉर्गॅनिक केमिस्ट्रीमध्ये एम. एस्सी. च्या पहिल्या वर्षाला ॲडमिशन घेतली. ह्या नंतर माझ्या आयुष्याला असा काही वेग आला की टिपिकल मुंबईकरासारखा मी दिवस रात्र गरा गरा फिरायला लागलो.

बीएआरसीला रात्री अकरा ते सात ड्युटी करायची. मध्ये काम संपवून जमलं तर तासभर झोप. मग खोलीवर येऊन आवरून निघायचं. ते बस, ट्रेन असा प्रवास करून जोगेश्वरीच्या इस्माईल युसुफ कॉलेजमध्ये पोचायचं. कधी कधी काही लेक्चर, इतर ही कुठल्या कॉलेजमध्ये असायची. मग जोगेश्वरीहून परत प्रवास, परत लेक्चर आणि बॅक टू पॅव्हेलिअन म्हणजे कॉलनीतील खोली!

माझं हे टाइम टेबल बघूनच डोकं गरगरतं की नाही? पण गम्मत म्हणजे एकदा ह्या गरगरण्याला सरावल्यानंतर मी ह्याच काळात आणखी काय काय केलं ते पहा. मी प्रायोगिक नाटकांचा चाहता झालो, प्रायोगिक नाटक मंडळी बरोबर पडद्याआडच्या वेळखाऊ कामगिरीत रस घ्यायला लागलो. नाटकवाले मित्र जोडले, त्यांच्या बरोबर नाटक, चित्रपट, पुस्तक, कलाप्रदर्शन, असा कलेच्या आनंदात बुडून गेलो. मुंबईभर भटकलो आणि गरज पडली, तेव्हा जादा पैसे मिळवायला शिकवण्याही केल्या.

वेळ किती ताणता येतो आणि वेळेचा जास्तीत जास्त उपयोग कसा करता येतो. ते मला मुंबईत कळलं. त्याचं प्रमुख कारण म्हणजे मला भेटलेली एक अफलातून वल्ली, माझा मित्र, गुरु, आणि मार्गदर्शक नौशील मेहता.

इस्माईल युसुफ कॉलेजमध्ये नौशील माझ्यासारखाच ईनॉर्गॅनिक केमिस्ट्री घेऊन एम. एस्सी. करीत होता. आमच्या दोघामधला हा एकुलता एक समानधर्म. बाकी सर्व गोष्टी अगदी विलक्षण असमान, विरुद्ध टोकाच्या.

मी बेळगावहून आलेला एक कनिष्ठ मध्यम वर्गातील अडाणी, गावंढळ मुलगा. चार मराठी पुस्तकांपलीकडे वाचन नव्हतं. इंग्रजी नीट बोलत येत नव्हतं. कुठल्याही तऱ्हेचं शहरी

सॉफ़िस्टिकेशन, टेबल मॅनर्स, उच्चभ्रू समाज, महागडी हॉटेलं, ह्या पंचतारांकित संस्कृतीशी माझा काहीही संबंध नव्हता.

नौशील मला भेटला आणि मग तोपर्यंतच्या ह्या अपरिचित संकृतीची मलाही ओळख झाली. नौशिलची आणि माझी गट्टी का जमली, त्यानं माझ्यात काय पाहिलं, ह्या प्रश्नाचं एकच उत्तर असू शकतं. ते म्हणजे  चुंबकाच्या परस्पर विरुद्ध ध्रुवाचं एकमेकांप्रती असलेलं आकर्षण. नौशीलनं मला आपला मित्र मानलं आणि मग नाटक, इंग्रजी वाचन, पेंटिंग, फिल्म्स, बौद्धिक चर्चा, मनमुराद भटकणं ह्या त्याच्या अद्भुत दुनियेत मीही वावरायला लागलो.

नौशीलचं वागणं, वावरणं, विचार करणं आणि दिसणं सर्वच उच्च अभिरुचीचं, राजेशाही थाटाचं. उंचनिंच देखणा नौशील हजारात उठून दिसायचा. प्रत्येक गोष्ट करायचा ती स्टाइलमध्ये. सिगरेट ओढली, तर फक्त फाइव फाइव फाइव किवा डन हिल. कुठे फिरला तर फक्त टॅक्सीने. जेवायला जाणार तो उंची, पंचतारांकित, महागड्या रेस्तरॉंमध्ये. दारूही प्याला, तर फक्त परदेशी स्कॉच.



नौशीलबरोबर तीस वर्षांनंतर सेंट लुईस येथे

हृदयाने तो सर्वप्रथम होता, नाटकवाला. विशेषतः प्रायोगिक नाटकांमध्ये त्याला खूप इंटरेस्ट असायचा. गाड्याबरोबर नळ्याची यात्रा, तसा मीही बौद्धिक आनंद देणाऱ्या प्रायोगिक नाटकांच्या अजब गजब दुनियेत खेचलो गेलो. छबिलदास मधील मराठी प्रायोगिक नाटक, हिंदी, गुजराथी, इंग्रजी नाटक. नौशिलचा सर्व ठिकाणी राबता असायचा.

त्याच्यासारखेच त्याचे इतर मित्र. शफी इनामदार, परेश रावळ, महेश जोशी, प्रबोध पारीख. त्यांच्यात राहून, त्यांची बोलणी ऐकून, सॅम्युएल बेकेट, पिटर शेफर्ड अशा बुद्धिवंत नाटककारांच्या कलाकृतींशी माझी ओळख झाली. प्रबोध पारीख मिठीबाई कॉलेजमध्ये तत्वज्ञानाचा  लेक्चरर होता. सांताक्रूझला त्याचा खूप मोठा फ़्लॅट होता आणि प्रत्येक भिंत पुस्तकाच्या कपाटांनी भरलेली होती.

मला तर हे सर्व वातावरण अलीबाबाच्या गुहे सारखंच वाटायचं. ही श्रीमंती, बुद्धीला खाद्य देणारी होती. नाटक, वाचन यांच्या जोडीला नौशील पेंटींग्ज करायचा. काव्याचा आनंद घ्यायचा. त्याच्यामुळे मला कितीतरी प्रतिभावंत कळले. वर्डस्वर्थ, दाली, पिकासो, नित्शेपासून फ़्रॉईडपर्यंत कितीतरी थोर माणसं, त्यांचं काम, त्यांचे विचार किंवा त्यांचं लिखाण मला आवडायला लागलं.

माझं सगळं जगच बदलून गेलं. एखाद्या छोट्याशा खाडीतल्या माशाला कोणीतरी उचलून महासागरात सोडावं, तशी किमया घडली. नौशील आणि मी जानी दोस्त झालो, तसं त्याच्या घरीही माझं जाणं-येणं वाढलं. हे एक सधन, सुसंकृत, सुशिक्षित गुजराथी घर होतं. नौशील इतकेच त्याचे आई वडीलही माझ्याशी प्रेमाने, अगत्याने वागायचे.

विनोद म्हणजे, " नौशील हा माझा हिरो, गुरु आणि आदर्श! मी त्याचा 'शागीर्द'! तर नौशिलच्या आईवडिलांना वाटायचं 'आपला नौशील ह्या श्रीसारखा का नाही वागत, विचार करत? ' माझं नोकरी करून शिकणं, घरी पैसे पाठवणं, ह्या सर्व गोष्टींचं त्यांना खूप कौतुक! त्यांच्या दृष्टीने मी एक जबाबदार मुलगा होतो, तर नौशील स्वतःच्या कलेच्या विश्वात मश्गुल असलेला एक बेफिकीर मुलगा!

नौशीलबद्दल त्याचे आई वडील माझ्याशी बोलायचे, तेव्हा मला गम्मत वाटायची. मी त्यांना कधी बोललो नाही. पण खरं सांगायचं, तर नौशीलचे गुण जसे मला भावले, तसा त्याचा वाण ही मी थोडाफार उचलला होता. म्हणजे एरवी मी अगदी काटकसरी, पैसे बेतानं खर्च करणारा, पैसे साठवणारा. पण नौशील बरोबर असला की कधी कधी मीही सगळी काटकसर विसरून ऐश करायचो. टॅक्सीनं प्रवास किंवा महागड्या हॉटेलमधलं जेवण अशा गोष्टी वर ऐटीत खर्च करायचो.

कलानंदात डुंबलो आणि जीवाची मुंबई करण्यात रमलो. तरी माझ्या आयुष्यात सर्वात महत्वाचं काय, हे मी विसरलो नव्हतो.

त्यामुळे नोकरीबरोबरच एम, एस्सी. ची दोन वर्षं सुरळीत पार पडली. यथावकाश शेवटची परीक्षा झाली. रीझल्ट लागला, आणि मी चक्क फर्स्टक्लास आलो.

स्वर्ग दोन बोटंच उरावा, तसा मी खुश झालो. कामावरच्या काही सहकाऱ्यांनी सुचवलं, " तुझ्या ह्या डिग्रीचा आपल्या इथेही विचार व्हायला हवा. तुला प्रमोशन किंवा पगारवाढ मिळायला काहीच हरकत नाही, "

सहकाऱ्यांची सद्भावना हे बोलत होती. पण बात अशी होती कि, त्यासाठी परत एकदा मांजराच्या गळयात घंटा बांधायला हवी; परत एकदा सोमण साहेबांचं दर्शन घ्यायला हवं.

तर परत एकदा मी सोमण साहेबांच्या केबिनमध्ये नतमस्तक उभा, परत एकदा माझ्या अस्तित्वाची दाखल न घेता सोमण साहेब फाईलीत डोकं खुपसून बसलेले.

शेवटी मी धाडकन बोललो, ह्यावेळी अर्थातच इंग्रजी भाषा वापरली,

" सर! मला मुंबई विद्यापीठाची एम. एस्सी. डिग्री मिळाली आहे. मी फर्स्टक्लास आलो आहे. "

साहेबांनी माझ्याकडे पाहिलं.

चेहऱ्यावर कौतुकाची छटा नाही की साधा ' अभिनंदन' असा एक शब्द उच्चारण्याचा उपचार नाही.

उलट त्रासिक, कडवट सुरत त्यांनी विचारलं? , " तुला परवानगी कोणी दिली? "

" अँ? " मी चक्क बावचळलो.

ते कडाडले, "परवानगी नसताना एम. एस्सी. केलास. तू कधी सुधारणार नाहीस. स्वतःच्या जबाबदारीची तुला यत्किंचित जाणीव नाही".

मी धीर करून म्हणालो, " सर, असं कसं म्हणता? मी माझं काम नीट केलेलं आहे. फावल्या वेळात कॉलेज अटेंड करून मी ही डिग्री मिळवली आहे. आपल्या कार्यालयात माझ्या डिग्रीची नोंद व्हावी. त्यानुसार माझ्या हुद्द्यात किंवा पगारात वाढ व्हावी, अशी माझी विनंती आहे. "

सोमणसाहेब तुच्छतेने म्हणाले, " तुझी डिग्री अनऑथराईज्ड आहे. मी ती जमेत धरणार नाही. आणि तुला प्रमोशन मिळणार नाही"

ह्यावर मी काय बोलणार!

" थँक्यु " एवढा एकच शब्द उच्चारून मी बाहेर पडलो. पण त्यांचं वाक्य डोक्यातून हटत नव्हतं.

" नो प्रमोशन फ़ॉर यु!"

" नो प्रमोशन? व्हाय? ' हे माझे प्रश्नही माझ्याच मनात घुमत राहिले. कारण ह्या प्रश्नांना उत्तर मिळण्याची शक्यता शून्य आहे, हे मला कळून चुकल होतं.

एम. एस्सी. ला फर्स्टक्लास आल्याने माझ्या महत्त्वाकांक्षेला आता चांगलेच धुमारे फुटले होते. ' जग बघावं, जगात काहीतरी करून दाखवावं' अशी ईर्षा मनात निर्माण झाली होती. मी ठरवलं, आपण परदेशी जाऊन " डॉक्टरेट " ही अत्युच्च डिग्री मिळवायची.

मी नौशिलशी बोललो. तोही चांगले मार्क्स मिळून एम. एस्सी. झाला होता. पण उच्च शिक्षण, करियर, परदेश प्रवास ही त्याची महत्त्वाकांक्षा नव्हती. इथल्या त्याच्या नाटक, वाचन, पेंटिंगच्या जगात तो खुश होता.

त्याने फार उत्साह दाखवला नाही, पण मला नाउमेद ही केलं नाही. ' बघू, करू. ' अशी त्याची अॅटीट्युड.

मी मात्र एकदम उत्साहाने कामाला लागलो. 'परदेश कुठला? ' ह्या प्रश्नाला 'अमेरिका' असं माझं मीच उत्तर दिलं. मग युसीस ह्या अमेरिकन संस्थेत गेलो, आणि बऱ्याचशा विद्यापीठांची माहिती मिळवली. पत्ते गोळा केले.

घरी आलो, नौशिलशी बोललो. आम्ही दोघांनी धडाधड अनेक  विद्यापीठांना पत्रं लिहिली. काही दिवसांतच आमच्या पत्रांना काही अमेरिकन विद्यापीठांनी उत्तरं पाठवली.

उत्तरं काय आहेत? हा नंतरचा प्रश्न. ' आपल्याला फ़ॉरिनहून, भल्या मोठ्या पाकिटातून पत्र येत आहेत, ह्याचंच मला केवढं कौतुक! पत्रं वाचल्यावर लक्षात आलं, पीएच. डी. करण्यासाठी निमंत्रणं बरीच होती. पण त्यासाठी जबर फी  होती. तीही डॉलर्स मधली. आम्हाला ही निमंत्रणं कुठली परवडायला? आमच्यासारख्या कड्क्याना हवं होतं, स्कॉलरशीपवालं निमंत्रण.

शेवटी प्रतीक्षा संपली. अमेरिकेतल्या ओहायो स्टेटमधल्या ॲक्रन युनिवर्सिटीचं पत्र आलं. मला आणि नौशिलला, दोघानाही पी. एचडी. करण्यासाठी बोलावलं होतं. मात्र त्या आधी एम. एस्सी. सारखी तिथली एक परीक्षा द्यायची होती. शिकण्याबरोबरच, ज्युनिअर कॉलेजच्या विद्यार्थ्यांना पार्टटाइम   लेक्चरर म्हणून शिकवायचं काम होतं, आणि ह्या सर्व गोष्टी करण्यासाठी वर्षाला दोन हजार सातशे डॉलर्स अशी स्कॉलरशिप होती. आम्ही दोघांनी ही स्कॉलरशिप स्वीकारली आणि त्या क्षणापासून आमच्या परदेशवारीची तयारी सुरु झाली.

संन्याशाच्या लग्नाची तयारी शेंडीपासून! तशी आमची तयारी पासपोर्टचा अर्ज भरण्यापासून! अर्ज भरायला बसलो आणि त्यातलं एक कलम वाचून माझा थरकाप उडाला. मी सरकारी नोकर असल्यामुळे पासपोर्टच्या अर्जावर माझ्या बॉसची सही आवश्यक होती. म्हणजे आलीय भोगासी....

तर आता परत एकदा, एक शुभ प्रभाती मी सोमण साहेबां समोर उभा!

" येस, व्हॉट डू यु वॉंट अगेन? "

म्हणजे कशाला मरायला मला तोंड दाखवायला परत आला आहेस? '

मेलेली कोंबडी आगीला भीत नाही. मी पुढे होऊन म्हणालो.

" सर, अमेरिकेत पीएचडी. करण्यासाठी मला निमंत्रण आलं आहे. स्कॉलरशिपही मिळाली आहे, पासपोर्टसाठी ह्या अर्जावर मला तुमची सही हवी आहे. "

आता सोमण साहेबांच्या डोळयातून आगीच्या ठिणग्या बाहेर पडल्या. धारदार आणि कडक आवाजात त्यांनी मला विचारलं, " अमेरिकन युनिवर्सिटीचं आमंत्रण आहे? बट हु टोल्ड यु टू अप्लाय? "

माझ्या उत्तराची वाट न पाहता, त्यांनी मला चागलं तास भर झाड झाड झाडलं.

" बेजबाबदार कुठला...

" तुला कधी अक्कल येणार नाही..

" सरकारी नोकर असताना असले नसते उद्योग तुला करता येणार नाहीत.

"मी ह्याला मान्यता देणार नाही.

"तू हे करायला नको होतं.

"ह्याचा परिणाम चांगला होणार नाही. " वगैरे वगैरे.

दोनचार माणसांचे खून वगैरे करून, मी त्यांच्यासमोर 'माफ करा साहेब' असा पदर किंवा शर्ट पसरतो आहे, असा त्यांचा आव होतं. मला हसावं की रडावं, ते कळेना. भाषणाच्या शेवटी माझा पासपोर्टचा अर्ज तुच्छतेने दूर लोटत त्यांनी भरतवाक्य उच्चारलं.

" मी ह्यावर सही करणार नाही. "

निकाल लागला होतं. तरीही शेवटचा प्रयत्न म्हणून मी अजिजीने म्हणालो.

" सर प्लीज! तुमची सही नसेल तर मला पासपोर्ट मिळणार नाही. "

ह्यावर त्यांनी माझ्याकडे रोखून पाहिलं. मग एक डोळा बारीक करीत म्हणाले.

" मी सही करीन, पण एक अट आहे. "

मी जीवाचे कान केले.

" तू राजीनामा दे. "

क्षणभर मी गप्प उभा राहिलो. माझं एक वेळ सोडा, पण बेळगावला इन्नी, काका वीणा, रवी सगळ्यांना माझ्या आधाराची गरज होती. मला विलक्षण अपराध्यासारखं वाटलं. सोमण साहेबांसमोरून निघून जावंसं वाटलं. पण मग मात्र माझ्या अंगात काय संचारलं कोण जाणे? मी एकदम जीवावर उदार झालो. तिथल्या तिथे राजीनामा खरडून सोमणसाहेबांच्या समोर ठेवला. आणि पासपोर्टच्या अर्जावर त्यांची सही घेऊन बाहेर पडलो.

पासपोर्टसाठी अर्ज करून झाला. ऑगस्ट महिना उजाडला. आणि माझ्या लक्षात आलं, ' आता एकच महिना उरला. सप्टेंबरमध्ये अमेरिकेतल्या युनिवर्सिटीची नवी टर्म सुरु होते. तेव्हा सप्टेंबरमध्ये आपण अमेरिकेला पोचायला हवं.'

आत्तापर्यंत आमची अमेरिकेची मोहीम गुप्त होती. आता ठरवलं, सगळ्यांना सांगायला हरकत नाही, पहिल्यांदा घरी सांगायला हवं, म्हणून बेळगावला गेलो.

' मी अमेरिकेला जातो आहे, ' ह्या वाक्याने घरात एक छोटासा बॉम्बस्फोटच झाला. इन्नी नाखूष झाली. रडायला लागली.

" चांगली मुंबईची सोन्यासारखी नोकरी सोडून, अमेरिकेत काय ठेवलं आहे? ' वगैरे वगैरे.

परत एकदा काकांनी तिची समजूत घातली.

"अगं, त्याची इच्छा आहे. आपण त्याला अडवायचं नाही." मग तिनंही माझं परदेशी जाणं पटवून घेतलं.

मुंबईच्या मित्रांना आमच्या परदेशी जाण्याची बातमी कळली. तसं मग ' ठाणेदार, मेहता अमेरिकेला चालले' हे गावभर पसरलं. सर्वांनी आमचा अभिनंदन केलं, आणि जवळच्या मित्रांनी पार्ट्या दिल्या.

एका बाजूला निरोपसमारंभ पार पडत होते. दुसऱ्या बाजूला आम्ही तिकिटाचे पैसे जमवायला सुरुवात केली. परदेशात शिकायला जाणाऱ्या विद्यार्थ्यांना अनेक संस्था शिष्यवृत्या देतात, त्यांच्याकडे आम्ही अर्ज पाठवले.

नौशीलची घराची परिस्थिती चांगली होती. पण त्याला स्वतःच्या बळावर परदेशवारी करायची होती. तर माझं बळ म्हणजे माझी नोकरी. तीच आता संपल्यामुळे मला कर्ज घेणं भागच होतं. ' लवकरात लवकर अमेरिकेत पोचायचं. ' कमाई करायला

लागायचं. परत एकदा घरची जबाबदारी सांभाळायची आणि कर्जही फेडायचं, ' असे माझे बेत!

माझं  नशीब इतकं चांगलं की मला दोन संस्थांनी प्रत्येकी दहा हजार रुपये स्कॉलरशिप म्हणून दिले. मी खुश झालो. अमेरिकेच्या  तिकिटाला दहा हजार रुपयेच लागले असते. शिवाय गेल्यावर तिकडे महिन्याला तीनशे डॉलर्स मिळाले असते. म्हणजे अचानक माझ्या हातात जास्तचे दहा हजार रुपये आले. हे कर्ज होतं, पण मी म्हटलं कि, ' अमेरिकेत गेल्यावर ते आपण फेडू तेव्हा नौशील सारखं वागत मी चक्क ऐश केली. मित्रांना पार्ट्या दिल्या. माझे इतर खर्च भागवले आणि दहा हजार रुपये  उडवून टाकले.

पासपोर्ट आला आणि जायला फक्त आठच दिवस उरले. बाकी सर्व तयारी झाली होती. आता पासपोर्टवर अमेरिकन व्हिसाचा  स्टँप मारून घेण्याचा एकाच छोटासा उपचार बाकी होता.

व्हिसा मिळणं हा आमच्यासाठी फार मोठा प्रॉब्लेम नव्हता. अमेरिकन युनिव्हर्सिटीचं निमंत्रण, तिथली स्कॉलरशिप, तिथली पार्ट टाइम  नोकरी इतक्या सगळ्या गोष्टी आमच्या हातात होत्या. आणखी काय पाहिजे?

एखादा लाल गालीचा अंथरून, अमेरिकेनं आमच्या स्वागताची तयारी केलेली असावी, तसे आम्ही ऐटीत होतो. व्हिसा घ्यायचा, तिकीट काढायचं, भरलेली बॅग उचलायची की निघाले अमेरिकेला!

पासपोर्ट मिळाल्याच्या  दुसऱ्या दिवशी भल्या सकाळी मी आणि नौशील अमेरिकन कॉन्सुलेटच्या दारात पोचलो. भल्या मोठ्या रांगेतून सरकत सरकत शेवटी एकदाचा इंटरव्ह्यूसाठी एका खिडकी समोर मी उभी राहिलो.

पलीकडे एक गोरी अमेरिकन बाई होती. तिने मला भरभर काही प्रश्न विचारले. तिच्या अमेरिकन उच्चारांमुळे ते प्रश्न मला नीट कळलेच नाहीत. मी अंदाजपंचे काहीतरी उत्तरं ठोकून  दिली. ती बहुदा  परत परत विचारीत  होती.

' तू अमेरिकेत का जातो आहेस? कशासाठी? ' मग तिचा एक प्रश्न मला कळला.

' तू परत येशील, ह्याची खात्री काय? '

मी म्हटलं,

" मी नॉन इमिग्रंट स्टुडन्ट व्हिसा मागितला आहे. माझं शिक्षण झालं की मी परत येणार. "

तिनं शांतपणे विचारलं. " कशावरून? " ह्या गुगलीवर मी अडखळलो. तरीही सांगायला लागलो की ' माझे आई वडील, भावंडं सर्वजण इथे आहेत. "

मान हलवून तिने निर्णय दिला.

" मी तुला व्हिसा देऊ शकत नाही. "

स्वप्नांचा क्षणार्धात चक्काचूर होणे म्हणजे काय, ते मला ह्या क्षणी उमजला. हा धक्का, इतका अनपेक्षित होता की मला चक्कर आली. मी धाडकन खाली पडलो आणि बेशुद्ध झालो.

अर्थात त्यामुळे काही व्हर्जिनिया बाईचं मन द्रवलं नाही. (जॅकेटवरच्या ओळखपत्रावरचं तिचं नाव मी वाचलं होतं. व्हर्जिनिया ) की तिनं आपला निर्णय बदलला नाही. तिने फक्त माणुसकीला जागून पटकन लोकांना बोलावलं आणि मला मदत केली.

लटपटत्या पायांनी, हिरमुसल्या चेहऱ्याने मी कॉन्सुलेटमधून बाहेर पडलो. नौशील माझी वाट पाहत थांबला होता. रडवेल्या आवाजात मी वाईट बातमी सांगितली.

' मला व्हिसा मिळाला नाही. तुला? '

तर खांदे उडवून बेफिकीर आवाजात तो म्हणाला.

' मला पण मिळाला नाही. वी आर सेलिंग इन द सेम बोट! किंवा एकाच बोटीतले बुडालेले प्रवासी म्हणू या." आणि खो खो हसायला लागला. व्हिसा मिळाला, नाही मिळाला, त्याला काही फरक पडला नव्हता. माझ्या पाठीवर थापा मारत तो नेहमीच्या निष्काळजी सुरात म्हणाला,

" जाने दो यार! चल, घर चलते हैं!"

आणि आपल्याच मस्तीत चालायला लागला.

अमेरिकेचा व्हिसा मिळाला नाही म्हणून पहिल्यांदा खूप वाईट वाटलं. प्रचंड निराशा झाली. पण मग मी ठरवलं,

" असं होतं कधी कधी, आपण प्रयत्न सोडायचा नाही. "

नौशीलला मी सांगितलं, " मी व्हिसासाठी अर्ज करणार आहे. तू पण कर, आपला अर्ज आता नाकारला जाणार नाही, ह्यासाठी आपण आधीच नीट काळजी घेऊ. "

व्हर्जिनिया बाईचा मुद्दा मी नीट विचारात घेतला.

" तू भारतात परत येशील ह्याची खात्री काय? "

'तिची अशी खात्री पटली, तर ती व्हिसा देईल, ' असं माझं लॉजिक. 'तिची अशी खात्री पटविण्यासाठी काय करावं. ' असा आमचा उहापोह झाला ह्या बाबतीत अमेरिकेत गेलेल्यांचे काही अनुभव आम्ही विचारात घेतले.

कोणी तरी म्हणालं, "तुमची भारतातली सांपत्तिक स्थिती चांगली हवी. जमीनजुमला, बँक बॅलेंस अशा काही गोष्टी दाखवल्या तर व्हिसा मिळतो. " बँक बॅलंसच्या बाबतीत आनंद होता. पण जमीन जुमल्याबाबत काहीतरी थातूर मातुर तरी करता आलं असतं. मी बेळगावला गेलो. काकांशी बोललो, त्यांनी सांगितलं, " सांगली जिल्ह्यात, डिग्रज ह्या गावाला आपली एक पडीक छोटीशी जमीन आहे. जमिनीचे कागद पत्र घेऊन गावाला गेलो. तलाठ्याकडून पत्र घेतलं. आई वडिलांचं एक पत्र ॲफिडेव्हीट करून घेतलं.

' गावाला जमीन आहे, बेळगावात घर आहे, तेव्हा मी शिक्षण संपवून अमेरिकेहून नक्की भारतात परत येणार आहे. ' असा हवाला देऊन परत एकदा व्हिसासाठी अर्ज केला. नौशीलनंही केला.

संध्याकाळी परत एकदा आमचे नाकारलेले अर्ज आमच्या हातात आले. त्यावर व्हर्जिनिया बाईचा शेरा होता,

'नॉट सफिशियंट एविडन्स!"

' एवढा पुरावा पुरेसा नाही. '

सप्टेंबर महिना संपला. मला आता अनेक कारणांसाठी घोर लागला. अमेरिकेला जायचं होतंच, पण इथली पैशाची तंगी जास्त महत्वाची होती. मग मी शिकवण्या करायला लागलो. आणि अगरवाल क्लासेसमध्ये शिकवायलाही लागलो. प्रश्न थोडासा मिटला.

ऑफिसमधल्या जुन्या सहकाऱ्यांशी माझे चांगले संबंध होते, येण-जाणं होतं. त्यांच्यापैकी कोणीतरी मला एक मोलाची माहिती दिली. आमच्या ऑफिसचा असा एक नियम होता कि, एखाद्याने एकदा नोकरी सोडली असेल, तरी परत व्हेकन्सी झाली, तर ह्या माणसाला प्राधान्य द्यावं आणि परत घ्यावं. '

व्हर्जिनिया बाईंच्या समोर ठेवायला हा मुद्दा चांगला होता. 'गरजवंताला लाज बाळगून चालत नाही. ' असं म्हणत मी परत एकदा सोमण साहेबाना भेटायला गेलो.

त्या काळात मी दाढी मिश्या वाढवीत होतो आणि नोकरीवर जाणारा माणूस नसल्याने, जरा कॅज्युअल वेशभूषेत होतो. म्हणजे जीन्स आणि टी शर्ट.

माझ्याकडे पाहून सोमण साहेबांच्या चेहऱ्यावर तो एक खास (?) भाव झळकला. मी तिकडे दुर्लक्ष केलं, आणि सरळपणे माझी केस त्यांच्यापुढे मांडली.

" सर, मला अमेरिकेचा व्हिसा मिळाला नाही. "

ते टपलेलेच होते, मला मध्येच अडवून ते कुजकट स्वरात म्हणाले,

" कसा मिळणार? लुक अॅट यु! यु लुक लाईक ए ड्रग अॅडिक्ट, अनकेप्ट, अनकुथ!"

त्यांच्या म्हणण्याचा शब्दशः अर्थ असा कि, मी व्यसनी, बेडौल, हेंगडा, कुरूप, रांगडा आणि अव्यवस्थित दिसत होतो.

आधीच आनंदी आनंद! त्यात आज माझ्या अवतारामुळे त्यांना हातात कोलीतच मिळालं. त्यांचा आवेश ओसरला, तेव्हा शांतपणे माझं बोलणं सुरु केलं,

"सर, आपल्या ऑफिसचा असं एक नियम आहे कि...." वगैरे वगैरे.

" बरं मग? "

" अमेरिकेहून मी चार वर्षांनी पीएच. डी. करून आलो, तर मला बीएआरसीमध्ये परत नोकरी मिळेल, असं पत्र आपण मला द्याल का? मी विनंती करतो. "

आता मात्र ते हतबुद्ध झाले. क्षणभरच! मग ओरडून म्हणाले,

" यु आर इम्पोसिबल! माझ्याच ऑफिसचे नियम मला सांगतो आहेस? तुला असं कुठलंही हमीपत्र मिळणार नाही. यु मे गो नाऊ!"

परत एकदा, वाईट तोंड करून मी सोमण साहेबांच्या केबिन मधून बाहेर पडलो.

मग काही दिवसानी मी एका रासायनिक कंपनीत ओळख काढली. त्यांनी अगदी आनंदाने मला पत्र दिलं.

" हा मुलगा अमेरिकेहून पीएच. डी. करून आला की आम्ही ह्याला नोकरीवर घेऊ."

हुकुमाचा एक्का असावा, तसं हे पत्र मी माझ्या व्हिसा फाईलला जोडलं आणि परत एकदा व्हर्जिनिया बाईंच्या हातात माझं भविष्य सोपवून आलो. सोबत नौशील.

संध्याकाळी आपलं भविष्य जाणून घ्यायला, परत एकदा कॉन्सुलेटमध्ये गेलो तर व्हर्जिनिया बाईंच्या सुपरिचित अक्षरातला शेरा, “एवीडन्स नॉट सफिशीएन्ट! व्हिसा रिजेक्टेड!"

व्हर्जीनियाबाई दमतात की आपण हरतो. अशी जणू काही आमची चुरसच लागली होती. व्हिसा नाकारण्याची ही तिसरी वेळ. चौथ्या वेळी मी आणखी एक जालीम उपाय योजला. अमेरिकेत जिथे आम्ही जाणार होतो, त्या ॲक्रन युनिव्हर्सिटी मधले आमच्या विभागाचे प्रमुख डॉ. मायकेलं फारोन्हा ह्यांना मी पत्र पाठवलं.

व्हिसाची आत्तापर्यंतची रडकथा कळवून मी त्यांना विनंती केली कि, " डॉ. फारोन्हा, आपण मुंबईच्या अमेरिकन कौन्सलेटसाठी कृपया एक पत्र पाठवा. " ह्या दोन विद्यार्थ्यांची (नौशील आणि श्री ) आमच्या विभागाला गरज आहे. सप्टेंबरमध्ये नवीन टर्म सुरु झाली आहे. परंतु हे दोन पार्ट टाईम लेक्चरर अजून इथे न पोचल्याने ज्युनिअर कॉलेजच्या विद्यार्थ्यांची गैरसोय होत आहे. " असा मजकूर त्यात लिहावा. वगैरे वगैरे.

काही दिवसातच डॉ. मायकेलं फरोन्हांनी माझ्या सांगण्यानुसार अमेरिकन कॉन्सुलेटसाठी पत्र पाठवलं. त्यात त्यांनी असं लिहिलं कि,

" हे विद्यार्थी (नौशील आणि श्री ) खूप हुशार आहेत. त्यांना आम्ही एम. एस्सी. च्या लेव्हलची परीक्षा देण्यासाठी आणि पीएच. डी. करण्यासाठी, तसाच पार्ट टाईम लेक्चररचा जॉब करण्यासाठी स्कॉलरशिप दिली आहे. ते वेळेवर न आल्याने युनिवर्सिटीची गैर्सोय होते आहे. तरी कृपया, त्यांना लवकरात लवकर स्टुडन्ट व्हिसा देण्याची कृपा करावी."

आमची निराश झालेली मनं, ह्या पत्रामुळे परत उत्साहाने भरली. नव्या उमेदीनं आम्ही परत एकदा व्हिसासाठी अर्ज लिहिले. सोबत डॉ. फारोन्हांचं पत्र जोडलं. आणि कॉन्सुलेटमध्ये देऊन आलो. आता नकार मिळणार नाही, अशी खात्री होती, पण परत एकदा आमचे अर्ज व्हर्जिनिया बाईंनी फेटाळून लावले. कारण नेहमीचंच.

कधी नव्हे ते त्या दिवशी नौशील प्रचंड वैतागला. मला म्हणाला,

"श्री, मी आता परत अर्ज करणार नाही, तू माझ्या भानगडीत पडू नको. मरू दे तो व्हिसा आणि मरू दे ती अमेरिका!”

मी काही बोलण्याच्या मनःस्थितीत नव्हतोच!

१९७९ सालातला जानेवारी महिना अर्धा उलटला होता. पोटापाण्यासाठी शिकवण्या, नौशील बरोबर नाटक पाहणं आणि नाटक मंडळींबरोबर वावरणं असे सगळे उद्योग चालू होते. एक दिवस वाटलं, " चला, परत एकदा व्हिसासाठी अर्ज करूया. "

ह्या वेळी अर्ज सोबत जोडण्यासाठी कुठलीही नवीन कागदपत्रं नव्हती. कारण मला एकही नवा मुद्दा सुचला नव्हता.

तेव्हा मी व्हिसासाठी तयार केलेली जुनीच फाईल घेतली. फक्त अर्ज नव्याने भरला, आणि भल्या सकाळी अमेरिकन कॉन्सुलेटमध्ये नेऊन दिला. मग वेळ घालवायला जरा इकडे तिकडे हिंडलो. राज्य नाट्य स्पर्धेतलं एक नाटक पाहिलं, आणि दुपारी कॉन्सुलेटमध्ये परत गेलो. नेहमीच्या खिडकीपाशी पोचलो. व्हिसा रिजेक्ट झाला असणार, अशी खात्री होती. "येस? ", पलीकडून आवाज आला.

" सकाळी व्हिसासाठी अर्ज केला होता, ती कागदपत्र परत न्यायला आलो आहे. "

" व्हेअर इज युअर पासपोर्ट? "

मी गोंधळलो, " हे काय नवीन? "

पलीकडचा माणूस परत म्हणाला,

“वुई नीड युअर पासपोर्ट. " मला काही कळेना.

म्हटलं, " का? कशासाठी? "

जगातला सगळ्यांत बावळट माणूस आपल्या समोर उभा आहे, अशी पलीकडच्याची खात्री पटली असावी. तो उतावीळपणे म्हणाला, "व्हिसा स्टॅंप मारण्यासाठी! मिस्टर जोन्सन हॅज अप्रूव्हड युअर व्हिसा. "

मी न राहवून विचारलं,

" मिस्टर जोन्सन? पण माझी केस तर व्हर्जिनियाकडे होती. "

" मिस व्हर्जिनिया सुट्टीसाठी अमेरिकेला गेली आहे. तिचं काम मिस्टर जोन्सन करीत आहेत.

" तरीच! "

" काय? "

" काही नाही. "

पलीकडचा माणूस त्रासिकपणे म्हणाला,

" पासपोर्ट प्लीज!"

मी घाई घाईने म्हणालो,

" घेऊन येतो. सायनला घरी जाऊन पासपोर्ट घेऊन येतो. "

" लवकर या, दीड तासानं ऑफिस बंद होईल. "

" हो"

असं म्हणून मी बाहेर पळालो. टॅक्सीला हात करून टॅक्सीत बसलो. आणि मग एक दीर्घ मोकळा श्वास घेतला. गेल्या कित्येक महिन्याचं ओझं एका क्षणात डोक्यावरून उतरलं होतं. अमेरिकेला जायचा मार्ग मोकळा झाला होता. मुख्य म्हणजे माझी मानहानी टळली होती.

सायनला टॅक्सी उभी करून मी माझा पासपोर्ट घेऊन आलो आणि तसाच तडक परत महालक्ष्मीच्या दिशेने निघालो.

धापा टाकीत कॉन्सुलेटमधल्या खिडकीशी पोचलो. थरथरत्या हातानं पासपोर्ट पलीकडे सरकवला. १५ मिनिटांनी अमेरिकन व्हिसा स्टॅंप मारलेला माझा पासपोर्ट माझ्या हातात आला. तिथल्या तिथे उड्या मारून आनंद व्यक्त करण्याचा माझा विचार होता. पण म्हटलं, ' नको'. कॉन्सुलेटला तेवढंच निमित्त पुरायचं. मिळालेला व्हिसा रद्द व्हायचा.

बाहेर आलो आणि पहिल्यांदा नौशिलला फोन केला,

" हे, नौशील! ग्रेट न्यूज. मला व्हिसा मिळाला. "

त्याचा विश्वास बसेना. " कसा काय? "

" अरे. व्हर्जीनियाबाई अमेरिकेत आहे आणि तिच्या जागी काम करणाऱ्या मिस्टर जोन्सनना असं पटलं आहे की ठाणेदार आणि मेहता ह्या दोघांना अमेरिकेत जायलाच हवं. "

" काय सांगतोयस? "

" खरं तेच सांगतो आहे. उद्याच्या उद्या तूही व्हिसासाठी परत नवा अर्ज कर. "

शेवटी नौशीलनंही व्हिसासाठी अर्ज केला. आणि त्यालाही व्हिसा मिळाला.

दोन दिवसात सर्व चित्र पालटलं होतं. आमचं भवितव्य आता निश्चित झालं होतं.

व्हिसा मिळाला  तेव्हा वाटलं. ही बातमी सोमण साहेबाना सांगायलाच हवी.

मी परत एकदा सोमण साहेबांच्या केबिनमध्ये शिरलो. पूर्वी इतक्यांदा मी इथे आलो होतो. पण त्या प्रत्येक वेळी मला सोमण साहेबांकडून काहीतरी सोय, सवलत हवी होती. ह्या वेळी मी काहीही मागणार नव्हतो तर देणार होतो. एक चांगली बातमी. ह्या वेळी ते कसे वागतात, ते पहायची मला उत्सुकता होती.

सोमण साहेबाना अभिवादन करून मी ताडकन सांगून टाकलं,

" सर, मला व्हिसा मिळाला. आता लवकरात लवकर मी अमेरिकेला जाणार. "

ते चक्क हसून म्हणाले, " अभिनंदन"! आणि मग म्हणाले,

" अरे, माझ्या घरी ये संध्याकाळी!"

आता माझी बेशुद्ध पडायची पाळी. तरी स्वतःला सावरून मी कसा बसा पुटपुटलो,

" थॅंक्यु सर,! बघतो, जमलं तर येतो. "

" जमलं तर.. नाही. जमव. मी वाट बघतो आहे. "

सोमण साहेबांनी बेत पक्काच करून टाकला.

संध्याकाळी मी जरा घाबरत घाबरत त्यांच्या घरी पाऊल टाकलं. प्रथमच! श्री. आणि सौ. सोमण, दोघं माझी वाट पाहत होते.

दोघांनी माझं छान आगत स्वागत केलं. मिसेस सोमणांनी श्रीखंड पुरीचा बेत केला होता. सोमण साहेब हास्य विनोद करीत, इतकं छान बोलत होते की आधी मी नर्व्हसच झालो.

अगदी “हे चित्र पहा”, आणि " हे चित्र पहा" अशी गत होती. थोड्याच वेळान मात्र मीही त्या दोघांशी मोकळेपणी बोलायला लागलो. आणि मग आमच्यात छान गप्पा टप्पा झाल्या.

जेवण होऊन मी निघायला लागलो, तेव्हा सोमण साहेबांनी माझ्या हातात एक सुरेख आवरणात गुंडाळलेलं बक्षीस दिलं. म्हणाले, " यशस्वी हो". मी त्यांना पटकन वाकून नमस्कार केला आणि त्यांचा निरोप घेतला. त्यांचं हे रूप पाहिलं, बरं झालं, कारण माणुसकीवरचा माझा विश्वास दृढ झाला.

व्हिसा मिळाला म्हणून थोडा वेळ जमिनीवरून पाय सुटल्यासारखे झाले, पण मग भानावर आलो आणि लक्षात आलं. " परत एकदा पैशांची सोय करायला हवी. "

दोन संस्थांनी दिलेल्या एकूण वीस हजारातले, आता फक्त सात आठ हजारच शिल्लक होते. शिकवण्यांचं वगैरे येणं आलं, तेव्हा दहा हजार रुपयाचं अमेरीकेचं तिकीट काढता आलं. इतकंच नाही तर बेळगावला विमानाने जाऊन येता येईल, इतकेही पैसे होते.

वेळ कमी होता तेव्हा विमानाचं तिकीट काढून मी बेळगावला निघालो. हा माझा पहिला विमान प्रवास. विमानात बसण्याचा पहिला अनुभव म्हणून आनंद होताच. पण मनातली एक भावना अशीही होती की 'दाटून आलेलं मळभ जाऊन आता सुर्याचा लख्ख उजेड पडला आहे. थोड्याच दिवसात एका नव्या आयुष्याची सुरुवात होणार आहे. '

बेळगावला घरच्यांचा निरोप घेणं सोपं काम नव्हतं. मी सातासमुद्रापार भरारी घ्यायला सिद्ध! तर मी किती दूर जाणार, ह्यामुळे त्यांना काळजी आणि दुःख! इन्नी, काका, वीणा, रवी आणि मोठ्या बहिणीचा निरोप घेऊन मी मुंबईला परत आलो.

९ फेब्रुवारी १९७९! मी आणि नौशील न्यूयॉर्कच्या केनेडी इंटरनॅशनल एअरपोर्ट वर उतरलो आणि पहिलीच चांगली (?) बातमी कळली, की अॅक्रनला जाणारी आमची कनेक्टिंग फ्लाईट निघून गेली आहे. आता एक रात्र  हॉटेलमध्ये मुक्काम आणि दुसऱ्या दिवशी अॅक्रनला प्रयाण.

हॉटेलमध्ये जाण्यासाठी आम्ही एअरपोर्टच्या बाहेर आलो मात्र, न्यूयॉर्कमधल्या कडाक्याच्या थंडीने आमची दातखिळी बसली आणि गोठून बर्फ व्हायची पाळी आली.

बेळगावच्या थंडीला चालणारा माझ्या अंगातला स्वेटर, न्यूयॉर्कच्या थंडीत यत्किंचितही  उपयोगाचा नव्हता.

नवीन देशातल्या नवखेपणाचा अनुभव घेत, शेवटी आम्ही दोघं अॅक्रनला पोचलो. इथेही पहिलं दर्शन झालं ते बर्फाचं! आतापर्यंत बर्फ फक्त चित्रात पाहिला होता. किंवा बर्फाच्या गोळ्यात! आता ह्या बर्फवाल्या प्रदेशात पाय ठेवून काहीतरी करून दाखवायचं होतं.

मनाचा निश्चय करून मी ह्या नव्या देशातल्या, माझ्या पहिल्या गावात पाऊल टाकलं.









बालपणी इन्नी काकांसोबत

बेळगावचं घर , घरासमोर काका,

बीचवर पत्नी श्यामलसह,

काका, इन्नी, नील आणि श्यामलसह,

ॲक्रन एअरपोर्ट वर आम्ही उतरलो, बाहेर आलो, तर समोर चक्क एक भारतीय स्वागत समिती. खूप बरं वाटलं. ही इथली पद्धतच होती म्हणे. युनिव्हर्सिटीत कोणीही नवीन भारतीय येणार असेल, तेव्हा पाच पंचवीस जुनी जाणती भारतीय मुलं त्याला घ्यायला एअरपोर्टवर हजर व्हायची.

नाती गोती जोडायची आणि जपायची आपली ही खास भारतीय परंपरा. परदेशातही जपली जाते, ह्याचं कौतुक वाटलं.

स्वागत समितीशी गप्पा मारत युनिव्हर्सिटीच्या गावात पोचलो. तेव्हा स्वप्न खरं झालं ह्याचं समाधान होतं. त्याच बरोबर मनात खूप उत्सुकता आणि थोडीशी भीती, अशी एक संमिश्र भावना होती.

पहिल्या दिवशी एका भारतीय मुलाच्या घरातच मुक्काम केला. उद्यापासून कॉलेज, राहण्याची व्यवस्था, ॲक्रन गावाचा फेरफटका अशा अनेक गोष्टी करायच्या होत्या. प्रचंड दमणूक झाली होती. तरीही पहिली रात्र झोपेशिवायच गेली.

दुसऱ्या दिवशी अमेरिकेतल्या आयुष्याचा पहिला अनुभव घ्यायला एकटाच घराबाहेर पडलो. बर्फामुळे संपूर्ण आसमंत ब्लॅक ॲन्ड व्हाईट फोटोसारखा दिसत होता. आभाळाचा रंगही परिचयाचा नव्हता.

युनिव्हर्सिटीत जाऊन डॉ. फारेन्होना भेटलो. ते खुश झाले. त्यांनी मला इनॉर्गॅनिक केमिस्ट्री विभागातल्या कामकाजाची कल्पना दिली आणि ' उद्यापासून भेटू' असा निरोप घेतला.

इथेसुद्धा माझं आयुष्य मुंबईसारखंच कमालीच बिझी असणार, याची मला कल्पना आली. इथेही मला तिहेरी कामगिरी करायची होती. शिकणं, शिकवणं, अन इथल्या संस्कृतीची जमेल तेवढी ओळख करून घेणं.

एक आठवडा पार पडला, तोपर्यंत मला अनेक गोष्टींची जाणीव झाली होती. पहिला मोठा अडथळा पार करायचा होता, तो भाषेचा, खरं म्हणजे भाषा एकच इंग्रजी, पण ती देशागणिक किती बदलते, ते मला इथे आल्यावर समजलं. ह्या अमेरिकन लोकांचे उच्चार आणि त्यांचा ॲक्सेंट मला कळायचा नाही. तर माझी मराठी इंग्रजी, त्यांच्या डोक्यावरून जायची. म्हणजे माझे प्रोफेसर्स काय शिकवत आहेत, ते माझ्या लक्षात यायचं नाही आणि मी शिकवलेलं माझ्या विद्यार्थ्यांना उमजायचं नाही. सगळा घोळच घोळ!

साधी गोष्ट! मॅकडॉनल्डमध्ये खायला गेल्यावर तिथल्या मुलीनं विचारलं, " फॉर हिअर ऑर टू गो? " तर तिला नक्की काय म्हणायचं आहे, असा मला विचार पडायचा. बऱ्याच दिवसानंतर कळलं की ती विचारते आहे, " तुम्ही ऑर्डर केलेलं फूड इथे बसून तुम्ही खाणार? की पॅक करून घरी नेणार? "

आता पहा, साध्या चार शब्दांचा जर इतका काही वेगळा अर्थ असेल, तर संपूर्ण बोलणं समजायला किती वेळ जाईल?

सुरुवातीला या भाषेमुळे मला एकदमच टेन्शन आलं, म्हटलं 'आपलं कसं होणार ह्या देशात? ' पण मग मी शांतपणे विचार केला,

'इथे राहायचं आहे, शिकायचं आहे, काहीतरी मिळवायचं आहे, तर धीर सोडून चालणार नाही. कान उघडे ठेवायचे. दुसऱ्यांचं बोलणं नीट लक्षपूर्वक ऐकायचं. तसंच आपणही सावकाश बोलायचं. बोलण्यात साधे शब्द वापरायचे. ' स्वतःच स्वतःला सल्ला दिला, ते बरं झालं, काही दिवसातच मला त्यांचं बोलणं कळायला लागलं आणि त्यांना माझं!

खरं सांगायचं तर अमेरिकेला आलो, पीएच. डी करण्या करता! पण इथे पोचल्यानंतर पहिल्यांदा मला वेध लागले ते अमेरिका पाहण्याचे, अमेरिका समजून घेण्याचे! अभ्यासापेक्षा आणि शिकवण्यापेक्षा मला इंटरेस्ट होता, तो इथल्या नाटकात, सिनेमांत, म्युझिकमध्ये, एकूणच लाईफ स्टाइलमध्ये!

त्यासाठी पहिल्या प्रथम मी काय केलं असेल, तर गावातल्या लायब्ररीला भेट देऊन, तिथला सभासद झालो. अमेरिकेतली लायब्ररी म्हणजे केवळ पुस्तक मिळण्याचं एक ठिकाण किंवा पुस्तकांच्या देवाण घेवाणीसाठी उपयुक्त अशी संस्था नसते, तर हे एक महाप्रचंड संस्थान असतं. इथे पुस्तक तर मिळतातच, पण इथे निवांतपणे बसून तुम्ही इथल्या कॉम्प्यूटर्सवर काम करू शकता. सिनेमाच्या कॅसेट घरी नेऊ शकता. इथल्या पिक्चर लायब्ररीतून प्रत्येक आठवड्याला नवी पिक्चर फ्रेम घरी नेऊ शकता. इथे मुलांसाठी पुस्तकाचा स्वतंत्र विभाग असतोच. पण मुलासाठी खास खेळण्याचाही विभाग असतो. मुलांसाठी खास अशा कॉम्प्युटर्स वर खेळायची सोय असते. इथे फिल्म सोसायटी असते. इथल्या ऑडीटोरीयममध्ये सतत नवीन आणि दर्जेदार अशा फिल्म दाखवल्या जातात. इथे वर्षभर मुलांसाठी आणि मोठ्यांसाठी सण साजरे केले जातात. वेगवेगळया ॲक्टिव्हिटीज आयोजित केल्या जातात. आणि सर्वात महत्वाची गोष्ट म्हणजे ही सर्व सोय चकट फु!

ॲक्रनमधल्या लायब्ररीत मी जायला लागलो आणि अलिबाबाच्या गुहेत शिरल्यासारखी माझी अवस्था झाली. किती वाचू? किती पाहू? किती संगीत ऐकू? कितीही केलं तरी थोडंच होतं. मुंबईत असताना सांस्कृतिक श्रीमंतीची चटक लागली होती. तीच चटक मी इथेही कायम ठेवली. त्यासाठी लायब्ररी व्यतिरिक्त आणखीही बरीच ठिकाणं शोधली.

एक वेळ प्रोफेसरचं लेक्चर बुडवलं तरी चालेलं, पण गावातलं नाटक किवा म्युझिक कॉन्सर्ट किंवा आणखी काही प्रोग्राम असेल तर तो बुडवायचा नाही, असा मी मस्त आनंदात जगायला लागलो.

ह्या काळातली एक मजा आठवते. अमेरिकेत पाऊल ठेवल्या ठेवल्या भाषे इतकाच, इथल्या अन्नाचा मी धसका घेतला. कुठेही खा, काहीही खा. सर्व अळणीच लागायचं. बेळगावला मसालेदार आणि झणझणीत चवीची जिभेला सवय होती. इथेही काही केल्या मनाचं समाधानच व्हायचं नाही.

मग मी एक छान युक्ती शोधली. गावात एक इंडीयन स्टोअर होतं. तिथून मी लोणच्याची बरणी विकत घेतली आणि कायम जवळ बाळगायला लागलो. कुठेही गेलो आणि पिझ्झा किंवा बर्गर किंवा फ्राइड चिकन खात असलो, तरी त्यावर भरपूर लोणचं

घालायचं. लोणच्याच्या आस्वादाने माखलेला तो अमेरिकन पदार्थ जिभेला ठीक वाटायचा. हळू हळू मी जसा आचार विचाराने अमेरिकन झालो, तसंच जिभेनंही आपलं वळण बदललं.

अमेरिकेत येऊन एक महिना झाला आणि युनिव्हर्सिटीकडून पहिला पगार मिळाला. तीनशे डॉलर. इथल्या ह्या पहिल्या कमाईमधले पंचवीस डॉलर मी घरी बेळगावला पाठवले. उरलेल्या पैशामधून, एका रुमिंग हाउसमध्ये, एक खोली भाड्याने घेतली आणि स्वतंत्र एकटा राहायला लागलो.

आल्या आल्या भारतीय गोतावळयात राहिलो खरा! पण त्यांच्या काही गोष्टी मला रुचेनात. बहुतेक भारतीय विद्यार्थी आपापला असा एक कंपू आणि मिनी भारत तयार करायचे. विकएंडला कोणाच्या तरी घरी जमून, भारतीय जेवण बनवायचं, किंवा कॅसेट आणून हिंदी गाणी ऐकायची. ही त्यांची मजेची कल्पना!

कोणी कशी मजा करावी, हा ज्याचा त्याच्या मर्जीचा प्रश्न झाला. मला ह्या गोष्टी करण्यात फार मजा वाटत नव्हती. त्याशिवाय ह्या छोट्या छोट्या ग्रुपमध्ये चालणारं राजकारण, मत्सर, हेवेदावे आणि दादागिरी ह्या गोष्टीचा तर मला अगदीच तिटकारा!

त्यापेक्षा मला, नव्याने ओळख झालेल्या माझ्या अमेरिकन मित्रांबरोबर वेळ घालवायला खूप आवडायचं. त्याचं सर्व जगच खूप मोकळं ढाकळं आणि वेगळं होतं.

अमेरिकन मुलामुलींशी माझी ओळख आणि मैत्री वाढायला लागली. तेव्हा माझ्या भारतीय कंपूत एकदम हाहाकार माजला. ते मला नाना सल्ले द्यायला लागले.

“असं करू नको. तसं वागणं बरोबर नाही. ह्यांच्या सोबत जाऊ नको. तिच्याशी मैत्री करू नको. "

ते कदाचित आपलेपणाने सल्ला देत असतील, पण मला तो नाक खुपसेपणा वाटायचा. भारतीय जुन्या जाणत्या मुलांची ही दादागिरी मला रुचेना. ह्यावर उपाय एकाच होता, स्वतंत्र राहणे. मी तोच मार्ग पत्करला.

इथे आणखी एक गोष्ट मुद्दाम सांगायला हवी की ह्या छोट्याश्या काळात नौशील आणि मीही एकमेकांपासून हळू हळू पण खूप दूर गेलो. अमेरिकेत येताना सयामीज ट्वीनसारखे आलो. नंतर मात्र आमची सर्कल्स, ग्रुप्स वेगळे वेगळे झाले.

आमच्यात दरी निर्माण होण्याचं एक प्रमुख कारण, म्हणजे नौशील अमेरिकेत कधीच रमलाच नाही, त्याला इथल्या कुठल्याच गोष्टीत रस नव्हता. ना अभ्यासात, ना अमेरिकन जीवनात!

मला अमेरिकेतल्या अभ्यासाची गोडी अजून लागली नव्हती. पण मला अमेरिका खूप आवडली होती. घरची आठवण यायची, खूप एकटेपणा वाटायचा. तरीही ह्या देशात पाय रोवायला, इथले अजब गजब अनुभव घ्यायला मी उत्सुक होतो.

कारण काहीही असेल किंवा नसेल, पण महासागरात पडलेले दोन ओंडके हळूहळू एकमेकांपासून दूर जातात तसंच आमचं झालं. नौशील आणि मी वेगवेगळं आयुष्य जगायला लागलो. एका गावात असतो, तरी एकमेकांचे राहिलो नाही. चांगल्या आठवणी उरल्या. आमचं नातं उरलं नाही. ह्या अफाट देशात मी आता एकटा होतो. अगदी एकटा.

अभ्यासाकडे दुर्लक्ष करून, इतर अवांतर गोष्टींमध्ये लक्ष घातल्यानंतर दुसरं काय होणार? मुंबई युनिव्हर्सिटीत एमएससीला फर्स्टक्लास फर्स्ट आलेला मी, इथल्या पहिल्या सेमिस्टरच्या पहिल्या टेस्टमध्ये चक्क नापास झालो.

मला स्कॉलरशिप देणारे, डॉ. फारेन्हो घाबरले, काळजीत पडले.

' कसं होणार ह्या मुलाचं? '

त्यांनी मला बोलवलं. मला नीट समजावून सांगितलं. पण त्याचबरोबर एक गोष्ट ही स्पष्ट केली, 'जर पुढच्या टेस्टमध्येही तुझी प्रगती (?) अशीच असेल, तर तुझी स्कॉलरशिप जाईल. '

त्यांचा वडिलकीचा  सल्ला मी कदाचित एका कानाने  ऐकून दुसऱ्या कानाने सोडून दिला असता, पण 'स्कॉलरशिप जाईल' ह्या इशाऱ्याने चोख काम केलं.

मी ठरवलं, आता नीट मन लावून अभ्यास करायचा. नेमके त्याचवेळी माझ्या नशिबात, 'कुसका' ह्या नावाने, नावाला शोभणाऱ्या व्यक्तिमत्वाचे एक प्रोफेसर आले.

पहिल्याच भेटीत प्रोफेसर कुसका आणि मी, आमची खणाखणी झाली. हे नाटक कसं घडलं ते सांगण्याआधी, ते का घडलं हे पाहायला हवं.

बेळगावला कॉलेजमध्ये फर्स्ट इयरला होतो, तेव्हापासून मुंबईला एमएस्सी करेपर्यंत, मी कधीही अभ्यासाची पुस्तकं विकत घेतली नाहीत. त्याचं कारण बेळगावला माझ्या कॉलेजच्या दिवसांमध्ये, आमची घरची परिस्थिती कमालीची वाईट होती.

फ़र्स्ट इयरला आल्यापासून, मी अभ्यासाची माझी अशी एक पद्धत शोधली. वर्गात लेक्चर चालू असताना, विषयाची टिपणी काढायची. नंतर लायब्ररीत बसायचं. दोन चार पुस्तकातून त्या विषयाची संपूर्ण माहिती घ्यायची आणि स्वतःच्या नोट्स तयार करायच्या. कॉलेजच्या सहा वर्षाचा संपूर्ण अभ्यास मी लायब्ररीतल्या पुस्तकावरून केला. इतकंच नाही, तर विकत घेतलेल्या केवळ एकाच पुस्तकावरून अभ्यास करण्यापेक्षा, ह्या असं केलेला अभ्यास जास्त चांगला होतो, हे मला पटलं. बी. एसस्सी आणि एम. एस्सीला उत्कृष्ट मार्क्स मिळवून मी ते सिद्ध केलं.

तर सांगायची गोष्ट, आता मी पुस्तक विकत घेऊ शकत होतो, पण पुस्तक विकत घेण्याची मला सवय उरली नव्हती. आणि गरज भासत नव्हती. ह्या सर्व पार्श्वभूमीवर हे नवीन शिक्षक, प्रोफेसर कुसका वर्गात शिकवायला आले. क्वांटम मेकॅनिक्स हा त्यांचा विषय. शिकवायला सुरुवात करण्याआधी आल्याआल्याच ते म्हणाले,

" हं, चला, पुस्तकाचं पान ३४ उघडा. "

सर्व मुलांनी आपापल्या पुस्तकाचं ते पान उघडलं. माझ्याकडे पुस्तक नाही, हे कुसकांच्या लक्षात आलं. त्यांनी कडक शब्दात विचारलं,

" व्हेअर इज युअर बुक? "

मी आपलं खरं तेच सांगितलं.

" सर, आय डोंट हॅव अ बुक!"

ते कडाडले, " उद्या पुस्तक घेऊन ये, नाहीतर मी तुला क्लासमध्ये घेणार नाही. "

' मी पहिलीतला मुलगा नाही', हे स्पष्ट करणं आता जरुरीच होतं.

मी त्यांना म्हणालो, " सर, मला पुस्तकाची जरुरी वाटत नाही, कारण मी कधीच पुस्तकावरून अभ्यास करत नाही. "

माझं बोलणं नीटसं ऐकून न घेत, ते तिरसटपणे ओरडले, " ते मला काही सांगू नको. उद्या पुस्तक  नसेल तर क्लासमध्ये येऊ नको. "

मी म्हणालो, " सर, आपण मला असं सांगू शकत नाही. मी ह्या युनिव्हर्सिटीचा विद्यार्थी आहे. मला क्लासमध्ये बसण्याचा हक्क आहे आणि तो मी बजावणार.

ते क्षणभर गप्प झाले, माझ्याकडे रागाने बघत राहिले. पण मग मात्र त्यांनी खांदे उडवले आणि शिकवायला सुरुवात केली.

प्रोफेसर कुसकाना मी विद्यार्थ्याच्या हक्काची जाणीव करून दिली, ही बातमी सगळ्यांना कळली. बाकी कोणी ह्या संबंधात टीकाटिप्पणी केली नाही. पण भारतीय विद्यार्थ्यांनी मात्र टिपिकल भारतीय सल्ला दिला.

"प्रोफेसर कुसका बरोबर जरा जपून वाग. अशी वादावादी वगैरे करू नको. "

मी कोणाशीच वाद घालायला गेलो नाही. पण पुस्तक विकत न घेण्याचा माझा मुद्दाही सोडला नाही.

मी पुस्तक न घेता क्लासमध्ये येतो, हे प्रोफेसर कुसका पाहत होते. त्यांनी मला क्लासमधून बाहेर काढलं नाही, किंवा तशी धमकीही परत कधी दिली नाही. फक्त ते येताजाता मला टोमणे मारायचे, तिरकस बोलायचे. त्याचं उपहासानं भरलेलं बोलणं, मी शांतपणे ऐकून घेतलं. त्यावर मी कधी प्रत्युत्तर केलं नाही. त्याचबरोबर त्यांचा एकही क्लास बुडवला नाही.

सेमिस्टरमधली पुढची टेस्ट नीट पार पडली. प्रोफेसर कुसका आमच्या वर्गात रिझल्ट सांगायला आले. रिझल्ट सांगताना त्यांचा चेहरा पडलेला होता. त्यांच्या विषयात मला सर्वात जास्त मार्क्स मिळाले होते. मी उठून उभा राहिलो आणि विचारलं,

" सर, सेकंड हायेस्ट मार्क्स किती आहेत? "

त्यांनी खोल गेलेल्या आवाजात, माझ्या नंतर दुसऱ्या क्रमांकावर असलेल्या मुलाचे मार्क्स सांगितले. माझ्यापेक्षा त्याला किती तरी कमी मार्क्स होते.

मी हसून खाली बसलो. अभ्यास करण्याची माझी पद्धत योग्य आहे, हे मी परत एकदा सिद्ध करून दाखवलं होतं. कोणी काही बोलायची गरज नव्हती. पण माझा मुद्दा सर्व मुलांना कळला आणि प्रोफेसर कुसकाना ही तो उमजला.

एक गोष्ट मात्र आवर्जून सांगायला हवी की ' ह्या नंतर कुसकानी मला कधी टोकलं नाही.'

पुढे माझा पीएच. डी चा प्रबंध पूर्ण झाला. तेव्हा 'प्रोफेसर कुसका माझ्या परीक्षक वर्गाच्या पॅनेल वर असावेत, ' अशी मी युनिव्हर्सिटीला विनंती केली.

पुन्हा एकदा हितचिंतक भारतीय विद्यार्थ्यांचा कळकळीचा सल्ला!

' वेड लागलं आहे का? प्रोफेसर कुसका तुझ्या प्रबंधाची वाट लावतील!'

मी माझ्या विचारांशी ठाम होतो, मला खात्री होती, प्रोफेसर कुसका आकस ठेवून वागणार नाहीत. ते माझ्या प्रबंधाला योग्य तो न्याय देतील आणि तसंच झालं. प्रोफेसर कुसकांनी माझ्या प्रबंधाचं अतिशय चांगलं मूल्यमापन केलं.

परदेशात होतो. एकटा होतो, वयाची पंचविशी नुकतीच उलटली होती. प्रेमात पडण्यासाठी ह्याहून योग्य अशी कुठली वेळ असणार? तर अॅक्रनमध्ये मी पहिल्यांदा प्रेमात पडलो ती गोष्ट!

तसा ह्या आधी बेळगावला कोवळ्या वयात प्रेमाचा एक निसटता अनुभव आला होता. पण आता ते आठवलं की प्रश्न पडतो. ते नक्की प्रेमच होतं? की प्रेम ह्या कल्पनेवर केलेलं प्रेम होतं? बेळगावच्या कॉलेजमध्ये शिकणाऱ्या, सोळा सतरा वर्षाच्या आम्हा मुलांचा एक

ग्रुप होता. त्यातही मी सर्वात लहान! आमच्यापैकी एका मित्राचा मोठा वाडा होता आणि पहिल्या मजल्यावरच्या माडीवर त्याची एक स्वतंत्र खोली होती. ह्या खोलीत आम्हा पोरांचा अड्डा असायचा. आपापलं कॉलेज संपल्यावर इथे जमायचं आणि मग तरुणाईला शोभेलशी धमाल करायची.

ह्या खोलीच्या खिडकीसमोर, रस्त्याच्या पलीकडच्या घराची पहिल्या मजल्यावरची एक खिडकी यायची. मध्ये चाळीस फुट अंतर होतं. पण दोन्ही खिडक्यांमधून, दोन्ही घरांच्या समोरासमोरच्या खोल्यांमध्ये काय चालू आहे, ते स्पष्ट दिसायचं.

एकदा माझ्या लक्षात आलं की ह्या रस्त्या पलीकडच्या घरात एक तरुण मुलगी राहते, आणि आम्हा मुलांकडे तिचं बारीक लक्ष असतं.

आणखी काही दिवसांनी मला अजून एक गोष्ट कळली की इतर मुलांपेक्षा ती माझ्यावर नजर ठेवून असते. आणि मी जर इकडच्या खोलीत एकटा असेन तर, पलीकडच्या तिच्या खोलीत ती आरशात बघून नट्टा पट्टा करत राहते.

झालं, वयाच्या सोळाव्या वर्षी, आपण प्रेमात पडलो आहोत, अशी खात्री पटायला हा एवढा इशारा पुरेसा होता. आम्हा दोघांचा " आंखो आंखो में"चा अनोखा खेळ सुरु झाला. मी मुद्दाहूनच इतर मित्रांच्या आधी ह्या खोलीत हजर व्हायचा. तिकडे त्या खोलीत, ती माझ्याकडे पाहत वेणी घालणार, गळ्यात कानात दागिने घालणार आणि माझ्या पसंतीची अपेक्षा करणार. मीही आता धीट झालो. मी खुणेनेच तिला सुचवायला लागलो. ,

" एक वेणी नको, दोन वेण्या घाल, " किंवा, " हे कानातल नको, ते घाल. " वगैरे वगैरे.

मी तिच्यावर प्रेम करतो आणि ती माझ्यावर प्रेम करते. अशी माझी खात्री पटली होती. पण एवढं असून नजरानजरीच्या पलीकडे जाऊन काही करायची माझी हिम्मत नव्हती. तिनंही कुठलं धाडसी पाऊल उचललं नाही. इतकंच कशाला? दररोज नटून थटून झालं, की ती तिच्या आईबाबांबरोबर फिरायला बाहेर जायची. तेव्हा जर कधी मी समोरून आलो, तर ती मला ओळखदेखील देत नसे. दुसऱ्या दिवशी खिडकीत आली की मात्र माझ्यावर नजरेनंच प्रेमाचा वर्षाव. चाळीस फुटांवरून इशाऱ्या इशाऱ्यानं चाललेलं आमचं

प्रेम (?) कायम चाळीस फुटांवरच्या दोन खिडक्यांपुरतंच मर्यादित राहिलं. कधीतरी मी मित्राच्या घरी जायचा थांबलो. तिचं पुढे काय झालं ठाऊक नाही.

खास भारतीय संस्कृतीला शोभणार असं हे अबोध, निष्पाप, अस्पर्श प्रेम मी अनुभवलं होतं. त्या पलीकडे स्त्री पुरुषांची मैत्री किंवा इतर काही जवळचं नातं माझ्या जगात कधी निर्माण झालं नव्हतं. अमेरिकेला ॲक्रनमध्ये आलो. अमेरिकन मित्र मैत्रिणी झाल्या आणि इथल्या तरुण मुलांच्या जगात मी रमलो.

इथली मला सर्वात आवडलेली गोष्ट म्हणजे व्यक्तीस्वातंत्र्य. कोणी काहीही करा, कोणी कोणाला हसणार नाही. कोणी कोणावर टीका करणार नाही. तुमच्या आनंदासाठी तुम्ही जगायचं. मजा केली, तर मनसोक्त आनंद लुटतील. कामाच्या वेळी भरपूर काम करतील. अंगमेहनतीची कामंही सहजपणे पार पाडतील.

माझ्या अमेरिकन मित्रमैत्रिणी बरोबर मी जंगलात ट्रेकिंगला जायला लागलो. कनू (एक छोटीशी वल्हवायची बोट) घेऊन बोटिंगला जाण्यातही एक वेगळीच धमाल असायची. खळखळणाऱ्या नदीतून वल्हवीत वल्हवीत  बोट वेगानं पुढे न्यायची, अधून मधून दुसऱ्या बोटीला टक्कर देऊन ती उलटवायची, मूड असेल त्याप्रमाणे कधी डान्स पार्टी करायची, किंवा बिअर पीत मोकळया ढाकळया गप्पा मारायच्या. सुर्याखालच्या सर्व गोष्टींवर आमच्या चर्चा चालायच्या. एकमेकांच्या संस्कृतीची ओळख व्हायची.

प्रेमाचा किंवा लग्नाचा विषय निघाला की माझे अमेरिकन मित्र मला चिडवीत म्हणायचे, " तुम्ही भारतीय लोक प्रेमाशिवाय लग्न कसे करता? "

मी हसून उत्तर द्यायचो. " आम्ही लग्नानंतर एकमेकांच्या प्रेमात पडतो, म्हणूनच आमची लग्नं टिकतात. "

ह्यावर त्यांच्याकडे प्रतिप्रश्न नसायचा किंवा उत्तरही नसायचं.

इथली लग्नं  जुळविण्याची पद्धत अशी की वयात आल्यानंतर डेटिंग सुरु होणार. आपला पार्टनर निवडण्याची इथल्या मुलांना संपूर्ण मुभा असते, डेटिंग ह्याचा अर्थ ' प्रेमात

पडले' असं नाही. तर डेटिंग करत ही तरुण मुलं प्रेम शोधत राहतात. प्रेमाची खात्री पटली, तरच आयुष्यभर एकत्र राहण्याच्या आणा भाका होतात, लग्नं लागतात. अर्थात त्यानंतर ही लग्नं किती काळ टिकतील ह्याची काहीच गॅरंटी नसते. लग्नं मोडतात. मनात असलं, तर दोन्हीही व्यक्ती परत नव्या पार्टनरचा शोध घेतात. ह्याबाबतीत कधीतरी मीही माझ्या अमेरिकन मित्रांना विचारीत असे,

" काय रे? तुम्ही प्रेमात पडल्याशिवाय लग्नच करत नाही, तर मग इतकी लग्नं मोडतात कशी? "

ते शांतपणे म्हणायचे, " प्रेम संपलं म्हणून! आणि एकदा का प्रेम संपलं, की त्या लग्नाला, त्या एकत्र राहण्याला काय अर्थ आहे? असा खोटा संसार करण्यापेक्षा तो मोडलेलाच बरा!"

आता ह्यावर माझ्याकडे उत्तर नसायचं.

तर अशी मैत्री, प्रेम, लग्न ह्यावर चर्चा चालू असतानाच, कधीतरी मला ती भेटली.

मर्लिन.

ॲक्रनमध्ये मी ज्या रुमिंग हाउसमध्ये राहत होतो, तिथेच एका खोलीत ती राहत होती. ती घर सोडून पळून आली होती. सोळाव्या वर्षापासून एकटीच राहत होती.

आम्ही भेटलो, मैत्री झाली, एकमेकांबद्दल आपुलकी वाटायला लागली, एकमेकांशी मनमोकळेपणाने बोलताना तिची जी माहिती कळली, ती मन विषण्ण करणारी होती.

मर्लिन लहान असतानाच तिचे आई वडील वेगळे झाले. आईने दुसरा घरोबा थाटला. हे सावत्र वडील मर्लीनला खूप छळायचे, त्रास द्यायचे. शेवटी असह्य झालं आणि वयाच्या केवळ सोळाव्या वर्षी तिनं घर सोडलं. त्यावेळी तिचं शाळेचं शिक्षणही पूर्ण झालं नव्हतं.

सोळा वर्षाची मुलगी एकटी राहणार, तेव्हा ती काहीशी भरकटणार, वाहवत जाणार, हे अटळ होतं. तिच्यासारख्याच काही दिशाहीन टोळयांनी तिला आसरा दिला.

तिथे तिला दारू आणि अमली पदार्थांची चटक लागली. मला भेटली, तेव्हा ती ॲक्रन मधल्या एका रेस्तराँमध्ये रात्रीच्या वेळी वेट्रेस म्हणून काम करीत होती. आता तिला पोटापाण्याची चिंता नव्हती, पण ज्या एका भटक्या विमुक्त पद्धतीने ती जगत आली होती, ती तिला सोडताही येत नव्हती.

तिच्या आणि माझ्यात काहीच साम्य नव्हतं. कौटुंबिक पार्श्वभूमी, संस्कृती, शिक्षण सर्व बाबतीत आमच्यात जमीन अस्मानाचा फरक होता. पण आम्ही एकमेकांकडे आकर्षित झालो आणि एकमेकांच्या प्रेमात पडलो.

हे क्षणिक आकर्षण नव्हतं. जवळ जवळ वर्षभर आम्ही भेटत होतो. एकमेकांबद्दल विश्वास आला तेव्हा आम्ही लग्न करायचं ठरवलं. ह्या सर्व काळात माझं शिक्षणावरच लक्ष पूर्णपणे उडालं. पी एच डीसाठीचा प्रबंध आणि त्या बाबतीतील संशोधन बाजूला राहिलं. दिवस रात्र माझ्या डोक्यात मर्लिन. आमचं लग्न, आमचा संसार हेच विचार.

गंमत म्हणजे मी स्वतःच्या शिक्षणाकडे दुर्लक्ष करीत होतो तेव्हा मर्लिनला मात्र मी उपदेश करीत होतो, की ' तिनं आपलं, शाळेचं राहिलेलं शिक्षण पूर्ण करावं' त्याशिवाय ' तिनं दारू आणि अंमली पदार्थाचा व्यसन सोडावं. त्यासाठी डॉक्टरांची मदत घ्यावी. आपली काहीतरी करिअर निश्चित करावी आणि इन जनरल स्वतःचश आयुष्य मार्गावर आणावं. ' असंही मी तिला समजावीत असे.

तिला माझं बोलणं पटायचं. त्याप्रमाणे वागायचा ती प्रयत्नही करायची. पण कधीतरी तिच्या डोक्यावर भूत सवार व्हायचं आणि मग ती आपल्या व्यसनाच्या आहारी जायची. चार दिवसांनी ताळयावर आली की अपराधाच्या भावनेनं पछाडलेली, ' मी आता नीट वागेन' असं निश्चय करणारी.

मला तिची खूप काळजी असायची.

दिवसरात्र तिच्या बरोबर रहावं, तिला सांभाळावं, तिला आधार द्यावा. अशी माझी धडपड चालायची. माझ्या धडपडीला यश आलं. मर्लिन हळू हळू मार्गावर आली, नव्या उमेदीने जगण्याचा प्रयत्न करायला लागली. आमचे लग्नाचे बेत पक्के झाले. आणि मग एक दिवस, मर्लिन ह्या गावातून माझ्या आयुष्यातून निघूनच गेली. जाताना माझ्यासाठी एक चिठ्ठी ठेवून गेली. त्यात तिनं म्हटलं होतं,

*" आय एम सॉरी, श्री! पण आपण कायमचे एकत्र येऊ शकणार नाही आणि आलो, तरी सुखी होणार नाही हे माझ्या लक्षात आलं आहे. तुझं आयुष्य फार वेगळं आहे. मी मात्र अगदीच निराळ्या प्रकारचं आयुष्य जगत आले आहे आणि तशीच जगत राहणार. तुझ्या साथीनं मी तुझ्या जगात येण्याचा प्रयत्न केला, पण मला ते जमलं नाही.*

*मी माझ्या पूर्वीच्या जगात परत जात आहे. इथून मला मागे फिरता येणार नाही. थॅंक्स फॉर एव्हरीथिंग*

*गुड लक अॅंड गुड बाय!*

*मर्लिन.*

हा धक्का अनपेक्षित होता. बरेच दिवस मी नुसता सैरभैर झालो. वेड्यासारखा दिवसेंदिवस तिला शोधत हिंडलो. अभ्यासात तर लक्ष नव्हतंच. आता खाण्यापिण्यात नि जगण्यात रस वाटेना.

मर्लिनचा स्वतःवर विश्वास नव्हता. पण मी तिच्यावर खरं प्रेम केलं होतं. तिच्याबरोबरच्या लग्नाची आणि संसाराची, काय काय स्वप्नं पाहिली होती. कुठल्याही दुःखावर काळ हे एक जालीम औषध असतं. तसा मी मर्लीनला बाजूला ठेवून स्वतःचा विचार करायला सुरुवात केली.

पण पहिल्या प्रेमाचा हा उत्कट अनुभव मला कायम घायाळ करून गेला, एवढं खरं!

पहिल्या प्रेमाची एक कथा झाली, आता आणखी एक प्रेमकथा. आता तुम्ही म्हणाल, "पहिली प्रेमं आहेत तरी किती? आणि अशी ती अनेक आहेत, तर ती सर्व पहिली प्रेमं कशी?"

प्रश्न बरोबर आहे. पण माझं विधानही बरोबर आहे. कारण ही पहिल्या प्रेमाची नवीन कथा आहे, ती माझ्या गाडीची! माझ्या पहिल्या गाडीची.

अमेरिकेत ॲक्रनमध्ये येऊन वर्ष उलटून गेलं आणि मग मात्र मी धीर करून ठरवलं. आता गाडी घ्यायचीच!

अमेरिकेत गाडी नसेल, तर तुम्ही लुळे, पांगळे किंवा भिकारी! न्यूयॉर्कसारखी काही शहरं सोडली, तर कुठेही पब्लिक ट्रान्सपोर्ट जवळजवळ नाही. त्यामुळे स्वतःचं वाहन असलंच पाहिजे.

मी एक वर्ष कसंबसं काढलं. तोपर्यंत पैशाचं गणित बऱ्यापैकी जमलं आणि मग मी माझी पहिली गाडी घेतली. एका चायनीज मुलानं त्याची जुनी इम्पाला गाडी मला दोनशे डॉलरना विकली. गाडी आणून त्याने माझ्या घराशेजारच्या पार्किंग लॉटमध्ये उभी केली.

त्यानंतर बरेच दिवस ही गाडी त्याच ठिकाणी जागच्याजागी उभी राहिली. म्हैस घेतल्यानंतर आपण तिला गोठ्यात बांधून ठेवतो, तशीच ही गाडी! पार्किंग लॉटमध्ये बांधलेली.

घरातून जाता येताना मी न चुकता तिच्याकडे एक कौतुक भरला कटाक्ष टाकायचो. पण त्यापलीकडे जाऊन ती चालवायची तर बातच सोडा, तिला हातही लावायला मी कित्येक दिवस धजलो नाही.

त्याची कारण दोन. एक म्हणजे मला गाडी चालवता येत नव्हती आणि दुसरं कारण म्हणजे मी चक्क गाडी घेतली, हे मला अजूनही खरं वाटत नव्हतं. मी गाडी घेईन असं कधी स्वप्नच पाहिलं नव्हतं. त्यामुळे गाडी म्हणजे काहीतरी विलक्षण श्रीमंती थाट, एक अप्राप्य मौल्यवान वस्तू, अशी काही समीकरणं मनात घट्ट बसली होती.

ही माझी पहिली गाडी जुनी असली तरी आकाराने भली मोठी होती. त्यातून ती इम्पाला. म्हणजे मुंबईला फक्त सिनेनटांच्या भाग्यात लिहिलेली.

शेवटी एकदाचा माझा माझ्या भाग्यावर विश्वास बसला, तेव्हा धीर करून मी गाडीचं दार उघडलं. ड्रायव्हरच्या सीटवर बसलो, ' इग्निशन कि' लावून गाडी स्टार्ट केली आणि... बंद केली. बस! पहिल्या दिवशी ड्रायव्हिंगचा एवढाच पाठ. काही दिवसांनी मी गाडी स्टार्ट करून बंद करण्यात एक्सपर्ट झालो. मग एकदा गाडी गिअरमध्ये टाकून काही फुट पुढे नेली, काही फुट मागे आणली. हा पाठ गिरवायला बरेच दिवस गेले.

आता मात्र ड्रायव्हिंग शिकणं आवश्यक होतं. लट्ठ फी भरून मी एका ड्रायव्हिंग स्कूलमध्ये नाव घातलं. थोडे लेसन्स घेतले आणि मग प्रथम लेखी परीक्षा द्यायला गेलो. मनात उगाचच भयंकर भीती होती. तसंच घडलं.

एम. एस्सी. होऊन पी, एच डी. करणारा मी! ह्या ड्रायव्हिंगच्या लेखी परीक्षेचा पेपर सोडवणं, मला काही जमेना. शेवटी तिथल्या परीक्षक मुलीलाच माझी दया आली. तिनं मला मदत केली आणि पास होण्यापुरती उत्तरं माझ्याकडून लिहवून घेतली. बळे बळे ढकलल्यासारखा मी काठावर का होईना, ही लेखी परीक्षा पास झालो.

आता ड्रायव्हिंग टेस्ट! तिथे मात्र कोणी हरीचा लाल माझ्या मदतीला आला नाही आणि मी एकदा नव्हे, तर दोनदा ह्या परीक्षेत नापास झालो.

गाडीचा इन्शुरन्स काढायला गेलो, तर इन्शुरन्सचा आकडा ऐकून मला झीट आली. दोनशे डॉलर्स! म्हणजे गाडीची आणि इन्शुरन्सची किंमत एकच! ही किंमत मला परवडणार नव्हती.

शेवटी ठरवलं, मरो तो विमा आणि नको ते ड्रायव्हिंग लायसन्स!आपण सरळ गाडी चालवायला सुरुवात करायची. तशी मी बेधडक सुरुवात केली. आणि गावात गाडी चालवायला लागलो. पोटात बाकबूक होतं असायचं! अमेरिकेसारख्या कडक, कायदेशीर कारवाई होणाऱ्या देशात मी बेकायदेशीर ड्रायव्हिंग करत होतो. काहीही शिक्षा झाली असती.

देवावर भरवसा ठेवला, पण देव तरी असा चुकीचा पायंडा पाडणाऱ्याला उत्तेजन कशाला देईल? तो काही माझ्या मदतीला आला नाही आणि मी आपला चुकत माकत नि ठोकत गाडी चालवीत राहिलो.

मनात टेन्शन असताना गाडी चालविल्यामुळे मी करायला नको अशा सर्व चुका केल्या. म्हणजे बर्फ पडलेला असताना गाडी चालवत असलात, तर जोरात ब्रेक्स लावायचे नाहीत. मी नेमके जोरात ब्रेक्स लावले, गाडी स्किड झाली. मी वाचलो एवढंच काय ते नशीब! नो पार्किंग झोनमध्ये गाडी पार्क केली, म्हणून पोलिस मामानी गाडीवर तिकीट चिकटवलं. कधी रिव्हर्स घेताना अंदाज न आल्याने दुसऱ्या गाडीला प्रेमळ धक्का दिला आणि मग भरघोस नुकसान भरपाई द्यावी लागली. शेवटी परत एकदा तिसऱ्यांदा ड्रायव्हिंग टेस्ट

द्यायला गेलो आणि हुश, पास झालो. ड्रायव्हिंग लायसन्स खिशात आलं, तेव्हा त्या मानसिक आधारानेच माझं ड्रायव्हिंग सुधारलं. गाडीचा, रस्त्याचा, वेगाचा अंदाज आला. अगदी सरावलोच म्हणा ना!

आणि मग एकदा गाडीचा फ़्युएल पाईप गळायला लागला. दुरुस्तीसाठी मेकॅनिककडे गेलो तर तो म्हणाला, " दुरुस्तीला २०० डॉलर्स लागतील. "

मी कपाळावर हात मारला. मनात म्हटलं, " ह्या गाडीचा आणि दोनशे डॉलर्सचा काहीतरी घनिष्ट संबंध दिसतो आहे!" तो असू द्या, पण माझ्यासाठी दोनशे डॉलर्स म्हणजे महिन्याच्या पगारातील दोनतृतीयांश एवढी भारी रक्कम!

मी मुकाट्याने गाडी वळवली आणि घरी परत आणली. दोन तीन दिवस गेले. गाडीचा फ़्युएल पाईप गळतच होता आणि अचानक मला एक छान चमकदार कल्पना सुचली. ' गाडीच्या फ़्युएल पाईप सारख्या अनेक रबरी नळया आम्ही आमच्या प्रयोगशाळेत वापरायचो. त्यातली एखादी नवी फ़्युएल पाईप म्हणून वापरली तर? '

मी फ़्युएल पाईपच्या जाडीची एक रबरी नळी प्रयोगशाळेतून घेऊन आलो. गाडीच्या फ़्युएल पाईपच्या जागी ती बसविण्यात मी यशस्वी झालो. काम अगदी परफेक्ट झालं. मुख्य म्हणजे फुकटात झालं, मी स्वतःवर भयंकर खुश!

एक महिना गेला असेल. परत एकदा गॅस (अमेरिकेत पेट्रोलला गॅस म्हणतात. ) गळण्याचा वास. मी परत नळी बदलली. असं आणखी एकदोन वेळा झालं. प्रयोगशाळेतील नळी फार टिकत नसे. मी म्हटलं, ' नळी परत परत बदलायची. आहे काय नि नाही काय? '

एक दिवस सकाळी माझा एक मित्र आला, त्याने युनिव्हर्सिटीपर्यंत लिफ्ट मागितली. आता मी गाडीवाला असल्याने बिनगाडीवाले माझ्याकडे लिफ्ट मागायचे. मी अर्थातच उदारपणे आणि ऐटीत लिफ्ट देत असे.

तर हा माझा मित्र आणि मी गाडीनं युनिव्हर्सिटीच्या दिशेने निघालो. मध्येच मला जाणवलं की माझ्या पाया जवळून धूर येत आहे. मी गाडी थांबवली, आम्ही खाली उतरलो.

' काय प्रॉब्लेम आहे? ' असा विचार मनात यायला आणि गाडीने पेट घ्यायला एकच गाठ. आम्ही घाबरलो. लांब पळालो. पुढच्याच क्षणी एक प्रचंड मोठा आवाज झाला आणि संपूर्ण गाडी ज्वालांनी लपेटून गेली.

अगदी सिनेमातल्यासारखं दृश्य. पण हे दृश्य माझ्या आयुष्यात माझ्यासमोर घडत होतं. मला जबरदस्त धक्का बसला. आणि खूप दुःखही झालं.

मग पोलिस आले. चौकशी झाली. निष्कर्ष असा निघाला कि, 'गाडीचा फ़्युएल पाईप विरघळला आणि गाडीला आग लागली.'

मी गाडीबाहेर पडलो म्हणूनच वाचलो. एक गोष्ट कोणाला बोललो नाही. ' पैसे वाचविण्यासाठी काहीतरी प्रयोग केला. पण त्यामुळे जीव जायची पाळी आली. माझी आणि माझ्याबरोबर माझ्या त्या मित्राचीही'! मग मनाशी खुणगाठ बांधली, ' पुन्हा असला नसता उपद्व्याप करायचा नाही.' शेवटी ती गाडी अमेरिकन भाषेत "टोटल " झाली. म्हणजे आपल्या माय भाषेत 'संपूर्ण संपली किंवा मेली'. ती गाडी भंगारवाल्याने विकत घेतली आणि माझ्या हातावर वीस डॉलर्स ठेवले. मी हसलो. कारण वीस डॉलर्स म्हणजे दोनशे डॉलर्सच्या दहा टक्के इतकी रक्कम! हा केवळ योगायोग? की त्या गाडीचा संख्यायोग.

नंतर आयुष्यात खूप चांगले दिवस आले. मर्सिडीज, लेक्सस अशा अनेक अलिशान गाड्या मी घेतल्या. पण त्या जुन्या इम्पालाने मला जो आनंद दिला, तो परत कधीच वाट्याला आला नाही.

विभागप्रमुख डॉ. फारोन्हा ह्यांनी एक दिवस मुद्दाम निरोप पाठवून मला बोलावून घेतलं. मी त्यांना भेटायला गेलो. त्यांचा चेहरा गंभीर होता. मला बसण्याची खुण करून ते क्षणभर माझ्याकडे पाहत राहिले आणि मग त्यांनी एकदम मला विचारलं,

" श्री, तू अमेरिकेला कशासाठी आला आहेस? "

मी पोपटपंची केल्याप्रमाणे म्हणालो, " इनॉर्गॅनिक केमिस्ट्रीमध्ये पीएच. डी. करायला. "

" खरंच? मला वाटलं... "

ते माझ्याकडे रोखून पाहत होते. त्यांनी न बोललेले शब्द मला कळले.

मी आणि नौशील दोघांना त्यांनीच स्कॉलरशिप दिली होती. आम्ही अमेरिकेत लवकर यावं म्हणून त्यांनीच खटपट केली होती.

पण इथे आल्या नंतर नौशील काही न करताच एक वर्षात परत गेला होता. आणि मी? आम्ही दोघं नुसते मजा करायलाच अमेरिकेत आलो, असं त्यांना वाटत असेल, तर त्यात त्यांचा दोष नव्हता. त्यांना काय म्हणायचं आहे, ते मला कळलं आहे, हे त्यानाही कळलं. मग ते समजावणीच्या सुरात म्हणाले, , "श्री, तुला इथे येऊन दीड वर्ष झालं, तू क्लासमध्ये येतोस, टेस्टमध्ये ए ग्रेड मिळवतोस, सर्व कबुल. पण हे पुरेसं नाही. तुझ्या प्रबंधाचं काय? "

मी गप्प. काही क्षण अवघडलेली शांतता. मग ते पुढे म्हणाले, " तुझ्या बरोबर आलेल्या मुलांचा अर्धाअधिक प्रबंध पूर्ण झाला. तुझा कुठपर्यंत आला आहे? "

सुज्ञास अधिक सांगणे न लगे!

मी अपराधी स्वरात म्हणालो, " आता उद्यापासून कामाला लागतो सर!"

" नुसतं आश्वासन नको, तुझं काम दिसू दे. "

" येस सर!"

डॉ. फारोन्हाच्या खोलीतून मी बाहेर पडलो आणि युनिव्हर्सिटीतल्या बागेत एका निवांत कोपऱ्यात बसलो.

' डॉ. फारोन्हानी आज मला टोकलं, अगदी बरोबरच केलं. इथे येऊन दीड वर्ष मी काय केलं? ' कशाच्या मागे लागलो? 'प्रेम? उनाडक्या? नाटक, सिनेमा? अमेरिकन लाइफ

स्टाइल? ह्यासाठी आलो का मी इथे? तिकडे इन्नी आणि काका मी यशस्वी होईन म्हणून उत्सुकतेने, आशेने, धीराने वाट बघत आहेत. इकडे डॉ. फारोन्हाना काळजी वाटते आहे. त्यांना कदाचित पश्चात्ताप होतं असेल की कशाला मी ह्याला स्कॉलरशिप दिली? जर त्यांना असं वाटलं असेल, तर ती सर्वस्वी माझी चूक आहे. ती चूक मी सुधारायला हवी, लवकरात लवकर!

स्वतःच स्वतःच्या वागण्याचं ॲनालिसिस केलं, चूक काय, योग्य काय? हे ठरवलं. आणि परत एकदा निश्चय केला, आता उद्यापासून दिवस रात्र फक्त प्रबंध आणि प्रबंध.

अधून मधून वाहवत गेलो. तरी जेव्हा मी मनापासून एखादी गोष्ट ठरवतो, तेव्हा ती गोष्ट मी करून दाखवतो.

दुसऱ्याच दिवसापासून मी परत एकदा माझ्या प्रबंधाकडे वळलो. ' बॅटरिज किंवा कॉंटॅक्ट लेन्सेंसमध्ये वापरली जाणारी नवीन प्रकारची पॉलीमर्स ' हा माझ्या संशोधनाचा विषय होता. प्रयोगशाळा आणि लायब्ररी ह्या दोन ठिकाणी मी अक्षरशः मुक्काम ठोकला. एक वर्ष मी जराही इकडे तिकडे पाहिलं नाही.

१९८२ सालची गोष्ट. प्रबंध आता बराच आटोक्यात आला होता. काम संपवायला मी अधीर झालो होतो आणि उन्हाळ्याची सुट्टी सुरु झाली. ॲक्रनमधली उन्हाळ्याची ही चौथी सुट्टी. सर्वसाधारण विद्यार्थी ह्या सुट्टीची वाट पाहतात. तर आमच्यासारख्या स्कॉलरशिपवर जगणाऱ्या परदेशी विद्यार्थ्यांना मात्र ' सुट्टी केव्हा संपते? ' असं होऊन जातं. कारण एकतर आम्हाला घरी जायचं नसतं. दुसरीकडे फिरायला जाणं परवडणार नसतं आणि सर्वात वाईट गोष्ट म्हणजे सुट्टीचे तीन महिने स्कॉलरशिप बंद! ह्या काळात जगण्यासाठी ज्याला जे जमेल ते त्यानं करावं.

मला आठवतंय, पहिल्या उन्हाळ्याच्या सुट्टीत मी प्रथमच, वेटर म्हणून काम केलं. तासाला चार डॉलर्स मिळायचे. काम मी आवडीने केलं. पण ते सोपं नव्हतं. गिऱ्हाईकांशी बोल. ऑर्डर घ्या. ऑर्डर आणा. मी आपला जरा जपून जपून इकडे तिकडे पाहून हे काम शिकलो. माझ्या बरोबर काही तरबेज वेटर्स एका वेळी, एका हातावर दहा दहा प्लेट्स रचायचे आणि मोठ्या कौशल्याने तोल सांभाळत, हा उंच डोलारा इकडून तिकडे न्यायचे.

मला ह्या गोष्टींचं खूप कौतुक वाटायचं. 'आपल्यालाही प्लेट्सचा असा उंच डोलारा इकडून तिकडे नेता आला पाहिजे' अशा महत्त्वाकांक्षेने मी अगदी झपाटला गेलो. सुरुवातीला दोनतीन प्लेट्स एकावर एक रचून नेण्याची प्रॅक्टिस केली. मग एक दिवस टेचात एका हातावर एक अशा दहा प्लेट्स रचल्या आणि तोल सांभाळीत किचनकडे जायला लागलो. इतर वेटर्स माझ्याकडे कौतुकाने पाहायला लागले. एका हातावर प्लेट्सचा उंच डोलारा सावरीत मी किचनच्या दारात पोचलो, तेवढ्यात मागून कुणीतरी आलं, माझं एकाग्र चित्त ढळलं आणि..... धडाड.... सर्व प्लेट्स खाली पडून ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या. मग काय? रेस्तरॉंच्या मालकाचे पाय धरणे, माफी मागणे वगैरे नाटक! सुदैवाने तो मालक बरा होता आणि त्यानं नुकसान भरपाई न मागता मला माफ केलं.

आणि आता माझी पीएच. डी. अगदी संपत आलेली असताना, मधेच खीळ घालणारी ही आणखी एक उन्हाळ्याची सुट्टी! ह्यावेळी माझ्यासमोर मोठा प्रश्न होता की 'तीन महिने' घराचं भाडं कुठून भरू? ' सध्याच्या माझ्या घराच भाडं होतं महिन्याला १३५ डॉलर्स. खाणं पिणं कसं तरी भागवता आलं असत. पण तीन महिने स्कॉलरशिप नसताना हे भाडं देणं मला शक्यच नव्हतं.

गरज ही शोधाची जननी असते. तसा मी एक शोध लावला. 'आपण केमिस्ट्री विभागाच्या बिल्डींगमध्ये राहू शकतो.. ' कितीही विचित्र वाटली तरी ही गोष्ट सहज शक्य होती.

दिवस रात्र संशोधन आणि प्रयोग करत असल्यामुळे माझ्याकडे केमिस्ट्री विभागाच्या बिल्डींगची एक किल्ली होती. पीएच. डी. करणाऱ्या विध्यार्थ्यांना प्रयोगशाळेत हवा तेवढा वेळ काम करता यावं, म्हणून विद्यापीठाने ही सोय केली होती. माझ्यासारखे आणखीही काही विद्यार्थी प्रयोगशाळेत उशिरापर्यंत काम करीत असायचे, किंवा रात्री उशिरा प्रयोग करायला यायचे.

ह्या बिल्डींगमध्ये एक कॉन्फरन्स रूम होती आणि ह्या रूमच्या शेजारी आंघोळही करता येईल असं एक सुसज्ज प्रसाधन गृह होतं. कॉन्फरन्स रूममध्ये दिवसा भाषण, परिसंवाद असं काही ना काही चालू असायचं. पण रात्री मात्र तिथे कोणीही नसायचं.

मी ठरवलं, उन्हाळयाचे तीन महिने आपण रात्रीच्या वेळी कॉन्फरन्स रूममध्ये झोपायचं. मग दुसऱ्या दिवसापासून मी माझं भाड्याचं घर सोडलं. सामान सुमान फारसं नव्हतंच. थोडं अवजड सामान आणि काही कमी गरजेच्या वस्तू एका मित्राच्या घरी नेऊन ठेवल्या. चार अत्यंत गरजेच्या वस्तू, चार कपडे आणि एक स्लीपिंग बॅग असं मोजकं सामान गाडीत ठेवलं.

प्रयोगशाळेत दिवसभर काम केलं. संध्याकाळी खाऊन पिऊन परत आलो. माझ्या जवळच्या किल्लीने बिल्डींगमध्ये प्रवेश केला. संपूर्ण बिल्डींगमध्ये मी एकटाच होतो. गाडीतली स्लीपिंग बॅग आणि इतर सामान घेऊन मी कॉन्फरन्स रूममध्ये गेलो. तिथलं कोपऱ्यातलं एक कपाट उघडून त्यात सर्व सामान लावून टाकलं.

त्या रात्री उशिरापर्यंत प्रयोगशाळेत काम केल्यावर कॉन्फरंस रूममध्ये मी माझी स्लीपिंग बॅग पसरली आणि मस्तपैकी झोपलो. सकाळी सातपासून बिल्डींगमध्ये वर्दळ सुरु व्हायची, हे मला माहित होतं. मी त्या आधीच उठलो. कॉन्फरन्स रूमच्या शेजारी असलेल्या प्रसाधन गृहात अंघोळ, दाढी असं सकाळचं आन्हिक उरकलं आणि मग शांतपणे बिल्डींगच्या बाहेर पडलो. खाणंपिणं उरकून परत राजरोसपणे प्रयोगशाळेत हजर.

पहिला दिवस किंवा पहिली रात्र म्हणू या हवं तर, ही अशी ठरविल्याप्रमाणे बिन बोभाट पार पडली. आणि माझा आत्मविश्वास वाढला.

दिवसभर अभ्यास, लेक्चर, प्रयोग, खाणं पिणं असा सर्व कार्यक्रम नेहमीसारखा उरकायचा. स्वतःजवळच्या किल्लीने बिल्डींगचं दार उघडून रात्री उशिरा प्रयोगशाळेत शिरायचं. मग बराच वेळ प्रयोगशाळेत काम. त्यानंतर कॉन्फरन्स रूममध्ये स्लीपिंग बॅग पसरून झोपणं आणि सकाळी कोणी यायच्या आत लवकर उठून, स्वतःच सर्व आवरून बाहेर पडणं. असा माझा दिनक्रम सुरु झाला. दोन अडीच महिने अगदी सुरळीत पार पडले. मी भलताच खूष!

एका रात्री मला झोपायला फारच उशीर झाला. माझा इतका गाढ डोळा लागला की सकाळी ठरल्या वेळी मला जागच आली नाही.

सकाळी सात वाजता कोणीतरी प्रोफेसर केमिस्ट्री विभागाच्या बिल्डींगमध्ये शिरले. ते नेमके कॉन्फरन्स रूममध्ये डोकावले, तर तिथे स्लीपिंग बॅग पसरून झोपलेला मी!

ते चिडले. मला तर ते रागावलेच. पण नंतर त्यांनी डॉ. फारोन्हाकडे लेखी तक्रार केली की,

' केमिस्ट्री विभागाच्या बिल्डींगमध्ये हा एक मुलगा रात्रीचा झोपतो आणि तिथेच राहतो.'

कशी कोण जाणे, ही बातमी तोंडोतोंडी कॅम्पस भर पसरली. मायकल नावाचा माझा एक इटालिअन मित्र होता. त्यानं ही बातमी ऐकली आणि ताबडतोब तो मला सावध करायला आला.

" श्री, तू तुझं बस्तान लगेच हलव. "

मी म्हणालो, " हो, पण मी जाऊ कुठे? "

तो म्हणाला, " आत्ता तू तुझं सामान घेऊन माझ्या घरी ये. पुढचं पुढे बघू. मी लगेच केमिस्ट्री विभागाच्या बिल्डींगमध्ये गेलो. कोणाचं लक्ष नाही, असं पाहून माझं सामान बाहेर काढलं आणि गाडीत सामान टाकून मायकेलच्या घरी गेलो.

बर झालं, कारण त्याच दिवशी संध्याकाळी केमिस्ट्री डीपार्टमेंटचे दोन प्रोफेसर अचानक शोध घ्यायला आले. मी त्यावेळी प्रयोगशाळेत होतो. ह्या दोन प्रोफेसरनी कॉन्फरन्स रूमचा इंच न इंच तपासला. त्यांना अर्थात काहीच पुरावा मिळाला नाही. माझ्यावरच बालंट टळलं.

दोन दिवसांनी सगळीकडे शांत झालं. तशी परत एकदा माझं सामान कॉन्फरन्स रूम मधल्या कपाटात आलं. परत एकदा मी तिथे झोपायला लागलो.

माझ्या नशिबाने लवकरच उन्हाळ्याची सुट्टी संपली. माझी स्कॉलरशिप सुरु झाली. माझा राहण्याचा प्रॉब्लेम संपला. मी माझ्या भाड्याच्या घरात राहायला गेलो आणि त्याच सुमाराला माझा प्रबंधही एकदाचा पूर्ण झाला.

ससा आणि कासव ह्या गोष्टीतल्याप्रमाणे मी सर्वात उशिरा प्रबंध सुरु केला आणि माझ्या बरोबरच्या मुलांमध्ये सर्वात आधी पूर्ण केला. १९७९च्या फेब्रुवारी महिन्यात मी ॲक्रनला आलो, पहिलं दीड वर्ष असं तसंच गेलं, तरीही १९८२ संपायच्या आत माझा प्रबंध पूर्ण झाला. माझ्या बरोबरच्या कित्येक मुलांना प्रबंध पूर्ण करायला साडेचार ते पाच वर्ष लागली.

शेवट गोड, तर सर्वच गोड. असं म्हणतात. तसं प्रोफेसर कुसकानी माझं जाहीर आणि तोंड भरून कौतुक केलं, तर प्रबंधाला मान्यता देताना, माझ्या शिफारसं पत्रात डॉ. फारोन्हा ह्यांनी असं म्हटलं कि, "श्री ठाणेदार हा विद्यार्थी अत्यंत प्रामाणिकपणे काम करणारा आहे. तो विलक्षण कष्टाळू आहे, निष्ठावान आहे. इतका की रात्र रात्र प्रयोगशाळेत काम तर करतोच, पण वेळ आलीच तर तिथे झोपतो देखील!"

आत बोला!

१९८२च्या ऑगस्ट महिन्यात ओहोयो स्टेट मधल्या ॲक्रन युनिव्हर्सिटीने मला इनॉर्गॅनिक केमिस्ट्री मधली ' डॉक्टरेट ' ही सर्वोच्च पदवी दिली. मिस्टर श्री ठाणेदारचा मी डॉक्टर श्री ठाणेदार झालो.

आता मला वेध लागले नोकरीचे! अमेरिकेत येऊन साडेतीन वर्ष उलटली होती. इतके दिवस कसाबसा चरितार्थ चालवीत होतो. बेळगावला घरी पैसे पाठवणं कधी जमायचं, कधी नाही. मग डोक्यावर अपराधाची टांगली तलवार. आता मला खरी कमाई करायची होती. स्थैर्य हवं होतं.

नशीब असं असतं, की नको तेव्हा हसतं. हवं तेव्हा रुसून बसतं. कमीत कमी वेळात पीएच. डी पूर्ण झाली म्हणून मी स्वतःची पाठ थोपटली आणि लक्षात आलं, सध्या अमेरिकेत स्टुडन्ट व्हिसा असलेल्या कोणत्याही परदेशी मुलाला जॉब मिळणं खूप कठीण आहे.

ह्यावेळी जिमी कार्टर अमेरिकेचे प्रेसिडेंट होते. आर्थिक मंदीचा काळ होता. इतका की, २७ वर्षातील सर्वात वाईट आर्थिक परिस्थिती त्या वर्षी होती.

अमेरिकेत सर्वसाधारण पद्धत अशी होती, की स्टुडन्ट व्हिसा असलेल्या माणसाला एकदा का नोकरी लागली, की नोकरी देणारी कंपनी त्याला ग्रीन कार्ड मिळवून द्यायची. ग्रीन कार्ड म्हणजे अमेरिकेत राहण्याचा, नोकरी करण्याचा अधिकृत परवाना.

पण आर्थिक मंदीच्या ह्या लाटेत ही ग्रीन कार्ड करून देण्याची जबाबदारी कोणाला नको असायची. त्यामुळे शक्यतो अमेरिकन माणसालाच नोकरी मिळायची. अगदी योग्य असा अमेरिकन मिळाला नाही, तरच परदेशी विद्यार्थ्यांचा विचार व्हायचा.

मी एकूण १५० ठिकाणी अर्ज केले. कित्येकांनी उत्तरंसुद्धा पाठवली नाहीत, तर काहींनी ' अर्ज पोचला सध्या जागा नाही.' असा नम्र नकार कळविला.

मी हिरमुसला झालो. टेन्शनही आलं की, 'आता पुढे काय? '

तेवढ्यात मिशिगन स्टेटमध्ये मिडलॅंड गावात भरणाऱ्या एका केमिकल कॉन्फरन्सकडून मला निमंत्रण आलं. त्यांनी मला विचारलं, की " तुम्ही पी एच. डी. साठी जो रिसर्च केलात, त्याचं प्रेझेन्टेशन ह्या कॉन्फरन्समध्ये कराल का? "

मी हे आमंत्रण घेतलं. म्हटलं, " चला, ह्या निमित्ताने चार लोकांना आपलं काम कळेल. "

व्यवस्थित तयारी करून मी ह्या कॉन्फरंसमध्ये गेलो. माझं प्रेझेन्टेशन सर्वांना आवडलं. त्यातही तिथे आलेल्या डॉ. डेव्हीस कर्टीस ह्या गृहस्थानी माझ्या रिसर्चमध्ये खूप इंटरेस्ट दाखवला. डॉ. कर्टीस हे मिशिगन युनिव्हर्सिटीत केमिस्ट्री विभागाचे प्रमुख होते. त्यांनी मला विचारलं.

" तुला नोकरी आहे का? " मी 'नाही' असं सांगितलं. नोकरी न मिळण्याचं कारणही सांगितलं. तेव्हा त्यांनी मला एक ऑफर दिली. ते म्हणाले,

" सध्या तुला जॉब मिळणं खरंच खूप कठीण आहे. पण तू जर माझ्या युनिव्हर्सिटीत आलास तर मी तुला रिसर्च करण्याचा जॉब देऊ शकेन. तू दोन वर्ष रिसर्च कर. मी तुला ग्रीन कार्ड मिळवून देईन." खरं सांगायचं तर मला आता परत एकदा रिसर्च करायचा खूप कंटाळा

आला होता. पण दुसरा कुठलाही मार्ग नव्हता आणि ग्रीन कार्ड मिळण्याची तर अत्यंत जरुरी होती.

तेव्हा केवळ नाईलाज म्हणून मी डॉ. कर्टीस ह्यांचा प्रस्ताव स्वीकारला, आणि अनबर्न शहरात मिशिगन युनिव्हर्सिटीत त्यांच्या डिपार्टमेंटचं संशोधनाचं काम करायला मान्यता दिली.

ॲक्रन सोडण्याआधी एक शेवटची पार्टी झाली आणि निरोप घेण्याचा हृद्य कार्यक्रम पार पडला. ३००/५०० मैल प्रवास करून अनबर्नला पोचायचं होतं. त्यासाठी मी एक सेकंडहॅंड पण चांगल्या कंडीशनमधली फोर्ड मर्क्युरी गाडी घेतली. इथल्या साडेतीन वर्षाच्या वास्तव्यात दुकानात जाऊन नव्या वस्तू घेणं कधीच परवडलं नाही. पण गराज सेलमध्ये जमा केलेल्या काही वस्तू होत्या. सामान होतं. ते मित्रांना देऊन टाकलं. माझं गरजेचं सर्व सामान एका छोट्या सुटकेसमध्ये मावलं. ही सुटकेस गाडीत ठेवताना मला आठवण झाली, बेळगावहून मुंबईला जाताना हीच सुटकेस बरोबर घेतली होती. मुंबईहून ॲक्रनला येताना मी हीच सुटकेस घेऊन आलो होतो. आज अनबर्नला जाताना ही सुटकेस, हाच माझा संसार आहे. अजूनही ह्या देशात माझी मालमत्ता म्हणावी, तर ती फक्त ही सुटकेस. तरीही इथे आलो होतो, त्यापेक्षा माझ्याकडे बरंच काही आहे. डॉक्टरेटची पदवी, चालणारी गाडी आणि हातात नोकरीचं अपॉइंटमेंट लेटर घेऊन मी ॲक्रन सोडलं.


Shri Thanedar

मिशिगन स्टेट मधल्या अनबर्न ह्या युनिव्हर्सिटीच्या गावाला मी येऊन पोचलो. ॲक्रन आणि अनबर्न दोन्ही युनिव्हर्सिटीची गाव. पण दोन्हीत अगदी जाणवण्यासारखा फरक होता.

मिशिगन युनिव्हर्सिटीत सगळी श्रीमंत मुलं शिकायला यायची. त्यामुळे ह्या गावात सगळं चैनीचं वातावरण होतं. आणि इथलं राहणीमान खूप उंची, महागडं, होतं. सांस्कृतिक दृष्ट्या इथे कायम मेजवानी चालू असायची. नाटक, सिनेमा, म्युझिक कॉन्सर्ट असं काही न काही तरी सतत घडत असायचं.

पण का कोण जाणे ॲक्रनसारखं इथे मन कधी रमलंच नाही. एक तर हे रिसर्चचं काम मला आवडत नव्हतं. इथे कोणाशी मैत्री झाली नव्हती, आणि मुख्य म्हणजे आता घराची खूप आठवण येत होती. बेळगावहून अमेरिकेत आलो, त्याला चार वर्षं होऊन गेली होती. केव्हा एकदा माझं ग्रीन कार्ड होतं आहे, केव्हा एकदा ही नकोशी वाटणारी रिसर्च

वाली नोकरी संपते आहे, असं झालं होतं. कधी तरी वाटायचं, मी त्रिशंकूसारखा मधेच कुठे तरी लटकतो आहे. इथे मी कधी नव्हे तो एक एक दिवस मोजायला लागलो.

डॉ. कर्टीस मात्र खरंच अगदी सज्जन गृहस्थ. अधून मधून मी अळंटळं करतो, कामात माझं लक्ष नाही हे त्यांना कळायचं. पण ते माझी मनःस्थिती समजून घ्यायचे. मला म्हणायचे,

" नीट मन लावून काम कर, आता थोडेच दिवस उरले. "

ग्रीन कार्डसाठी अर्ज करून खूप महिने उलटून गेले होते. शेवटी एक दिवस मी उठलो आणि डेट्रॉइडच्या इमिग्रेशन ऑफिसमध्ये चौकशी करायला गेलो.

तिथे जाऊन मी नम्रपणे विचारलं, ' माझ्या केसचं काय झालं? '

तर उत्तर मिळालं, ' तुम्ही केस मार्गारिटकडे आहे. तुम्ही तिला पत्र पाठवा आणि चौकशी करा. '

मी म्हटलं, ' पत्र कशाला? मी इथे आलो आहे. मी त्यांना प्रत्येक्षच भेटतो आणि विचारतो.

समोरचा माणूस म्हणाला, ' छे छे! तशी इथे पद्धत नाही, त्या कोणालाही भेटणार नाहीत. '

मी त्या माणसाच्या विनवण्या केल्या, आर्जवं केली. शेवटी त्यानं मार्गारिट बाई कुठे बसतात ते दाखवलं. मी मार्गारिटच्या टेबला पाशी गेलो.

मार्गारिट सात आठ महिन्यांची प्रेग्नंट असावी. गर्भारपणानं ती जडावली होती. सुस्त वाटत होती, ती मला म्हणाली,

" ग्रीन कार्डसाठी तू केलेल्या अर्जाची फाईल माझ्याकडे आहे, पण सध्या इथे खूप काम आहे. " मी आता तिच्याही विनवण्या केल्या. आर्जव केली. " प्लीज, माझ्या अर्जाचा लवकर विचार करा. त्या बाबतीतील कार्यवाही लवकर करा. "

तिनं, " हो. मी बघते, " असं आश्वासन दिलं. मी परत आलो.

दोन महिने गेले. ग्रीन कार्डाचा अजूनही पत्ता नाही. मी परत एकदा डेट्रॉइटच्या इमिग्रेशन ऑफिसमध्ये! ह्या वेळी मी सरळ मार्गारेटची चौकशी केली.

" ती डिलिव्हरीसाठी गेली आहे. अजून पाच सहा महिने तरी येणार नाही. ती आल्यानंतर या!"

मी हबकलो.

" अहो, असं कसं,? मार्गारेट बाईच काम दुसरं कोणी पाहणारं नाही का?

" नाही, ती परत आली की तिचं काम तीच बघेल. "

मी ह्यावेळी ठरवून आलो होतो की ' आपला अर्ज आता ह्या लोकांनी विचारात घ्यायलाच हवा. ' मी चिकाटीने विचारलं.

" ग्रीन कार्डचं काम एकट्या मार्गारेट बाईच बघतात का? "

" नाही. अजून एक मिस्टर लायन आहेत. तेही ग्रीन कार्डचं काम पाहतात. "

" मग मी त्यांना भेटू का? त्यांच्याशी बोलू का?

" छे छे! तशी इथे पद्धत नाही. तुम्ही त्यांच्याशी बोलू शकत नाही. हवं तर तुम्ही त्यांना पत्र पाठवा." मी वैतागलो.

परत परत बंद भिंतीवर डोकं आपटणं. काय चाललंय काय? विचार करीत मी उभा राहिलो. तेवढ्यात वरच्या मजल्या वरून एक माणूस खाली आलं. त्याच्या जाकेटवरचं नाव मी वाचलं. ' मिस्टर लायन!'

मी पटकन मोठ्यान विचारलं,

" हेच ना मिस्टर लायन? " त्या माणसानं माझ्याकडे पाहिलं, हसून विचारलं,

" येस, मे आय हेल्प यु? "

मी पुढे झालो आणि त्याला माझी (रड) कथा ऐकवली, मग अजीजीनी विचारलं,

" तुम्ही मला मदत कराल का? प्लीज!"

तो म्हणाला, " दोन मिनिटं थांब. " आणि परत वरच्या मजल्यावर गेला. पाच मिनिटांनी खाली येऊन त्यानं मला सांगितलं, " ऑल डन!"

माझं विश्वासच बसेना.

" माझं काम झालं आहे? "

"होय, मी आत्ता जाऊन तुझी फाईल चेक केली, सी आय ए आणि एफ बी आयकडून क्लिअरन्स आलं आहे. त्याचे रिपोर्ट्स मी पहिले. फाईलवर 'ओके!' असा शेरा मारला आणि फाईल पुढे ढकलली. "

" मग आता? "

" आता विशेष काही नाही. थोड्याच दिवसात तुझं ग्रीन कार्ड तुझ्या पत्त्यावर घरी येईल. "

मी अगदी खुश झालो. मिस्टर लायनचे आभार मानले आणि अनबर्न मधल्या माझ्या रूमिंग हाउस वर परत आलो.

तोपर्यंत मी अनेकदा रूमिंग हाउसमध्ये राहिलो होतो. पण अनबर्नच्या रूमिंग हाउस इतका सावळा गोंधळ कुठेही नव्हता. ही एक अत्यंत जुनी इमारत होती. त्यात सतरा खोल्या होत्या. आणि एक किचन, एक हॉल, एक बाथरूम! किचनमध्ये दोन तीन फ्रीज होते. त्यात ज्यानं त्यानं आपापलं खाणं पिणं, आपापल्या नावाच्या चिठ्या लावून ठेवायचं. पण ही व्यवस्था असली, तरी कोण येईल आणि आपली बिअर पिऊन जाईल किंवा आपल्या नावाचा आईसक्रीमचा डबा संपवून टाकेल, हे सांगता यायचं नाही.

जो गोंधळ किचनमध्ये तोच, बाहेरच्या हॉलमध्ये, हॉलच्या मध्यावर एक टेबल होतं. दररोजचे कोणी कोणी मागवलेले न्यूज पेपर. कोणाला आलेली पत्रं, मासिकं, बिलं,

असा कागद पत्रांचा एक मोठा ढीग ह्या टेबलवर असायचा. ज्यानं त्यानं आपापली पत्र किंवा इतर गोष्टी ह्या ढिगाऱ्यातून शोधून घ्याव्यात.

मिस्टर लायनन सांगितलं होतं, ' लवकरच तुझं ग्रीन कार्ड तुझ्या पत्त्यावर येईल. ' त्यामुळे मी दररोज हॉल मधल्या टेबलावरच्या ढिगात शोधाशोध करायचो. दोन महिने गेले.

कंटाळून परत एकदा डेट्रोइडला इमिग्रेशन ऑफिसत गेलो. मिस्टर लायनला भेटलो. मला पाहून त्यांना आश्चर्य वाटलं. मी काही बोलायचं आत त्यांनी सांगितलं,

" तुझं ग्रीन कार्ड एक महिन्यापूर्वीच तुझ्या पत्त्यावर पाठवलं. "

मी कपाळाला हात लावला. माझ्या रूमिंग हाउस मधल्या गोंधळात, टेबलवरच्या ढिगातलं माझं ग्रीन कार्ड गहाळ झालं असणार, पण आता मी काय करू?

मिस्टर लायननं सुचवलं, " नवीन अर्ज कर. " दुसरा काही मार्ग नव्हताच. मी परत एकदा ग्रीन कार्डसाठी अर्ज भरला. परत एकदा वेड्यासारखी वाट पाहणं. शेवटी १९८४ सालच्या मे महिन्यात मला ग्रीन कार्ड मिळालं.

उड्या मारून नाचलो असतो किंवा टारझनसारख्या आरोळया ठोकल्या असत्या. तरी माझं आनंद पुरेसा व्यक्त झाला नसता. भूलभुलैयात अनेक वर्ष गरागरा फिरणाऱ्या माणसाला अचानक बाहेर पडण्याचा रस्ता सापडावा. तसं सर्व चित्र पालटलं होतं. ही सर्व किमया ग्रीन कार्डची! कित्येक दिवसांनी मी उत्साहानं पुढची कामं सुरु केली. पहिल्या प्रथम नोकरीसाठी अर्ज पाठवले. ह्या वेळी सर्वच परिस्थिती पालटली होती. कार्टर जावून रीगन अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष झाले होते. अर्थव्यवस्था सुधारली होती. त्यात आता माझं 'ग्रीन कार्ड होल्डर' हे स्टेटस! ह्या सर्वाचा परिणाम म्हणून माझ्या अर्जांना धडाधड उत्तरं आली. इतकंच नव्हे, तर दोन मोठ्या कंपन्यांनी मला जॉबची ऑफर दिली आणि ताबडतोब इंटरव्ह्यूसाठी बोलावले.

साधक बाधक विचार करून मी सेंट लुईसच्या पेट्रोलाईट कंपनीची ऑफर स्वीकारली. त्यांना मी सांगितलं.

" मी इंडियाला जाऊन आल्यानंतर दोन महिन्यांनी नोकरीवर रुजू होईन. " कंपनीनं ते मान्य केलं. ह्यावेळी माझ्या खिशात फार पैसे नव्हते. बँक बॅलंसही नव्हता. पण हातात

एक उत्तम नोकरी होती, आता भविष्य काळ सुरेख सोनेरी असणार आहे. ह्याची मला खात्री वाटत होती. क्रेडीट कार्ड वापरून मी इंडियाचं तिकीट काढलं, आणि पाच वर्षांनंतर परत एकदा तीच ती बेळगावची अतिपरिचित बॅग घेऊन, मी अमेरिकेहून बेळगावला जायला निघालो.

शशी व तिच्या अमेरिकन मैत्रिणी



श्री त्यांच्या लॅबमध्ये



श्यामल, नीलच्या पहिल्या वाढदिवसाच्या वेळी



fasten your seatbeltsचा फलक चमकायला लागला. प्रवाशांनी सीट बेल्ट बांधले आहेत किंवा नाहीत ह्याची खात्री करून घेत एयर होस्टेसनं पॅसेजमधून एक फेरी मारली.

मी तर केव्हाचाच सीट बेल्ट बांधून तयार बसलो होतो. शेवटी एकदाची प्रतीक्षा संपली. एयर इंडियाच्या विमानाने रन- वे वरून धावायला सुरुवात केली.

काही क्षणात विमान अटलांटिक महासागरावरून पूर्व दिशेला झेपावलं. मुंबई यायला अजून बावीस तास आहेत आणि बेळगावला पोचायला उणे पुरे सव्वीस तास किंवा एक दिवस आणि दोन तास!

अमेरिकेतल्या गेल्या पाच वर्षाच्या वास्तव्यात बेळगावची, घरच्यांची आठवण आली नाही असा एकही दिवस नव्हता. पण आता मात्र हा एक दिवस आणि दोन तास केव्हा संपताहेत असं झालंय. सीटच्या पाठीवर डोकं टेकून मी डोळे मिटले. मनाच्या पडद्यावर उमटलं, आमचा बेळगावच रस्त्यावरचं घर. ' मी येणार म्हणून इन्नीची स्वयंपाकघरात जरा जास्तच लगबग चालू आहे. काका आपला आवडता पानाचा डबा समोर मांडून बसले आहेत. ही माझी माळ्यावरची खोली. माझी एकट्याची, अशी ही सबंध घरातली एवढीच छोटीशी जागा. कौलामधल्या फटीतून उन्हाचे सोनेरी कवडसे अलगद जमिनीवर उतरले आहेत. हलकेच हात पुढे करून मी कवडसे हातावर झेलले. हातावरच्या प्रकाश बिंदुवरून नजर हलेना. तेवढ्यात इन्नीची हाक ऐकल्यासारखी वाटली,

" वेदा.... श्रीला शाळेत पोचवतेस ना गं? "



शाळेत जाणं म्हणजे मला परम संकट वाटायचं. तर मला शाळेत पोचवणं हे वेदाला धर्मसंकटाहून कठीण काम वाटायचं. 'दोन मुलींच्या पाठीवर नवसाने झालेला मुलगा.' म्हणून माझे लाड कोड केले, तरी शाळेत पाठवण्याबाबत इन्नी जराही दया माया दाखवत नसे.

मग मी शाळेत जाताना रडणार, वेदा माझा हात धरून रस्त्याने ओढत नेणार. मध्येच मी रस्त्यावर बसकण मारणार, हे सर्व नेहमीचंच नाटक.

एवढं करून शाळेत गच्छन्ति होणारच. मग मी अधून मधून काहीतरी कारण शोधायचो. कधी ' पोट दुखतंय' तर कधी ' डोकं ठणकतंय' अशी कारणं सांगून मी घरी पळून यायचो.

एक दिवस बाईना असंच काहीतरी थातूर मातुर कारण सांगून घरी यायला निघालो. वाटेत डोक्यात विचार आला, आज इन्नीला काय सांगावं? माझी नेहमीची कुठलीही सबब ती ऐकून घेणार नाही ह्याची खात्री होती.

अचानक आठवलं,.... गेले काही दिवस घरातले लोक काळजी करत आहेत, ' नेहरू आजारी आहेत. नेहरू आजारी आहेत. ' हे नेहरू नक्की कोण, ते ठाऊक नव्हतं. पण ते कोणीतरी मोठे गृहस्थ आहेत आणि तिकडे लांब दिल्लीला का कुठे राहतात. एवढंच माहित होतं.

उदास चेहऱ्याने मी घरात शिरलो. इन्नीनं विचारलं, " आलास? आज काय झालं"?

मी वाईट तोंड करून सांगितलं, " नेहरू गेले. "

" नेहरू गेले? " इन्नी ओरडली.

आणि अरे बापरे! त्यानंतर एकच हलकल्लोळ उडाला. इन्नीनं धावत जाऊन शेजाऱ्यांना सांगितलं. हे नेहरू शेजाऱ्यांच्यापण ओळखीचे असावेत. शेजाऱ्यांनी ओरडून आणखी कोणाला ही बातमी दिली. पाहता पाहता अख्ख्या गल्लीला कळलं. नेहरू गेले' मग चर्चा सुरु झाल्या. कोणीतरी रेडीओ लावला. कोणीतरी कोणाला तरी फोन केला.

थोड्या वेळान संशयाचं वातावरण निर्माण झालं आणि शेवटी निष्कर्ष निघाला कि, ' नेहरू गेले' ही बातमी खोटी आहे. लोकांची पांगा पांग झाली. इन्नीनं घरात पाऊल ठेवलं मात्र! माझा कान पकडून तिनं असे काही शाब्दिक फटके दिले की त्यापेक्षा खरोखरीचे फटके परवडले.

त्यानंतर दोनचार दिवसात नेहरू खरंच गेले. शाळा बंद करून मुलांना घरी पाठवलं. पण घरी आलो तरी ' नेहरू गेले' हे दोन शब्द तोंडातून निघाले नाहीत. मनात भीती होती. न जाणो, ही बातमी सांगितली आणि पुन्हा इन्नी रागावली तर? तेव्हा घरी आल्यावर मी ' पोट दुखत आहे' असं सांगितलं, आणि चुपचाप पडून राहिलो.

माझा हात दाखवून किंवा पत्रिका दाखवून, माझं भविष्य विचारण्याचा इन्नीला खूप सोस. ज्योतिषी कधी काही सांगायचे, तर कधी काही. एकदा एका ज्योतिषानं सांगितलं,

" हा मुलगा मोठेपणी चांगलं नामांकित शात्रज्ञ होईल, किंवा दरोडेखोर होईल. "

आता कशाचा काय संबंध? पण तेव्हापासून मी जरा काही चुकीचा वागलो तर इन्नी धाक दाखवायची.

" बघ, असं वेड्यासारखं केलास तर दरोडेखोर होशील हं!"

मला ते खरं वाटायचं, काही चुकीचं करताना मनात यायचं, झालं, आता आपण दरोडेखोर होणार! ' दरोडेखोर होणार' अशी भीती बाळगत झालो मात्र शात्रज्ञ!

आठव्या वर्षी मोठ्या कौतूकानं माझी मुंज केली. मुंजीची बाकीची काही विशेष आठवण नाही. पण फोटोची मात्र चांगलीच आठवण आहे.

मुंज लागल्यावर माझा एक छानसा फोटो काढायचा अशी घरच्यांची हौस, त्यासाठी फोटोग्राफरला निमंत्रण. फोटोसाठी चांगला उजेड हवा तेव्हा फोटोग्राफरनं सुचवलं, ' माडीवरच्या पत्र्यावर उभा करू, सुर्य प्रकाशात फोटो छान येईल. '

मुंडावळ्या वगैरे बांधलेल्या, सजलेल्या बटूला म्हणजे मला कोणीतरी उचलून वर नेला आणि माडीवरच्या पत्र्यावर उभा केला.

फोटोग्राफर ' स्माईल प्लीज ' म्हणत होता, पण भर उन्हात, छान तापलेल्या पत्र्यावर उभा असलेल्या बटूच्या चेहऱ्यावर स्माईल कसं येणार? उन्हात उभा, पत्र्यानं पाय चटचट भाजतायत आणि तरीही चेहऱ्यावर हसू आणण्याचा केविलवाणा प्रयत्न केलेला, असा तो माझा फोटो आजही मी जपून ठेवला आहे.

मोठ्या आणि धाकट्या अशा सर्व बहिणींच्यात वावरल्यामुळे मला सर्व त्यांच्यासारखंच करायला आवडायचं.

एकदा कुठला तरी मोठा सण होता. इन्नीनं स्वतःसाठी आणि मुलींसाठी दागिने काढून बाहेर ठेवले, अंघोळी उरकल्या की बाकीचा नट्टा पट्टा करून सगळयाजणी आपापले दागिने घालणार होत्या.

त्यांची गडबड चालू होती. त्यावेळी मी ते दागिने पहिले. आधी कुतूहलाने एक एक दागिना उचलून पाहिला. मग एक एक करीत मी ते दागिने अंगावर चढवले, दागिने काही फार नव्हते, पण जे काही होते ते सर्व. (म्हणजे चपला हार, मोहन माळ, बांगड्या, अंगठ्या ) मी गळयात, हातात, घातले आणि आरशासमोर उभा राहून माझं, ' सुंदर ते ध्यान ' निरखून पाहिलं.

मग एकदम माझ्या डोक्यात काय आलं, मी पळालो आणि माडीवर जावून दागीन्यांसकट अडगळीच्या एका कपाटात लपून बसलो. ' आता इन्नीची आणि बहिणींची छान फजिती होईल!' म्हणून मला अगदी खुदूखुदू हसायला येत होतं.

फजिती कसली? खालती हाहाकार उडाला. ' श्री नाहीसा झाला आणि दागिनेही नाहीसे झाले'! म्हणजे घरात चोरबिर शिरला की काय? सगळयांच्याच तोंडचं पाणी पळालं. एक बहिण शेजारी विचारायला गेली, दुसरी घरभर मला हाक मारीत, शोधायला लागली. इन्नीच्या डोळयांना पाण्याच्या धारा लागल्या. जवळ जवळ अर्धा तास हा गोंधळ चालला. कसला सण आणि कसलं काय! आता पोलिसमध्ये जाण्यापर्यंत पाळी येऊन ठेपली.

तेवढ्यात वेदा परत एकदा माडीवर आली आणि अडगळीच्या कपाटात तिला मी सापडलो. मला बाहेर ओढून काढताना ती रागवत होती. पण माझं सालंकृत रूप पाहून मात्र तिला हसायला आलं.

आम्ही खाली गेलो तर इन्नीनं मला मिठी मारली. नंतर थोडीशी रागावलीही. पण खरं सांगायचं तर ' नको नको' त्या कल्पना मनात येऊन गेल्यानंतर मी सापडलो. दागिनेही मिळाले, त्यामुळे तिच्या रागाला फारशी धार नव्हती. ' पुन्हा असं करू नकोस हं!' एवढ्यावरच हे रामायण संपलं.

लहानपणी माझ्या बऱ्याच शाळा झाल्या. कारण काका, माझे वडील कोर्टात नाझर म्हणून नोकरीला होते. त्यामुळे आम्ही रामदुर्ग, चिकोडी अशा अनेक लहान मोठ्या गावात राहिलो आणि शेवटी बेळगावला स्थिरावलो.

बेळगावातील माझी पहिली शाळा, म्हणजे भुताच्या वाड्यातील शाळा, नावाप्रमाणेच हा एक अत्यंत जुना पडका वाडा होता. बरीच वर्ष इथं कोणी राहत नव्हतं. मग अफवा पसरल्या ' इथे भूतं आहेत ' रात्रीच्या वेळी वाड्यातून विचित्र आवाज ऐकायला येतात. कधी कधी म्हणे ती भुतंही दिसतात.

खरं खोटं राम जाणे किंवा भूत जाणे! ह्या पडक्या वाड्यात नंतर कोणीतरी शाळा सुरु केली. इथे फारसे शिक्षक नव्हते. एक बाई तीन चार यत्तांचा अभ्यास घ्यायच्या. म्हणजे एका वर्गातल्या मुलांना सागायचं, तुम्ही 'फुलपाखरू' ही कविता पाठ करीत बसा, दुसऱ्या वर्गातल्या मुलांना गणितं करायला द्यायची. तिसऱ्या वर्गाला उतारा लिहून काढायला सांगायचा.

या आमच्या शाळेला युनिफॉर्म वगैरे नव्हता. इथल्या मुलांना युनिफॉर्म परवडलाही नसता. मला आठवतं आहे, मला वर्षातून एकदा नवी पाटी मिळायची. ती जर फुटली तर फुटक्या पाटीवर वर्ष काढायचं. पाटीवरची पेन्सिलही कधी अख्खी वापरली असं आठवत नाही. माझ्या वाट्याला नेहमी तुकडेच यायचे.

आमच्या भुताच्या वाड्याच्या शाळेत शनिवारी एक स्पेशल ॲक्टीव्हिटी असायची. ' भिंती सारवणे' मुलांनी शेण गोळा करून आणायचं, आणि मुलींनी सारवण्याचं काम करायचं.

इतर शाळांमध्ये शनिवारी पिटी किंवा ड्रील असायचं. त्या शाळांतली मुलं, शनिवारी सॉक्स, बूट आणि पिटीचा युनिफॉर्म घालून ऐटीत जायची. त्यावेळी आम्ही मात्र पिशवीतून शेण गोळा करीत असायचो. आमच्यातला खास चर्चेचा विषय म्हणजे, ' कोणाला ताजं शेण मिळालं? " आणि कोणाला शिळं शेण मिळालं? "

कधी कधी इतर शाळातली मुलं आम्हाला विचारायची,

' ए, तुम्ही भुताच्या वाड्याच्या शाळेत कसे रे जाता? " तुम्हाला भीती नाही वाटत? "

ह्यावर मी सांगायचो, " अरे वेड्यानो! भूतं फक्त रात्रीच दिसतात. आमची शाळा तर दिवसा असते. दिवसा भुतं बाहेर पडत नाहीत काही. "

भूतांनी आपल्यासाठी ' रात्री दिसायचं. दिवसा दिसायचं नाही. ' हा नियम बनवला आहे, हे किती चांगलं आहे की नाही? त्यामुळे आम्हाला कधी नावालासुद्धा एखादं भूत दिसलं नाही आणि आम्हाला ह्या शाळेत भीतीही वाटली नाही.

चौथीनंतर मी मुन्सिपालटीच्या चौदा नंबरच्या शाळेत गेलो. हिला म्हणायचे, 'कोंड्याची शाळा. ' का ते मला माहित नाही. पण इथे आम्हाला भिंती सारवायला लागल्या नाहीत, हे खरं! शेवटची शाळा ' चिंतामणराव हायस्कूल ' आधीच्या शाळांपेक्षा ह्या शाळेचं नाव कसं चांगला रुबाबदार! पण हा रुबाब नावापुरताच. बाकी शाळा अगदी साधीसुधीच होती. ह्या शाळेतही 'फी नव्हती' हा मुद्दा आमच्या दृष्टीने महत्वाचा होता.

बेळगावातल्या शाळा आठवताना एक प्रसंग अगदी कधी न विसरण्यासारखा. इन्नीला असं वाटायचं, ' आपल्या मुलांनी अगदी लवकर शिकावं, लवकर लवकर मोठं व्हावं.' घरातल्या बेताच्या परिस्थितीमुळे कदाचित तिला तसं वाटत असेल. म्हणूनच शाळेत नाव घालताना इन्नीनं माझं वय थोडंसं वाढवलं. शिवाय एका वर्षी मला डबल प्रमोशन मिळालं. माझ्या बाबतीत यशस्वी झालेली युक्ती इन्नीनं पुन्हा वीणाच्या बाबतीत वापरली. माझी धाकटी बहिण वीणा हिला शाळेत घालताना इन्नीन तिचं वय दीड वर्षांनी वाढवून लिहिलं, कोणाला काहीही कळलं नाही.

एकदा मात्र गम्मत झाली. संध्याकाळची वेळ. आम्ही सर्व नेहमीप्रमाणे घराच्या पायऱ्यांवर बसून शेजाऱ्यापाजाऱ्यांशी गप्पाटप्पा करीत होतो. आमच्या रस्त्याची ही खासियत. कामधाम उरकली की बायाबापड्या, पोरंटोरं आपापल्या घराच्या पायऱ्यांवर बसणार आणि एकमेकांची चौकशी, गावातल्या किंवा गल्लीतल्या बातम्यांवर चर्चा करणार.

तर त्या संध्याकाळी असंच काही बोलणं रंगात आलं होतं, आणि अचानक रस्त्यावरून एक खणखणीत हाक आली,

" अहो ठाणेदार बाई... "

इन्नीचं आणि इतरांचं बोलणं थांबलं, आम्ही वळून पाहिलं, तर माझ्या आणि वीणाच्या शाळेतल्या तासकर बाई रस्त्यावरून येत होत्या. इन्नीनं पटकन उठून त्यांचं स्वागत केलं,

" या न या, तासकर बाई! बसा!

रस्त्यावरच उभ्या राहून तासकर बाई मोठ्यांनी म्हणाल्या, " मी बसायला आले नाही. मी फक्त विचारायला आले आहे की श्री आणि वीणा ह्या तुमच्या दोन मुलांमध्ये फक्त दोनच महीन्यांचं अंतर कसं? "

रस्त्यावरच्या गप्पा एकदम थांबल्या. काही क्षणात एक चोरटं हसू जिकडे तिकडे पसरलं. काही बायकांनी तोंडाला पदर लावून हसू दाबलं.

इन्नी काही न बोलता गप्प उभी होती. चेहरा गोंधळलेला. तासकर बाई निघून गेल्या. आम्हा पोरांना 'काय झालं? ही भानगड काय आहे?' ते काही कळलंच नाही.

ह्या अनपेक्षित धक्कानाट्याचा अर्थ आम्हाला खूप नंतर उमजला. आमची वयं वाढवून लिहिताना जन्मतारखामध्ये दोन महिन्यांचंच अंतर राहीलं. हा घोटाळा तासकर बाईंनी पाहिला, त्यांच्या तो लक्षात आला आणि त्यांनी तो इन्नीच्या लक्षात आणून दिला. हा घोटाळा आमच्या अख्ख्या गावाला कळला ते सोडा. पण इन्नीच्या ह्या पुढे ढकलण्यामुळे एक गोष्ट मात्र चांगली झाली. ती म्हणजे, मी फक्त चौदाव्या वर्षी मॅट्रिक पास झालो.

मी शाळेत होतो तोपर्यंत, आम्ही खाऊन पिऊन सुखी होतो. मध्यमवर्गाची सर्व तत्वं आणि आदर्श आमच्याही घरात जपले जायचे. मुलांच्या शिक्षणाला सर्वात जास्त महत्व. मुलींची शिक्षणं झाल्यावर, त्यांची लग्नं करून देणं हीही एक मोठी जबादारी. दोन सावत्र मुली आणि स्वतःची पाच मुलं, एवढ्या सगळयाचं नीट करून इन्नीनं अगदी टुकीनं संसार चालविला.

फार मोठी चैन किंवा ऐषाराम करायला आमच्याकडे पैसे नसायचे. पण तरीही काकांचा पगाराचा दिवस म्हणजे आमच्या घरातला एक अगदी स्पेशल असा दिवस असायचा.

त्या दिवशी काका घरी आले की म्हणणार, " सुलोचना, (इन्नीचं सासरचं नाव) तयार आहेस ना?चल, आपण फिरायला जाऊ, "

इन्नी छान नवी साडी नेसून, गजर बिजरा घालून तयार असायची. ही संध्याकाळ खास त्या दोघांची! आधी फिरायला जायचं. मग सुवर्ण मंदिर नावाचं एक नवं रेस्टॉरंट झालं होतं, तिथे किंवा आणखी कुठे तरी जेवायचं आणि मग घरी यायचं. घरी येताना प्रत्येक मुलासाठी काहीतरी छोटीशी पण छान वस्तू आणायची. कोणाला बिस्किटचा पुडा तर कोणाला सफरचंद.

आम्हा मुलांना ह्या वस्तुंचं इतकं अप्रूप असायचं की आम्ही, ती दोघं परत येण्याची अगदी आतुरतेने वाट पाहायचो. कधीतरी आमच्यापैकी कोणाला तरी एकाला त्यांच्या बरोबर जायची संधी मिळायची. पण त्यातही नियम असा की ह्या महिन्याला वीणाला बरोबर नेलं, तर पुढल्या महिन्यात वेदा किंवा मी त्यांच्या बरोबर जाणार. म्हणजे भांडण होण्याचा प्रश्न नाही.

उरलेली मुलं घरात असायची आणि सर्वात मोठी बहिण रजनी हिनं त्या दिवशी लहान भावंडांसाठी जेवण करायचं. आता गम्मत अशी की रजनीला नेमका स्वयंपाकाचा अगदीच आळस आणि कंटाळा! त्यामुळे काका आणि इन्नी फिरायला गेल्यावर ती आम्हाला दटावणीच्या सुरत विचारायची, " काय रे, कोणाला भूक आहे? "

तिच्या सुरातली नाराजी लक्षात घेऊन वेदा किंवा वीणा म्हणायची,

" छे बाई आम्हाला काही भूक नाही. "

पण मी मात्र म्हणायचो, " ए, मला भयंकर भूक लागली आहे हं. रजनी, काहीतरी छान खायला कर." ह्यावर रजनीला इतकं राग यायचा की ती आधी मला एक चांगली चापटपोळी किंवा धम्मक लाडू द्यायची आणि मग धुसफुसत काहीतरी खायला करायची.

'नेहमीच्या आपल्या चाकोरीबद्ध संसारात नवरा बायकोनं काही क्षण केवळ आपल्याकरता जपून ठेवायचे असतात. आईवडिलांची कर्तव्यं पार पाडताना नवरा बायको ह्या नात्यातला रोमान्सही टिकवायचा असतो' हे माझ्या फार लवकर आणि सहजपणे लक्षात आलं.

पुढे कधीतरी मोठा झाल्यावर मला इन्नी आणि काका ह्यांच्या लग्नाची गोष्ट कळली. ज्यांचं लग्न हा परिस्थिती पुढे झुकलेला एक सोयीचा व्यवहार होता, त्या माझ्या आई वडिलांनी एकमेकांच्या नात्याचे नाजूक बंध जपावेत, ह्याच मला आश्चर्य वाटलं आणि आई वडील म्हणून त्या दोघांचा अभिमानही वाटला.

कोल्हापूरच्या पलूस्कराना सात मुली आणि एक मुलगा. कुटुंब मोठं, मिळकत छोटी. त्यात सात मुलीना उजवायची जबाबदारी. मोठ्या तिघींची लग्न झाली. मधली गंगू, ही अठरा एकोणीस वर्षाची झाली.

हिच्यासाठी एक चांगला पण बिजवर मुलगा बघायला आला. मुलाचं नाव पांडुरंग ठाणेदार. कोर्टात नाझरची नोकरी होती. आधीची बायको चौदाच दिवसांपूर्वी वारली होती. घरात दोन छोट्या मुली. त्यांना सांभाळायला कोणी नाही. म्हणून हा ताबडतोब दुसऱ्या लग्नाचा मार्ग.

इन्नीनं मला नंतर केव्हातरी सांगितलं, " हे ठाणेदार मला पाहायला आले, तेव्हा मला आधी काही कळलंच नाही. बायको नुकतीच गेल्याने डोक्याच मुंडण केलेला, माझ्यापेक्षा चौदा वर्षांनी मोठा असा हा मध्यम वयीन माणूस घरी येतो काय? मला मागणी घालतो काय? पण मला काहीही म्हणायची सोय नव्हती आणि तेवढं धैर्यही नव्हतं. कारण आमच्या पलुस्करांच्या घरातील परिस्थिती अशी होती कि, "सात मुलीं पैकी आणखी एकीला हळद लागून तिचे दोनाचे चार हात झाले ना? म्हणजे सगळं चांगलंच झालं म्हणायचं. ती खाऊन पिऊन सुखी होईल. आपल्याही घरातलं एक खाणारं तोंड कमी झालं."

तर अशी मी कुमारी गंगू पलुसकरची सौभाग्यवती सुलोचना ठाणेदार झाले. अठराव्या वर्षी दोन मुलींची आई झाले. पण एक गोष्ट आहे, की आम्ही दोघांनी एकमेकांना समजून घेतलं, आणि शेवटी संसारात तीच गोष्ट महत्वाची असते, नाही का?

काकांचा आणि इन्नीचा संसार हा असा सुरु झाला. मुख्य म्हणजे दोघांच्या वयातच नव्हे तर स्वभावातही खूप अंतर होतं. तरी घरातलं वातावरण नेहमी आनंदी, हसरं राहीलं.

काकांचा स्वभाव अगदी शांत. कुणाच्या अध्यात नाही की मध्यात नाही. मित्र मंडळी, नातेवाईक, शेजारी कोणाशीच फार जवळीक करणार नाहीत. की अघळपघळ बोलणार नाहीत. काहीसे माणूसघाणेच. पण तुसडे नाहीत. किंबहुना संताप, राग, चिडचिड, आरडओरडा ह्या खास पुरुषी अहंकाराच्या छटाचा त्यांच्या स्वभावात मागमूसही नव्हता.

ऑफिस आणि घर हेच त्याचं जग. घरी आले की रेडीओ ऐकणे हा अत्यंत आवडता छंद. दर रवीवारी त्याचं एक खास काम असायचं. एक वर्तमान पत्र जमिनीवर पसरायचं.

त्यावर रेडीओ ठेवून तो उघडायचा. आतले सर्व पार्टस् बाहेर काढायचे आणि मग आतून बाहेरून साफ करून तो रेडिओ परत जोडायचा. हा त्यांचा उद्योग चांगले तास दोन तास चालायचा.

एक दिवस त्यांची रेडीओची अंतर बाह्य साफ सफाई चालू होती आणि मी हळूच त्यांचे खिळे पळवले. रेडीओचे पार्टस् जोडताना त्यांना खिळे सापडेनात. त्यांनी शोध शोध शोधले, शेवटी वेदाने की वीणाने सांगितलं,

" काका रेडीओचे खिळे श्री नं लपवून ठेवले आहेत. "

झालं, कधी नव्हे ते त्या दिवशी ते इतके चिडले. मला ते खूप रागावले, इतकंच नाही तर चांगले चार धपाटेही दिले.

त्यांना रागावलेलं मी तेव्हा पहिल्यांदा पाहिलं. आणि तेच शेवटचं! तो एक प्रसंग सोडल्यास ते कधी मोठा आवाज करून बोललेलेही आठवत नाही.

ते सर्व डिपार्टमेंट इन्नीचं. मुलांना रागावणे, शिस्त लावणे, त्यांच्यावर संस्कार करणे ही सर्व कामं तिचीच. पण सात मुलांची ही एवढी जबाबदारी पार पाडताना ती कधी दमली, थकली, वैतागली नाही.

तिच्यात उर्जेचा एक सदैव खळखळता स्त्रोत आहे. ती कायम उत्साही, कुठल्याही परिस्थितीत आनंदी राहणारी, माणसं जोडणारी! नातेवाईक आणि पै पाहुणे तर सोडा, तिच्याकडे शेजारणीची जी उठबस असते, ती पाहिली तरी माझ्या बोलण्याची प्रचीती येईल. आमच्या घरात घडणारे काही नमुनेदार संवाद असे....

" काय हो ह्या हल्लीच्या मुली... माझी सून... अमुक करत नाही... तमकं ऐकत नाही... विटले बघा मी आयुष्याला. ..."

इथे सासूनं डोळ्याला पदर लावलेला, इन्नी म्हणणार, " खरं आहे हो तुमचं काकू! पण तुम्ही आधी शांत व्हा, हा चहा घ्या. "

बोलून बोलून दमलेली सासू चहा पिते आणि खरंच तिला जरा बरं वाटत. आता इन्नी म्हणते, ' तुम्ही म्हणता ते अगदी बरोबर आहे, अहो, पण ही नवी पिढी! त्याचं वागणं,

विचार वेगळाच असणार! तुमची सूनसुद्धा तडक फडक बोलू दे, पण तिला तुमच्याबद्दल माया आहे. तुमच्या करण्याचं कौतुक आहे. तुम्ही जरा तिच्या कलानं घ्या. मग बघा कसा फरक पडतो ते!"

आमच्या घरात शिरताना शेजारची सासू अगदी त्रासलेली, कावलेली होती, इन्नीशी मोकळेपणानी बोलल्यानं तिला आता खूप हलकं हलकं वाटतय. इन्नीचे  शब्द आठवत, ती प्रसन्न मुद्रेने घरी जाते.

दुपारच्या वेळी मघाच्याच सासूची सून हलकेच आमच्या घरात शिरते.

" वैनी, तुमच्याशी जरा बोलायचं होतं. "

इन्नी म्हणते, " बोल की, काय झालं? "

सून भडाभडा सासूच्या तक्रारी सांगते.

" अशाच आहेत... तशाच बोलतात... “

इन्नी तिला न अडवता, तिचं सगळं बोलणं सहानुभूतीनं ऐकून घेते. मग तिच्या पुढे चहाचा कप ठेवून म्हणते, " तू आधी चहा घे बर"

सून कृतज्ञतेनं चहा पिते. मग इन्नी म्हणते,

" तू म्हणतेस ते अगदी बरोबर आहे, तुमचे नव्या पिढीचे विचार जुन्याना नाही कळत. पण तू जरा सासूबाईच्या बाजूनेही विचार कर. खूप कष्ट करून त्यांनी तुझ्या नवऱ्याला मोठं केलं आहे. त्यामुळे त्यांना वाटतं. आता तुम्ही दोघांनी त्याची जाणीव ठेवावी. त्यांना मान द्यावा. आणि अगं तोंडानं बोलल्या तरी त्यांना तुझं खूप कौतुक आहे. मला सांगतात ना नेहमी! मी काय म्हणते? तूही त्यांच्या चांगल्या गोष्टी लक्षात ठेव आणि न पटणाऱ्या गोष्टी सोडून दे. मग बघ काय फरक पडतो ते. "

येताना घुश्शात असलेली सून जाताना स्वस्थ चित्ताने घरी जाते. इन्नीचा तिला आधार वाटतो आणि तिच्या बोलण्यातलं तथ्यही लक्षात येतं.

इन्नी आणि तिच्या शेजारणींवरून आठवलं. बेळगावची खासियत म्हणावं असं एक दृश्य! बेळगावला घरोघरी शेवया काढल्या जायच्या आणि त्या एकटी दुकटीनं नव्हे, तर चारचौघीनी मिळून काढायच्या.

घरोघरी सकाळपासून पीठाचे गोळे करून ठेवलेले असायचे. दुपारच्या वेळी गल्लीतल्या बायका एकत्र जमणार. मग डब्यावर डबे रचून त्यांचे दोन खांब उभे करायचे, आणि त्यावर एक आडवी काठी ठेवायची. काठीवर गोळा टाकून तो खेचून खेचून शेवटी त्याच्या सुतासारख्या बारीक शेवया बनवायच्या.

हे अतिशय कौशल्याचं असं काम ह्या बायका हसत खेळत. गप्पा मारीत अगदी सहजपणे उरकायच्या. आम्हा मुलांना हा शेवयांचा समारंभ एखाद्या नाटकासारखा मनोरंजक आणि रोमहर्षक वाटायचा. शिवाय दुसऱ्या दिवशी घरोघरी शेवयांची खीर व्हायची. ती मजा वेगळीच!

चौदाव्या वर्षी मी मॅट्रिक झालो. त्याच सुमारास, काका रिटायर्ड झाले. मोठ्या दोन सावत्र बहिणींची लग्नं झाली होती. पण बाकी आम्हा पाच भावंडांचं सर्वच व्हायचं बाकी होतं. काकांना पेन्शन मिळणार नव्हती. त्यांना प्रॉव्हीडन्ट फंडाचे वीस हजार रुपये मिळाले. त्यात कुटुंबाच्या सर्व जबाबदाऱ्या पार पडायच्या होत्या. अगदी घर घेण्यापासून!

का नि कसा ते माहित नाही, पण काकांचा माझ्यावर फार विश्वास. मी अगदी मोठा माणूस असावा, असे ते माझ्याशी सल्ला मसलत करायचे. आताही त्यांनी मला जवळ बोलावून, सर्व परिस्थिती सांगितली. आणि विचारलं. " आता आपण काय करू या? "

मी म्हणालो, “काका, पहिल्यांदा आपल्याला घर तर घ्यायला हवं. पण नवीन घर नको घेऊ या. त्यात आपले सगळे पैसे खर्च होतील. त्यापेक्षा आपण दोन जुनी घरं घेऊ. एकात आपण सगळे राहू आणि दुसरं भाड्यानी देऊ. म्हणजे महिन्याच्या उत्पन्नाची सोय होईल. "

माझा सल्ला काकांना पटला. ते म्हणाले, " तुझी कल्पना चांगली आहे. पण मला बाबा किमती ठरवणं, घासाघासी करणं अजिबात जमणार नाही. ते सगळं तू कर. "

काकांच्या या दोन वाक्यांमुळे नकळतच आमच्या घरात एक मोठा बदल घडला. त्या क्षणापासून  वयाच्या चौदाव्या वर्षी माझ्याकडे कुटुंब प्रमुखाची भूमिका आली.

आज मागे वळून पाहताना, खूप आश्चर्य वाटत. काकांनी त्यांच्या आयुष्याची सर्व कमाई माझ्या हाती सोपवली. केवढी मोठी जबाबदारी? पण गम्मत म्हणजे माझ्या पोरपणाविषयी ना त्यांच्या मनात काही शंका होती, ना आणखी कोणाच्या मनात, ना माझ्या! सगळं काही अगदी सहजरीत्या घडलं, मीही ते सहजपणे स्वीकारलं.

मग सुरु झालं माझं घर संशोधन. खूप घरं पाहिली. शेवटी दोन जुनी पडकी पण स्वस्त अशी शेजारची शेजारची घरं मला पसंत पडली.

व्यवहाराची बोलणी करताना काका बरोबर होते. माझ्या हातात सूत्र सोपवून ते गप्प बसले होते. बोलणी करणारा घर मालक साठ वर्षाचा तर गिऱ्हाईक म्हणजे मी चौदा वर्षाचा. पलीकडचा भिडू मुरलेला होतं, पण मी खूप घासाघीस केली. माझ्याच किमतीवर अडून राहिलो आणि शेवटी कमीत कमी पैशात सौदा पटवला.

आयुष्यात पुढे मी यशस्वी बिझनेसमन झालो, त्याची ही नांदी म्हणायला हवी. घरं घेतल्यानंतर मी स्वस्तात दुरुस्ती करणारे काही कामगार बोलवले. सिमेंट, वाळू, रंग असा सगळा माल मी स्वतः बाजारातून खरेदी केला आणि सायकल वरून आणून टाकला.



पाहता पाहता त्या दोन पडक्या घरांचा कायापालट झाला. एकात आम्ही राहायला गेलो तर दुसऱ्या घरात भाडेकरू ठेवले. आमच्या महिन्याच्या खर्चाची थोडी फार सोय झाली होती. त्याच वेळी मग आलं रजनीच लग्न. ' पाहण्याचा' सोहळा उरकला. एकमेकांची पसंती कळली. आता लग्नाची बोलणी, काका, इन्नी आणि मी अशी घरातली वडील (?) माणसं बोलणी करायला गेलो.

इथेही काका गप्प बसलेले. माझा आणि इन्नीचा पुढाकार. वरपक्षाने त्यांची मागणी केली. इन्नीनं हळूच माझ्या कानात विचारलं.

" श्री, काय करायचं रे? "

मला आमचं लग्नाचं बजेट ठाऊक होतं, मी मनातल्या मनात एकूण खर्चाची आकडेमोड केली आणि मग इन्नीला  सांगितलं.

" एवढे पैसे मागताहेत तर ठीक आहे, तुम्ही 'हो' म्हणा. "

इन्नीनं वरपक्षाची मागणी मान्य केली. मग एवढ्या साड्या, एवढे मानपान, इतकी मंडळी जेवायला, अशा अजेंड्यावरच्या सर्व मुद्यांवर चर्चा झाली. वधूपक्षातर्फे ह्या चर्चेत इन्नीनं आणि मी भाग घेतला आणि लग्न ठरलं.

लग्न व्यवस्थित पार पडलं. दुसऱ्या दिवशी इन्नीनं मला रजनीच्या घरी पाठवलं. काहीतरी काम होतं आणि मुख्य म्हणजे रजनीला भेटणं, तिची विचारपूस करणं. हे महत्वाचं काम होतं.

मी गेलो. रजनीचे सासरे मला " ये बस. " म्हणले. पण त्यांच्या बोलण्यात अगत्य नव्हतं. कोरडेपणा होता.

" चहा घेणार का? की घेऊनच आला आहेस? " त्यांच्या ह्या विचारण्याने मी नर्व्हस झालो.

" ताई आहे का? "

" हो, आहे, " एवढंच उत्तर. तेही खालच्या पट्टीत, रुक्ष स्वरात, मी वाट पाहत बसलो. पंधरा वीस मिनिट झाली, रजनी अजूनही बाहेर आली नाही. मला आता काळजी वाटायला लागली. अर्धा तास झाला, रजनीचा अजूनही पत्ता नव्हता. माझ्याशी कोणी बोलत चालत नव्हतं की विचारपूस करत नव्हतं. अचानक मला आपलं रडूच कोसळलं. डोळ्यातून घळा घळा पाणी वाहायला लागलं.

तेवढ्यात रजनीचे दीर बाहेर आले, त्यांनी विचारलं, " काय झालं? " मी न बोलता मान हलवली. ते परत आत गेले.

आणि मग शेवटी रजनी केस पुसत बाहेर आली. माझ्याजवळ येऊन आश्चर्याने म्हणाली,

" श्री, अरे काय झालं? "

मी तक्रारीच्या सुरात विचारलं, " तुला एवढा वेळ का लागलं? "

" अरे मी अंघोळ करत होते, म्हणून वेळ लागला, पण तुला रडायला काय झालं? "

मी अजूनही फुरंगटलेला होतो.

" मला वाटलं, तुला एवढा वेळ लागला म्हणजे सासरी तुला फार त्रास होतो आहे की काय? "

रजनी हसली, तिनं माझ्या डोक्यावरून हात फिरवला, म्हणाली, " वेडा कुठचा"

तिच्या त्या दोन शब्दांनी मला उमगलं, मी अजून लहान मुलगा आहे. लग्नाची बोलणी करताना आणि इतर काम करताना मी जरी अगदी मोठ्या माणसासारखा वागलो, तरी अजून मला खूप काही कळायचं बाकी आहे.

रजनीताईचं लग्न झालं, वेदाचंही झालं. मग केव्हातरी मला सुरसुरी आली की आपण लिहायचं. "लिहिलेलं छापून आलं पाहिजे आणि वर्तमानपत्रात आपलं नाव झळकलं पाहिजे' ही सुप्त इच्छाही होतीच.

" काय लिहावं? " असा विचार करताना मार्ग दिसला. वाचकांची पत्रे! आपण वाचक म्हणून वर्तमानपत्राला पत्र लिहायचं.

माझ्या नावाने पत्र लिहिलं, तर " कोण हा एवढासा पोरगा पत्र लिहतो आहे" असं म्हणून ते पत्र छापणार नाहीत, असं वाटलं, म्हणून मग मी वेदाचं लग्नानंतरचं नाव वापरलं. सौ. विद्या वसंत कुलकर्णी ह्या नावाने मी ' तरुण भारत'च्या संपादकांना एक पत्र लिहिलं. त्यात असं म्हटलं होतं, "आजकाल मुलांवर योग्य ते संस्कार होत नाहीयेत. नोकरीसाठी स्त्रिया घराबाहेर पडत आहेत. पण सर्वांनीच जर असं पैशाच्या मागे धावायचं ठरवलं तर मुलांचं काय? आई वडिलांना मुलांसाठी वेळच नसेल, तर ते मुलांवर संस्कार तरी केव्हा करणार? "

पत्र लिहून झाल्यावर दुसऱ्या दिवशी सकाळी मी ' बेळगाव तरुण भारत 'च्या कार्यालयात गेलो. स्टाफ अजून आलेला नव्हता. संपादकांच्या टेबलवर हे पत्र ठेवून मी गुपचूप निघून आलो.

त्याच्या दुसऱ्या दिवशी सकाळी ' बेळगाव तरुण भारत'चा अंक उघडताना छातीत धडधडत होतं. पाहतो तो काय? 'नोकरीवाल्या स्त्रिया आणि अर्थार्जन ' ह्यावर टीका करणारं सौ. विद्या वसंत कुलकर्णी ह्याचं पत्र छापून आलं होतं. मी आनंदाने उडी मारली.

तिकडे वेदाच्या सासरी आश्चर्याचा धक्का. तिच्या नावाने पत्र छापून आलं आहे आणि ती म्हणते, " हे पत्र मी लिहिलं नाही" म्हणजे बेळगावात आणखी कोणी सौ. विद्या वसंत कुलकर्णी आहे का?

तेवढ्यात ' बेळगाव तरुण भारत'चा अंक विजयी मुद्रेत फडफडवीत मी वेदाच्या सासरी पोचलो. मग सगळा उलगडा झाला. पत्र छापून आलं. म्हणून माझं कौतुक झालं.

माझा आत्मविश्वास बळावला. आता मी आणखी एक पत्र लिहीलं. परत एकदा भल्या सकाळी बेळगाव तरुण भारतच्या कार्यालयात गेलो. स्टाफ अजून यायचा होता. परत एकदा हे पत्र संपादकांच्या टेबलवर ठेवलं आणि पळून आलो.

परत एकदा धडधड्त्या हृदयाने दुसऱ्या दिवशी सकाळी ' बेळगाव तरुण भारत'चा ताजा अंक उघडला. वाचकांच्या पत्र व्यवहारात माझं पत्र छापलं होतं. ह्या वेळचं पत्र असं होतं, " काल सौ. विद्या वसंत कुलकर्णी ह्यांनी स्त्रियांचं अर्थार्जन आणि मुलांचे संस्कार ह्या बाबतीत पत्र लिहीलं आहे, पण एका स्त्रीनंच असे जुने पुराणे विचार मांडावेत आणि स्त्रीच्या स्वातंत्र्यावर गदा आणावी, ह्याचे मला आश्चर्य वाटले. वगैरे वगैरे.. खाली पत्र लेखकाचे नाव, श्रीनिवास ठाणेदार!

हे पत्र दाखवायला आज मी वेदाच्या घरी गेलो नाही, हे सांगायला नको. संध्याकाळी वेदाच घरी आली आणि इन्नीला तक्रार सांगत म्हणाली,

हे चांगलं आहे हं, श्रीचं! जुने पुराणे विचार माझ्या नावावर खपवले आणि उदारमतवादी, मॉडर्न स्त्रीची बाजू घेणाऱ्या पत्रावर स्वतःचं नाव छापलं.

ह्यावर थोडीशी हसाहशी, चिडवा चिडवी झाली आणि प्रकरणं संपलं.

म्हणजे त्या दिवशीच प्रकरणं संपलं. पण वाचकांच्या पत्रव्यवहारात छापून येण्यासाठी मी अनेक विषय शोधले आणि नवनवीन पत्रं लिहिली. कधी 'मुन्सिपालटीनं रस्ते उखडून ठेवले आहेत. त्यामुळे लोकांना त्रास होतो आहे', असं पत्र, तर कधी क्लासची संस्कृती आणि शिक्षकांची व्यावसायिक वृत्ती ' ह्यावर खरपूस टीका!

अलम दुनियेची जबाबदारी आपल्या डोक्यावर घेतली की आपल्या पायाखाली काय जळतंय हे पहायची गरज उरत नाही. आजूबाजूचे गैर व्यवहार मात्र नेमके दिसतात. आणि आदर्श पत्र लेखक होता येतं. अशी माझी बरीच पत्रं छापून आली. काही कचऱ्याच्या डब्यातही टाकली गेली. पण शेवटी माझी हौस फिटली आणि बेळगाव तरुण भारत ह्या पत्र लेखकाला कायमचा मुकला.

मॅट्रिक होईपर्यंत माझ्या अजेंड्यावर 'अभ्यास करणे' हा मुद्दा फारसा नसायचाच. त्याचं कारण पंचावन्न टक्के मार्क्स पडूनही मी भुताच्या वाड्यातल्या किंवा कोंड्याच्या शाळेत वर्गात पहिला असायचा.

कॉलेजमध्ये गेल्यानंतर आजूबाजूच्या मुलांकडे पाहताना आपणही बरे मार्क्स मिळवायला हवेत ह्याची जाणीव झाली. त्याचबरोबर घरात आपल्याला अभ्यासाला योग्य अशी जागाच नाही, ही गोष्टही लक्षात आली.

आमचं घर तीन डब्यांच्या ट्रेन सारखं होतं. बाहेरची खोली, स्वयंपाकघर, आतली खोली. तीनही खोल्या एका रेषेत, एका पाठोपाठ एक.

आपल्याला अभ्यासासाठी छोटीशी का होईना निवांत जागा हवी असं डोक्यात आलं. तेव्हा मी घराच्या कानाकोपऱ्याबाबत विचार केला. मग एकदम मला एक आयडिया सुचली. स्वयंपाक घरात एक जुना माळा होता. तो आम्ही कधीच वापरला नव्हता.

मी शिडीवरून माळयावर गेलो आणि एक जोरदार सफाई मोहीम आखली. जाळी, जलमट, धूळ कचरा, काड्याकुड्या, जुनी कागदपत्र प्रत्येक गोष्ट मी उचलली. शिंका देत, धुळीचे ठसके सहन करीत मी चार दिवस खपलो आणि हा माळा चकाचक केला.

मग खालती एक मऊ गोधडी टाकली. रात्रीसाठी बल्ब लावला. दिवसा कौलांच्या झरोक्यातून येणारा उजेड पुरेशा होता. स्वतःवर खुश होत, मी माझी वह्या पुस्तकं वर नेऊन टाकली.

घरात माझी स्वतःची खोली झाली आणि मला मी भयंकर श्रीमंत वाटायला लागलो. मनात येईल तेव्हा माळ्यावरच्या ह्या निवांत जागी मी झोपून किवा उपडा पडून वाचत असायचा. उन्हाचे चार चुकार कवडसे अलगद खाली उतरायचे आणि पुस्तकाच्या पानाला सोनेरी झळाळी द्यायचे. अशा वेळी हा माळा म्हणजे राजाचा लखलखता महाल आहे आणि मी भाग्यवंत राजपुत्र आहे, ह्याबद्दल माझ्या मनात तिळमात्र शंका नसायची.

माळ्यावरचा राजपुत्र जमिनीवर उतरला की मग मात्र त्याच्या लक्षात यायचं, की 'घराची परिस्थिती दिवसेंदिवस खालावते आहे'

घराचे भाडेकरू वेळेवर भाडं द्यायचे नाहीत. भाडंही बेताचच होतं. त्यामुळे ह्या भाड्यावर घर चालणं अशक्य झालं होतं. हळू हळू घरातले थोडेफार दागिने होते ते गहाण पडले. खाण्यापिण्याचे हाल व्हायला लागले. दुधाचा रतीब अर्ध्यापेक्षा कमी झाला. घरातल्या लहान मुलाला फक्त दुध मिळायचं, बाकीच्यांना चहा, तोही दोनदाच.

मग काका एका शेटजीकडे खाजगी नोकरी करायला लागले. पगार बेताचा होता, पण तेवढा तर तेवढाच!

काही महिने गेले. आमच्या लक्षात आलं, कामावरून येताना काका खूप उदास, खचलेले दिसतात. मनमोकळं बोलायचा त्यांचा स्वभाव नव्हता. पण त्यांनी न सांगताही आम्हाला कळलं, त्यांना काहीतरी खुपत आहे.

आम्ही खोदून खोदून विचारलं, तेव्हा त्यांनी सांगितलं, " शेटजी फार तोंडाळ आणि वाईट माणूस आहे, तो वाटेल तसं बोलतो. अपमान करतो. शिव्याही द्यायला कमी करत नाही. "

आम्हाला खूप वाईट वाटलं, पण गरज आहे खरी! पण म्हणून काय वाट्टेल ते सहन करायचं? काकांसारख्या गरीब स्वभाच्या माणसावर केवळ पोटासाठी ही पाळी यावी?

इन्नी म्हणाली, "सोडून द्या ती नोकरी! भागवू आपण कसं तरी!"

मीही तिच्या म्हणण्याला दुजोरा दिला.

म्हणणं ठीक होतं, पण परिस्थितीचे  चटके सहन करणं खूप खूप कठीण होतं. काकांची  थोडीफार कमाईही बंद झाली. त्यानंतरची दिवाळी.

आमच्या घरी खूप पितळी डबे होते. नेहमी त्यात डाळी, पीठ असं सामान भरलेलं असायचं. आमच्या ह्या कठीण काळात डबे रिकामे राहायला लागले. ह्या एका दिवाळीला फराळाचा एकही जिन्नस करता आलं नाही. डब्यात पीठं नाहीत, डाळी नाहीत, फराळ तर नाहीच नाही. सर्व खडखडाट.

घरात काही नसलं तरी इन्नीकडे कोंड्याचा मांडा करण्याची कला होती. ज्वारी, तांदूळ, गहू संपलेले असायचे. डब्यात त्याचा उरलेला रवा तेवढा असायचा. हा रवा पाण्यात शिजवायचा, त्यात तिखट्मीठ घालायचं आणि मूठभर रव्याची भांडं भरून कण्हेर करायची. भुकेच्या वेळी ही गरम गरम कण्हेर पिऊन आत्मा शांत व्हायचा. निदान तात्पुरता.

शेवटी मी ठरवलं, आपण मिळेल ती नोकरी करायची. घरी हे सांगण्याची सोय नव्हती. इन्नी आणि काकांच्या आत्मसन्मानाला ठेच पोचली असती. माझ्या कॉलेजच्या शिक्षणासाठी काकांनी जमीन गहाण ठेवून कर्ज काढलं होतं. ते ठीक होतं त्यांच्या दृष्टीने!

पण ' कॉलेजला जाणारा मुलगा कुठलं तरी मिळेल ते हलकंसलकं करून पैसे काम करून पैसे कमावतो आहे' हे त्यांना मुळीच सहन झालं नसतं.

तेव्हा घरी न सांगताच मी काम शोधायला लागलो.

बेळगावात एक आपटे नावाचे डेंटिस्ट होते. आमच्या ओळखीचे होते. एकदा मला कळलं की त्यांच्याकडे काम करणारा मुलगा सध्या काम सोडून गेला आहे. मी असा सहज गेल्यासारखा त्यांच्या दवाखान्यात गेलो. बोलता बोलता सहज असं विचारलं, " सध्या तुमच्याकडचा काम करणारा मुलगा दिसत नाही? "

ह्यावर ते दुःखाने म्हणाले, " हो रे! बघ ना! चांगला मुलगा मिळणं फार कठीण झालंय बाबा!"

मी विचारलं, " मी मदत करू का तुम्हाला? "

त्यांना आश्चर्याच वाटलं, ते म्हणाले, " तू? तुला चालेलं? "

मी उत्साहाने म्हणालो, " हो. न चालायला काय झालं? " नाहीतरी कॉलेज करून मला बराच वेळ असतो. त्याचा उपयोग होईल. माझ्या शिक्षणाला थोडा हातभार लागेल. "

डॉक्टर म्हणाले, " ठीक आहे, " त्यांनी कामाच्या वेळा आणि काम सांगितलं, पगार ठरला, महिन्याला दोनशे रुपये. मी ' हो' उद्या येतो' असं सांगितलं, आणि आनंदाने घरी गेलो.

दुसऱ्या दिवसापासून माझी ' दवाखान्यातली हरकाम्या नोकर' ही आयुष्यातली पहिली नोकरी सुरु झाली.

डॉक्टर आपटे यायच्या आधी दवाखाना साफ करायचा, मग, डॉक्टर स्कूटर वरून आले की त्यांची बॅग उचलून वर न्यायची. त्याशिवाय कामाच्या वेळी डॉक्टरना मदत, मग परत एकदा साफ सुफी, की काम संपलं.

डॉक्टरांच्या कामासाठी घरून निघताना मी घरी सांगायचा, "मित्राकडे अभ्यासाला जातो" सुदैवाने कधी कोणी मला "कुठल्या मित्राकडे"? असं विचारलं नाही. त्यावेळी कोणाकडे फारसे फोन नसल्यामुळे माझं खोटं बोलणं उघडकीला यायचाही सवाल नव्हता.

ती वेळ एकदा डॉक्टरांच्या दवाखान्यातच आली. डॉक्टरांचा दवाखाना पहिल्या मजल्यावर होता. जिन्यात पावलं वाजली की हळूच जिन्यात डोकावून पाहायचो.

एक दिवस ' कोणीतरी आलं' म्हणून मी जिन्यात नजर टाकली आणि भूत पहिल्यासारखा दचकलो.

इन्नीची एक मैत्रीण वर येत होती. मी इतका घाबरलो की डॉक्टरांना काही न सांगता मागच्या दाराने पसार झालो.

दोन तीन तासांनी परत आलो, तर डॉक्टर खूप चिडले होते. मला रागावून विचारलं "कुठे गेला होतास तू? इथे पेशंटची लाईन लागलेली, मी कितीदा बेल वाजवली."

मी मान खाली घातली, पण मग मात्र त्यांच्याशी मोकळेपणानं बोललो. 'मला घरी कळू द्यायचं नाहीये' हे त्यांना सांगितलं. माझा प्रॉब्लेम त्यांच्या लक्षात आला. आणि त्यानंतर त्यांनी मला सांभाळून घेतलं. हा त्यांचा खूप चांगुलपणा.

डॉक्टरांकडे मी तीन वर्ष काम केलं. त्यांच्याकडून मिळालेले पैसे मी थोडे घरी वापरायचो आणि थोडे माझ्या खर्चासाठी ठेवायचो. घरातलं सामान आणण्यासाठी इन्नी माझ्याकडे पाच दहा रुपये द्यायची. मी त्यात माझे पैसे घालून जरा जास्त सामान आणायचो.

माझी ही युक्ती इन्नीच्या लक्षात येत नसे. तिला वाटायचं, श्री बाजारहाट काळजीनं आणि छान करतो. पाच दहा रुपयात आठवड्याला पुरेल एवढी भाजी आणतो.

नाही म्हणायला, बहिणींना एक दोनदा संशय आला. त्यांना कोणीतरी सांगितलं, की 'तुझा भाऊ डॉ. आपटेंच्या दवाखान्यात नोकर म्हणून काम करतो.' त्यावर वेदानं आणि रजनीनं मला त्याबद्दल विचारलं, पण मी ते उडवून लावलं.

कॉलेजचे  दिवस, म्हणजे सुरवंटानं फुलपाखरू होण्याचे दिवस अशी सर्वसाधारण कल्पना! माझ्या बाबतीत उलट झालं.

घरची परिस्थिती ह्याच काळात विकोपाला गेलेली, त्यामुळे ' मजा करणे' हे शब्दही गुन्हा केल्यासारखे वाटायचे. त्यात माझा आणखी एक भ्रम दूर झाला. पंचावन्न टक्के मार्क्स मिळवूनही शाळेत पहिला दुसरा नंबर  असल्याने 'मी हुशार आहे' असा एक गैरसमज होता. कॉलेजमध्ये आल्यानंतर इतर मुलांना मॅट्रिकला साठ, सत्तर, ऐंशी टक्के मार्क्स पडले आहेत, हे कळलं, आणि धक्काच बसला. इंग्रजीतून अभ्यास करणं खूप कठीण आहे, ही जाणीवही घाबरवणारी होती.

प्रतिकूल परिस्थितीचा प्रत्येकावर वेगळा परिणाम होतो. सर्व बाजूनी केवळ ताण आणि खचून जाण्यासारखं वातावरण होतं, पण म्हणूनच माझ्या मनात ईर्षा निर्माण झाली.

' मी परिस्थितीला शरण जाणार नाही. मी काहीतरी करून दाखवीन. "

छोट्या छोट्या गोष्टींनी माझ्या मनातल्या महत्वाकांक्षेला खतपाणी घातलं गेलं. डॉक्टरांच्याकडे नोकरी मिळाली. हातात चार पैसे आले, त्याचा घरासाठी उपयोग झाला, तसाच माझ्यासाठीही!

माझी चैनीची व्याख्या म्हणजे महिन्यातून एखादा सिनेमा पाहणं आणि मित्रांसोबत कधी तरी मटण खाणं. ह्या दोन्ही गोष्टी चोरून कराव्या लागायच्या, पण त्या जमायला लागल्या. स्वर्ग सुख तरी ह्याहून वेगळं काय असतं?

आपण अभ्यास केला पाहिजे आणि परीक्षेत चांगले मार्क्स मिळवले पाहिजेत, असा निश्चय मी ह्याच काळात पहिल्यांदा केला. मनातल्या मनात मी अनेक गोष्टी ठरवायला लागलो. त्याही ह्याच काळात.

' पैशांसाठी आता आपले जे हाल आहेत, तसे परत कधी होता कामा नयेत, ' ही एक खुणगाठ.

बेळगावला श्रीमंत लोकांचे अनेक सुंदर बंगले होते. त्यातला एक आमदारांचा बंगला माझ्या अगदी मनात भरला. इन्नीला मी तो बंगला एकदा दाखवला आणि म्हटलं,

" तू बघ, इन्नी! मी असाच बंगला घेऊन दाखवेन. "

पुढे कित्येक वर्षांनी सेंट लुइसला स्थिर स्थावर झाल्यावर मी तसाच नव्हे, तर त्याहून कितीतरी सुंदर, अलिशान, प्रशस्त बंगला घेतला, तेव्हा माझे ते शब्द इन्नीला आठवले असतील.

प्रतिकूल परिस्थितीत सोनेरी अशा निर्माण करणारे काही किरण होते. बीएस्सी. ला फ़र्स्टक्लास मिळाला, हा असाच एक क्षण. हा क्षण माझ्या सामान्य आयुष्यातला टर्निंग पॉइन्ट ठरला.

## सेंट लुईसमधील घर



आपण काही ठरवलं, श्रम केले, तर आपण काहीही मिळवू शकतो, अशी सुखद जाणीव मला त्या क्षणी झाली. पंख पसरून आकाश कवेत घेण्याचं स्वप्न मला त्या क्षणानं दिलं.

' फ़ासन युअर सीट बेल्ट'! अशी अक्षर परत एकदा चमकायला लागली. विमानाचा कॅप्टन प्रवाशांचा निरोप घेत म्हणाला, ' आपलं विमान काही मिनिटातच मुंबईच्या सहार एअरपोर्टवर उतरेल. आमच्या हवाई सेवेचा लाभ घेतल्याबद्दल धन्यवाद!"

मी विमानाच्या खिडकीतून बाहेर पाहिलं, लाखो दिव्यांच्या रोषणाईनं चमचमणारी मुंबई माझं स्वागत करत होती. आणि इथून दीड तासाच्या हवाई अंतरावर असलेल्या बेळगावातल्या माझ्या घरी माझी माणसं आता प्रत्येक क्षण मोजत होती. मी नकळत घड्याळाकडे पाहिलं. घड्याळात अजूनही अमेरिकेतली वेळ दिसत होती. घाई घाईनं मी काटे फिरवायला लागलो. भारतातील वेळ जमवून, भारतात पाऊल टाकायला मी अधीर झालो होतो.

१९७९ सालच्या फेब्रुवारी महिन्यात अमेरिकेत गेलेला मुलगा. १९८४ सालच्या मे महिन्यात तब्बल सव्वापाच वर्षांनी परत घरी येत होता. तोही शिक्षण संपवून, चांगली नोकरी मिळवून, बेळगावला आमचं घर आनंदानं ओसंडून वाहत होतं.

मी घरात प्रवेश केला आणि एकच कल्लोळ सुरु झाला. सर्व भावंडं एकत्र जमली होती. सर्वांना माझ्याशी बोलायचं होतं. पण दोन चार मिनिटातच एक विचित्र गोष्ट माझ्या लक्षात आली.

मला मराठी नीट बोलत येत नव्हतं. ' मी माझी मातृभाषा विसरलो? चौवीस वर्ष जी भाषा बोलत होतो, ती पाच वर्षात परकी झाली? कसं शक्य आहे? '

मी गोंधळलो. घरातली मंडळी माझ्याकडे काहीशा आश्चर्याने पाहायला लागली. त्यांच्या नजरेत थोडीशी निराशाही होती का? असणार. मला तसं स्पष्ट जाणवलं.

दोष माझाच होता. एकतर ही भाषेची गोची. त्यातून मी यशस्वी होऊन परत आलेल्या ' फॉरेन रिटर्न ' माणसासारखा अजिबात दिसत नव्हतो.

दिसणार  तरी कसा? गेली पाच वर्ष अमेरिकेतल्या युनिव्हर्सिटी कॅम्पसवर राहत होतो. तिथे जे कपडे वापरत होतो, तेच इथेही माझ्या अंगावर होते. अमेरिकेतल्या विद्यार्थ्यांचा युनिफॉर्म म्हणावा, अशा गुडघ्यावंर फाटक्या जीन्स आणि अत्यंत ढगाळ विटका टी शर्ट! दाढी थोडीशी वाढलेली. चेहऱ्यावर 'मला कोणाची पर्वा नाही. आय डोंट केअर' असं टिपिकल भाव आणि एकूणच व्यक्तिमत्त्वात बंडखोर वृत्तीची  छटा !

बहिणी स्पष्ट बोलणाऱ्या. त्यांनी भाषेबद्दल मला टोकायला कमी केलं नाही. मी सारवासारवी न करता थोडंसं स्पष्टीकरण दिलं,

" अगं, वीणा, वेदा, तुमच्या प्रमाणेच माझ्याही लक्षात येतंय, कि, 'मी मराठी बोलताना अडखळतो आहे.' चूक की बरोबर माहित नाही. पण कारणंच शोधायची तर पहिलं कारण, मी गेल्या पाच वर्षात एकही मराठी शब्द बोललेला नाही. मी जिथे होतो, तिथे मराठी माणसं नव्हती आणि असली तरी त्यांच्याशी माझा संबंध नव्हता. गेली पाच वर्ष मी फक्त इंग्रजी भाषा बोलतो आहे. तीही अमेरिकन इंग्रजी. ह्या पाच वर्षात फोनवरूनही तुमच्याशी बोलण्याचा संबंध आला नाही. पत्र लिहिण्यापुरता मराठी भाषेचा वापर व्हायचा.

कुठलीही गोष्ट न वापरता पडून राहिली, तर त्यावर गंज चढतो की नाही? तसं झालं आहे. पण काळजी करू नका. मराठी कानावर पडली, मराठी बोलत राहिलो, की सरावाने होईल सर्व नीट!"

हे भाषणही मी चुकीचे उच्चार करत, अडखळत केलं. पण सर्वांना मतितार्थ कळला. माझ्या हेतूबद्दल कोणाला शंका उरली नाही. मग इन्नीने व्हेटो वापरून समारोप केला.

" बोलणं ठीक आहे, पण उद्यापासून कपडे इथल्यासारखे नीट नेटके घाल हं. लग्नाचा मुलगा शोभायला हवा. "

मी उडालोच. " लग्न? "

" म्हणजे काय? आता लग्नाचंच वय आहे तुझं! ह्या खेपेला लग्न उरकूनच परत जायचं. आम्ही दोन तीन मुली पाहूनही ठेवल्या आहेत. "

" अगं पण.. "

माझं बोलणं कोणीही ऐकून घेतलं नाही, माझ्यासाठी सगळ्यांनी काही छान बेत आखले होते. माझं मत विचारात घेण्यापेक्षा, " आपण आता काय काय करायचं. ' ही चर्चा, महत्वाची होती. मी हसलो. कारण खरं सांगायचं, तर तोंडान 'नको नको, एवढ्यात कशाला? " असं म्हणालो, तरी मनातून मलाही आता लग्न करावंसं वाटत होतंच!

रात्री किती उशीर झाला, तरी झोपच येईना. जेटलॅग असेल किंवा एकूणच विचारांची गर्दी असेल. एक्साईटमेंट असेल. एक गोष्ट निश्चित होती की आता उमेदवारीचे दिवस संपले होते आणि गृहस्थाश्रमाची पायरी चढायची वेळ आली होती.

मी दोन महिन्यांची सुट्टी घेऊन आलो होतो. ह्या काळात मुलगी पसंत करणे, लग्न पार पडणे, अशी आयुष्यातली फार मोठी जबाबदारी निभावून न्यायची होती, त्यामुळे घरात ' लगीन घाई' ह्या नाटकाचा पहिला अंक सुरु झाला.

इन्नीच्या उत्साहाला उधाण आलं. बेळगावात तिनं आणि काकांनी पाहिलेल्या, पसंत केलेल्या, दोन तीन मुलीना परत भेटण्याचे कार्यक्रम तिनं ठरवून टाकले.

संध्याकाळी आम्ही पहिल्या मुलीच्या घरी जायला निघालो. तेव्हा तिनं भराभर माहिती पुरवली. "मुलगी चांगली आहे, घरचे लोकही फार चांगले आहेत. कानडी वैष्णव आहेत ही मंडळी! घराणं अगदी नावाजलेलं, आणि घरचंही फार चांगलं. "

मी म्हणालो, " हे सर्व ठीक आहे, इन्नी! पण त्या मुलीचा स्वभाव कसा आहे? तिच्या आवडी निवडी काय आहेत? हे माहित आहे का तुला?

इन्नी म्हणाली, " हे बघ ह्या सर्व गोष्टी काही आम्ही विचारल्या नाहीत पण तुला हवं ते तर तू विचार. आज त्यासाठीच तर चाललो आहोतं. बरं, आता स्वच्छ तोंड धू आणि चांगले कपडे घाल. "

मुलीच्या घरी पोचलो.

' या बसा, " ' हवा पाणी, चहा पोहे, ' सर्व कार्यक्रम उरकला.

मी मुलीला विचारलं, " पुढे शिकायचा बेत आहे का? "

ती खालमानेनं म्हणाली, " तुमची इच्छा असली तर शिकेन. "

मी म्हणालो, " नोकरी, करियर ह्या बाबतीत काय ठरवलं आहे? त्या बाबतीत काही आवडी निवडी आहेत का? "

मुलीनं उत्तर दिलं, " मी काही ठरवलं नाहीये. पण तुमची इच्छा असेल तर नोकरी करेन. "

तिच्या घराची मंडळी, माझ्या घराचे लोक सगळे एकत्र बसलो होतो. मी मुलीशी बोलत होतो, तेव्हा सगळेजण नाटक पाहिल्यासारखे आमच्याकडे उत्सुकतेने पाहत होते.

मी तिच्या घरच्यांना विचारलं, "आम्ही दोघं कुठे बाहेर जाऊन बोललो, तर तुम्हाला चालेलं का?"

क्षणभर शांतता पसरली.

' असं केलेलं, चालणार नाही, ' ही भावना मुलीकडच्या मंडळीनी बोलून दाखवली नाही. पण तसं त्यांच्या चेहऱ्यावरून कळून आलं. हा सांस्कृतिक धक्का त्यांना पचायला जड गेला. मग पटकन मुलीचे वडील म्हणाले, " तुम्हाला दोघांना जे काही बोलायचं ते इथेच बोला ना! आम्ही सर्व पलिकडच्या खोलीत बसतो. "

ह्या युक्तीचा काही विशेष उपयोग झाला नाही, मुलगी मोकळेपणानं बोलली नाही.

थोड्या वेळानं घरातली मंडळी, तिची आणि माझी परत बाहेर आली. आता मुलीकडच्यानी मला विचारलं, " अमेरिकेत तुमचा घर बीर असेल ना? "

मी म्हणालो, " छे हो, आत्तापर्यंत शिकत होतो, तेव्हा भाड्याच्या घरात राहत होतो. इथे येताना ते सोडून आलो. "

" अस्सं? मग सामानसुमानाचं काय केलं? "

" सामानसुमान काही फारसं नव्हतंच, रोजच्या गरजेच्या चार गोष्टी. "

" पाच वर्षात बँकेत शिल्लक बरीच जमली असेल. "

मी म्हणालो, " शिल्लक कुठली? विद्यार्थ्याला त्याच भागेलं, इतकेच जेमतेम पैसे मिळतात. आता इथे येताना क्रेडीट कार्डवर कर्ज काढून तिकीट खरेदी केलं. "

" पण आता नोकरी लागली आहे ना? पगार वगैरे कितपत? "

" ठीक आहे, अमेरिकेतली पहिलीच नोकरी आहे माझी, त्या मानाने बरा आहे. "

मुलीकडच्याना जे ऐकायचं होतं, ते काही त्यांच्या कानावर पडलं नाही. ' डॉक्टर ही पदवी आणि नोकरी असली, तरी एकूण मी काही फार पैसेवाला नाही. " हे लक्षात आल्याने, त्यांचे चेहरे जरा पडलेच!

निरोप घेऊन आम्ही घरी आलो, तर रजनी मला रागावली.

" श्री, तू असं का सांगितलंस? त्यांना काय वाटेल? "

मी म्हटलं, " अगं, पण मी खरं तेच सांगितलं, त्यांना बरं वाटावं, म्हणून मी खोटं काहीतरी सांगू का? "

इन्नीन विचारलं, " मुलगी कशी वाटली? "

मी म्हणालो, " मुलगी मला फक्त दिसली, तिचं दिसणं ठीक होतं, पण मुलगी कशी आहे, ते मला कळलं नाही, ती मोकळेपणाने बोलली नाही. जे बोलली, त्यात तिचं असं काहीच मत नव्हतं. खूप दबलेली वाटली. तिनं एकदाही मान वर करून पाहिलं नाही. खाली पायाकडे बघून बोलत होती.

ह्यानंतर बेळगावला अजून दोन तीन मुली पाहिल्या. सगळीकडे थोड्याफार फरकाने, ह्याच नाटकाची पुनरावृत्ती! दोष मुलींचा किंवा त्यांच्या घरच्यांचा नव्हता. त्यांच्या आणि माझ्या विचारसरणीत फरक होता. शेवटी मी घरी सांगितलं.

" तुम्ही आता माझ्यासाठी मुलगी शोधू नका. काय करायचं ते माझं मीच ठरवतो. "

त्या रात्री मी खूप विचार केला, "एखादी व्यक्ती आवडल्याशिवाय, तिच्याविषयी प्रेम वाटल्याशिवाय लग्न करायचं नाही. " ही अमेरिकन पद्धत मला पूर्णपणे पटली होती. पण डेटिंग, प्रेम आणि लग्न ही पद्धत कितीही आदर्श वाटली, तरी ह्या प्रकाराने माझं लग्न जमलं नव्हतं. ही वस्तुस्थिती होती.

मर्लिननंतर अजून एकदोन असफल प्रेम प्रकरणं झाली, त्यातून मला मिळालं प्रेमभंगाच दुःख आणि मनस्ताप! इतक्यांदा मन लावलं, आणि बिनसलं, तेव्हा "आपल्यासाठी पारंपारिक भारतीय पद्धतीशिवाय पर्याय नाही' हे मला मान्य करावं लागलं.

मात्र बघून मुलगी पसंत केली, तरी तिचा स्वभाव, वागणं, मत आणि विचार पटले पाहिजेत, ह्या बाबतीत मी अगदी ठाम होतो.

मला हवी होती, स्वतंत्र विचारसरणीची, आत्मविश्वास असलेली, कर्तृत्ववान मुलगी. ती फार श्रीमंत नको, अमेरिकेवर भाळलेली नको, माझ्या 'हो 'ला हो करणारी नको.

विचारात गुंगलो. मनातल्या मनात तिचं स्वभाव चित्र काढण्यात रमलो आणि मग माझं मलाच हसायला आलं. बाजारात तुरी... कशाला? आधी एखादी मनपसंत मुलगी भेटू दे. कदाचित त्यावेळी हे सगळे विचार बाजूला राहतील आणि मी तिच्या प्रेमात पडून गुडघ्याला बाशिंग बांधून मांडवात शिरेन. पुढचं कोणी बघितलं आहे?

दुसऱ्याच दिवशी मी टाइम्स ऑफ इंडियात 'वधू पाहिजे' अशी जाहिरात दिली. जाहिरातीला दोनशे उत्तरं आली. त्यातली चाळीस पत्र मी निवडली. ह्या सर्व मुली मुंबई पुण्याच्या होत्या. मग असं ठरलं, की मुंबईला आपली राहण्याची सोय नाही. मात्र पुण्याला मात्र आपण शैलाताईकडे (मावस बहिण) चार दिवस राहू शकतो. निवडलेल्या सर्व पत्रांना मी उत्तरं पाठवली. पुण्याच्या तसंच मुंबईच्याही मुलींना शैलाताईचा पत्ता कळवला, आणि भेटण्याचा दिवस, वेळ पक्की केली.

शैलाताईकडे पोचलो. तिनं अगत्यानी माझं स्वागत केलं. मग प्रश्न आला, ' घरातली कुठली जागा ह्या वधू संशोधन कामासाठी राखली जावी? " शैलाताईचं घर खूपच छोटं. दोन खोल्या, गॅलरी, देवघर इतकीच तिची जागा. दररोज किमान आठ ते दहा मुलीना मी भेटणार होतो. किंवा त्या मला पाहायला येणार होत्या.

बाहेरची खोली बाद, कारण तिथे सतत मुलं, नोकर, शेजारी, आले गेले ह्यांचा राबता. राहता राहिली गॅलरी आणि देवघर. मी म्हणालो.

"शैला ताई, आम्ही गॅलरीत बसून बोलू," पण ती म्हणाली, " नको अरे लोकांना वाटेल हिचा भाऊ दिवसभर गॅलरीत वेगवेगळया मुलींशी बोलत बसतो. वाईट दिसेल ते. त्यापेक्षा तुम्ही देवघरात बसा. "

शैलाताईची आज्ञा प्रमाण मानून मी एकूण तीस पस्तीस मुलीना ह्या देवघरात भेटलो. खिडकी नसलेल्या अंधाऱ्या देवघरात दोन तरुण माणसं, आपल्या उभ्या आयुष्याचा सवाल सोडविणार आहेत. हे दृश्य तसं जरा विनोदीच. पण सत्य हे कल्पनेपेक्षा अद्‍भुत आणि विनोदीही असतं, हे मला कळलं.

ज्या पाहिल्या, त्यातल्या एकदोन मुली मला आवडल्या. पण त्यांना मी आवडलो नाही. काहीच्या आई वडिलांनी बोलून दाखवलं, " हा मुलगा एकटाच का मुली बघतो आहे? त्याचे आई वडील बरोबर का नाहीत? काहीतरी गोलमाल असणार!”

काही मुली मोकळेपणानं बोलल्या नाहीत. काही फारच मोकळेपणान बोलल्या. "मला असंच पाहिजे, मला ही गोष्ट चालणार नाही." वगैरे वगैरे.

शेवटी मला एक मुलगी आवडली, तिनंही मला पसंत केलं. मी तिच्या आई वडिलांशी बोललो. म्हटलं, "मला मुलगी पसंत आहे, आता तुम्ही एकदा बेळगावला या, माझ्या आई वडिलांना भेटा. म्हणजे आपण लग्नाची तारीख आणि इतर गोष्टी पक्क्या करू."

ते 'हो' म्हणाले, ' बेळगावला केव्हा येतो आहोत ते फोन करून कळवतो' असं म्हणाले.

लग्न ठरलं, ह्या आनंदात मी बेळगावला परत आलो. चार दिवस गेले, आठ दिवस होऊन गेले. ह्या लोकांचा फोन नाही. पत्र नाही. आम्ही काळजीत पडलो. शेवटी मीच फोन केला. पलीकडून उत्तर मिळालं,

" आत्ता मुलीचे वडील घरात नाहीत, नंतर फोन करा, "

मी परत फोन केला, " अहो, काय झालं? आम्ही तुमच्या फोनची वाट पाहात होतो."

मुलीचे वडील तटकन म्हणले, " हे काही जमणार नाही. "

" जमणार नाही? पण कारण काय? "

" पत्रिका जमत नाही" मला कमाल वाटली.

" अहो, तुम्ही मागीतलीत, म्हणून केवळ मी पत्रिका दिली. पण माझा पत्रिकेवर विश्वास नाही. "

" आमचा आहे. हे लग्न होणं शक्य नाही. "

मी फोन खाली ठेवला, पण मला चांगलाच धक्का बसला होता. काही नाही, तरीही मन गुंतलेलं असतं. तो अपेक्षाभंग! आणि सुट्टीपैकी दीड महिना संपला, अजून लग्नाचं प्रकरण, जैसे थे! एक इंचही पुढे सरकलेले नाही. आता काय करायचं?

माझ्यापेक्षाही निराशा झाली इन्नीची आणि काकांची! लग्नाचं वय आहे. एवढा कष्ट करून मुलगा अमेरिकेहून शिकून आला आहे आणि लग्न जमत नाही. ते खूपच काळजीत पडले.

निराशा माझीही झाली होती. पण ती न दाखवता, मी 'हे प्रकरणं तडीला न्यायचंच' असा निश्चय केला आणि परत एकदा लग्नाची मोहीम हातात घेतली.

माझ्या जाहिरातीला ज्यांनी उत्तर पाठवली होती आणि ज्यांना मी पुण्यात येऊ शकाल का? " असं विचारणारी पत्र लिहिली होती, त्यापैकी काही मुली पुण्याला येऊ शकल्या नाहीत. ह्या सर्व मुंबईच्या होत्या.

मी म्हटलं, "आता हा एक शेवटचा प्रयत्न. मुंबईला रहायची काहीतरी सोय करू, मुंबईला जाऊ, पत्र व्यवहार करण्याएवढा आता वेळ नाही, सुट्टी संपत आली आहे. पण जमलं तर फोन करून भेटीची वेळ ठरवू. नाहीतर पत्ते शोधून, एकेकीच्या घरी जावून, सरळ दत्त म्हणून उभे राहू. "

सुदैवाने मुलुंडच्या एका लांबच्या नातेवाइकाकडे उतरायची सोय झाली. मी ताबडतोब निघालो. मुलुंडला येऊन पोचलो. मुलुंडचे नातेवाईक कुठे बाहेरगावी गेले होते. पण त्यांची मुलगी घरी होती. तिनं माझं आगत स्वागत केलं. तिचं नाव ताई.

नशिबाने कशा कशा माणसांची एकत्र गाठ पडते, ते पाहिलं की गम्मत वाटते. मी उतावळा नवरा, तर ही माझ्याहून दहा बारा वर्षांनी मोठी अशी ताई, संन्याशी! पाहताक्षणीच आदर वाटावा असं तिचं शांत, सौम्य व्यक्तिमत्व. तिनं लग्न केलं नव्हतं. तिला लग्न करायचंही नव्हतं. दिवसभर जपजाप्य, देवपूजा, श्लोक आणि मंत्रपठन, पोथीवाचन ह्यातच तिचा सर्व वेळ जायचा.

तिनं माझी आपलेपणाने विचारपूस केली, आणि माझ्या मोहिमेला शुभेच्छा दिल्या.

मुंबईत मला एकूण अठरा मुलीना भेटायचं होतं. काही आधीच्या यादीतल्या होत्या. तर काहींची नव्यानं पत्रं आलेली होती. मी मुंबईत फक्त चार दिवस राहणार होतो. त्यामुळे ह्या वेळी कामाची अगदी काटेकोर आखणी केली होती.

एक दिवस बोरीवली, गोरेगाव, अंधेरी, असं दौरा करायचा. तर दुसऱ्या दिवशी दादर, वरळी गिरगावला भेट द्यायची. ज्यांचे नंबर होते, त्यांना फोन केले. आणि भेटायला यायची वेळ ठरवली.

एक एक दिवस कसा संपला कळलंच नाही. मुंबई भर प्रवास करून रात्री मी मुलुंडला परत आलो की ताईशी गप्पा गोष्टी व्हायच्या. मला इथे बोलायला सांगायला दुसरं कोणीच नव्हतं.

विशेष म्हणजे जी ताई लग्न संसार ह्याच्या पलीकडे जाऊन परमार्थाची पूजा करत होती, ती माझ्या छोट्या मोठ्या सुखदुःखाच्या गोष्टी मित्रत्वाने ऐकून घ्यायची. क्वचित काही चांगल्या सूचना करायची. मी योजिलेलं कार्य सिद्धीस जावं, अशी तिची प्रामाणिक इच्छा असायची.

चौथ्या दिवशी संध्याकाळी, मी मुलुंडला ताईच्या घरी परत आलो. तो अत्यंत निराश होवून. चार दिवसात हाती काहीच लागलं नव्हतं. मनासारखी कोणीच भेटली नव्हती. माणूस नावाच्या प्राण्याचे अनुभव मात्र उदंड आले.

गोरेगावला एका घरी मी पोचलो, इथल्या सुचेता नावाच्या मुलीनं माझ्या जाहिरातीला उत्तर पाठवलं होतं. तिच्या पत्रात फोन नंबर नव्हता. तेव्हा फोन न करताच मी पत्ता शोधून गेलो. घराची बेल वाजवली.

एका तरुण मुलीनं दार उघडलं. ही सुचेता असणार, असा मी अंदाज बांधला. दारातूनच मी माझी ओळख करून दिली.

" हलो, मी श्री ठाणेदार, अमेरिकेतून आलो आहे. तुम्ही सुचेता का? "

ती गोंधळून माझ्याकडे नुसतीच पाहात उभी राहिली. मी म्हणालो, " मी टाइम्स ऑफ इंडियात लग्नासाठी जाहिरात दिली होती. त्याला तुम्ही उत्तर पाठवलं होतं. "

ती आणखीनच बुचकळ्यात पडली आणि माझ्याकडे संशयाने पाहायला लागली. दारातून बाजूला न होता तुटकपणे म्हणाली,

" तुमचा काहीतरी गैरसमज झालेला दिसतो आहे. मी तुमच्या जाहिरातीला पत्र पाठवलं नव्हतं. "

आता आश्चर्य चकित होण्याची पाळी माझी होती.

नशिबाने मी मला आलेली पत्रं बरोबर आणली होती. जवळच्या फोल्डर मधून मी तिचं पत्र काढून तिला दाखवलं. " हे तुमचंच पत्र ना? "

ती मानेनं ' नाही' असं म्हणत होती. तेवढ्यात घरातून आवाज आला.

" सुचेता, अगं मी पाठवलं होतं ते पत्र. "

सुचेता आणि मी दोघंही आवाजाच्या दिशेने पाहायला लागलो.

आतल्या खोलीतून एक मध्यमवयीन बाई बाहेर आल्या. माझा चेहरा फोटो काढण्यासारखा झाला, तर सुचेतानं रागावून विचारलं,

" आई तू? तू पाठवलंस पत्र? माझ्या नावाने? "

त्यानंतर त्या दोघीची वादावादी सुरु झाली. सुचेताचं म्हणणं,

" मला लग्न करायचं नाहीये, हे माहित आहे नं तुला? "

तर आईचं ओरडणं, " हो हो माहित आहे, लग्न करायचं नाही म्हणायचं आणि नसती थेरं करायची. "

आता सुचेताही टिपेच्या आवाजात, " कसली गं थेरं? "

आईने बाहेरच्या खोलीतल्या कोचावर बसलेल्या एका माणसाकडे बोट रोखलं, आता कुठे माझं त्याच्याकडे लक्ष गेलं. तो एक आफ्रिकन काळा माणूस होता. आई उध्वस्त झाल्यासारखी किंचाळली.

" चांगली स्थळं सोडशील आणि ह्या काळयाचा हात धरून पळशील, तर मला नाही चालायचं. "

बापरे! ह्या घरात धुमसत असेलेल्या ज्वालामुखीनं, माझ्या एन्ट्रीमुळे पेट घेतला होता. मी अजूनही दारातच उभा होतो. तिथूनच ह्या मायलेकींचा निरोप घेत मी पुटपुटलो, “सॉरी, माझ्यामुळे तुम्हाला त्रास झाला. "

दोघींचं माझ्याकडे लक्षही नव्हतं. एकमेकींवर तारस्वरात ओरडण्यात दोघी मग्न होत्या. मी तिथून हळूच निसटलो, लग्न जमवायला गेलो, आणि झालं भलतंच.

आणखी एका ठिकाणी गेलो, तर माझं प्रचंड प्रेमाने स्वागत, ह्या गृहस्थांच्या दोन मोठ्या मुली लग्न करून अमेरिकेत गेल्या होत्या. आता तिसऱ्याही मुलीचं लग्न त्यांना अमेरिकेतल्या मुलाशी करायचं होतं. ते ठीक आहे. पण त्यासाठी मुलाची आणि मुलीची एकमेकांना पसंती पाहिजे ह्याचा विचार करीत नव्हते.

पहिल्याच भेटीत मला पटविण्यासाठी लालूच दाखवीत ते म्हणाले,

" लग्नाचं देणं घेणं तर आम्ही अगदी व्यवस्थित करूच, पण त्याशिवाय आता आमच्याकडे इतके इतके पैसे, इतर मालमत्ता आहे तीही ह्या तिसऱ्या मुलीची आहे. म्हणजे तुमचीच समजा!

माझ्या अंगावर काटा आला. हे गृहस्थ माझ्या ग्रीन कार्डशी आपल्या मुलीचं लग्न लावू इच्छित होते. हे ग्रीन कार्ड ' श्री ठाणेदार' ह्या इसमाचं होतं. आणखी कोणाचं असतं तरी त्यांना फरक पडला नसता. त्यांची, जावंई विकत घेण्याची तयारी होती. पण माझी विकला जाण्याची अजिबात तयारी नव्हती. नम्रपणे पण स्पष्टपणे माझा नकार कळवून, मी त्यांचा निरोप घेतला.

ह्या निमित्ताने माणसांचे अनेक नमुने भेटले. माझ्या सामान्य ज्ञानात भर पडली. पण लग्न ठरलं नाही. त्यामुळे खूप म्हणजे खूपच निराशा झाली.

उद्या मुंबईहून बेळगावला परत जायचं. आदल्या रात्री ताईशी बोलताना चार दिवसांचा आढावा घेतला. माझ्या आशा-निराशेच्या खेळाबद्दलही मोकळेपणाने बोललो.

सकाळी बेळगावला जाण्यासाठी घराबाहेर पडलो. तेव्हा मला निरोप देत ताई म्हणाली, " श्री, आशा सोडू नकोस. माझं मन मला सांगत आहे, तुझी इच्छा नक्की पूर्ण होणार. "

एका संन्यासिनीने, गृहस्थाश्रमी होऊ इच्छिणाऱ्या एका अधीर तरुणाला दिलेला हा आशीर्वाद! पण यामुळे मनाला थोडी उभारी आली.

व्ही टीला जाणारी गाडी पकडली. डोळ्यासमोर गेल्या चार दिवसातल्या घटना आणि चेहरे नाचत होते. अचानक मला एक गोष्ट आठवली. दादरला कॅडल रोड भागात राहणाऱ्या एका मुलीला आपण भेटलो होतो. डॉ. श्यामल, आपल्याला ती मुलगी चांगली वाटली होती. त्यांच्या बाजूनेही पसंती दिसली. पण परत फोन करून ' होकार' किंवा ' नकार' कळवायचं राहून गेलं. आपल्या बाजूने आणि त्यांच्या बाजूने!

काय करावं? विचार करेपर्यंत गाडी दादरला पोचली होती. आणि निर्णय ठरेपर्यंत प्लाटफॉर्मवरून हलली होती. मी बॅग उचलून दारापर्यंत धावत गेलो आणि चालत्या गाडीतून, प्लॅटफॉर्मवर उडी टाकली. क्षणार्धात घेतलेल्या ह्या निर्णयाने आणि ह्या उडीने माझं पुढचं आयुष्य किती बदलणार आहे, हे त्या क्षणाला कळलं नव्हतं.

दादर स्टेशनवर टॅक्सी केली आणि कॅडल रोडच्या दिशेनं निघालो. ह्या आधी श्यामलच्या घरी एकाच दिवशी, दोनदा गेलो होतो. पहिल्यांदा गेलो तेव्हा कळलं, ' ही

मुलगी म्हणजे श्यामल, घरी नाही, हॉस्पिटलमध्ये तिची ड्यूटी आहे.' मग त्याच दिवशी परत एकदा गेलो. ह्यावेळी श्यामल भेटली. तिच्याशी बरंच बोलणं झालं. घरातल्यांशी ही खूप गप्पा मारल्या.

बायकोबद्दलच्या माझ्या ज्या कल्पना आणि अपेक्षा होत्या. तशीच ही मुलगी मला वाटली. हुशार, कष्टाळू, स्वतःच्या पायावर उभी असलेली, एक सुसंस्कृत मुलगी. बोलायला थोडीशी संकोची, पण तिचे विचार मला आवडले. तिच्या व्यक्तिमत्वानं आणि कर्तबगारीनं मी प्रभावित झालो.

माझी पसंती मी तिथल्या तिथेच सांगितली होती, श्यामललाही मी पसंत आहे, असं दिसलं. मग मी तिच्या आई वडिलांना म्हणालो,

"आता तुम्ही आणि श्यामल, बेळगावला या, म्हणजे माझ्या आई वडिलांची भेट होईल. आपल्याला पुढची बोलणी करता येतील. मी मुंबईत अजून दोन दिवस आहे. त्याआधी तुम्ही फोन करून, बेळगावला केव्हा येत आहात, ते सांगितलंत तर बरं होईल. "

एवढं सगळं झाल्यावर त्यांचा फोन आला नव्हता आणि बाकीच्या मुलीना भेटण्याच्या धावपळीत मी हे विसरून गेलो होतो.

बर झालं! मला शेवटच्या क्षणी का होईना, आठवण झाली, कुठलीही गोष्ट अर्धवट न सोडण्याचा माझा स्वभाव. मुंबईत पाहिलेल्या बाकी सर्व मुलींबाबत निर्णय झाला होता. आता ही एक शेवटची मुलगी. तीही पसंत पडलेली. तेव्हा तिच्याशी बोलून ' हो' किंवा 'नाही' असं निःसंदिग्ध उत्तर मिळवू आणि मगच बेळगावला जाऊ, असं मी ठरवलं.

टॅक्सी रस्त्यावर उभी करून मी परत एकदा श्यामलच्या घराची बेल वाजवली.

श्यामलच्या आईनं दार उघडलं.

" तुम्ही का? "

मी विचारलं, "बाबा नाही आहेत? "

त्या म्हणाल्या, " जेवतायत. या, आत या. "

मी बाहेरच्या खोलीत वाट पाहत थांबलो.

श्यामलचे बाबा जेवून हात पुसत बाहेर आले.

मी म्हणालो, " तुमचा फोन आला नाही म्हणून विचारायला आलो. तुम्हाला इंटरेस्ट आहे का? की नाही? "

ते म्हणाले, "इंटरेस्टचा प्रश्न नाही. पण तुमचं आमचं जमणार नाही. म्हणून फोन केला नाही."

मी म्हटलं, " का हो काय झालं? तुम्हाला काही दोष दिसला का? "

त्यांच म्हणणं, " नाही दोष काहीच नाही, तुमचं स्थळ आम्हाला परवडणार नाही. "

मला आत खूपच आश्चर्य वाटलं. त्यांचा नक्की प्रॉब्लेम काय आहे, ते कळेना. तेच पुढे म्हणाले,

" अमेरिकेच्या मुलांच्या खूप अपेक्षा असतात. आम्हाला एवढा खर्च जमणार नाही. "

मी त्यांचा गैरसमज दूर करण्यासाठी सांगितलं, " अहो, पण माझ्या तर काहीच अपेक्षा नाहीत. खरं सांगायचं, तर माझ्याकडेही पैसे नाहीत, क्रेडीट कार्डवर तिकीट काढून मी आलो आहे. माझ्या दृष्टीने मनाला योग्य वाटेल, अशी बायको मिळणं महत्वाचं आहे. पैसा महत्वाचा नाही." तरी ते म्हणाले, " तुम्ही आम्हाला बेळगावला बोलावता आहात, एकतर श्यामलला सुट्ट्या नसतात. सुट्टी काढून, तिकिटांचा खर्च करून आम्ही बेळगावला येणार, आणि मग तुमचे आई वडील जर ' नाही' म्हणाले, तर वेळ, कष्ट, पैसे सर्वच वाया जाणार. पूर्वी एकदा असं झालं आहे, आणि तुम्हीही तेच केलं. तुम्ही म्हणालात बेळगावला, माझ्या आई वडिलांनी पसंत केल्याशिवाय मी निर्णय घेणार नाही.' आम्हाला आता हा असला प्रकार करायचा नाही. "

मी माझ्याकडून जमेल तेवढं स्पष्ट बोललो. " मला श्यामल पसंत पडली आहे, आणि मी तुम्हाला खात्रीपूर्वक सांगतो, माझी पसंती म्हणजे माझ्या आई वडिलांची पसंती. फक्त

मी एकदा निर्णय घेऊन त्यांना सांगायचं, मी ह्या मुलीशी लग्न करणार आहे, त्यापेक्षा त्यांना मोठेपणा दिला, त्यांचीही संमती घेतली, तर ते योग्य नाही का? आई वडिलांचा एवढा मान तर राखायलाच हवा. "

त्यांना माझं बोलणं पटत होतं. पण माझ्या शब्दांवर कितपत विश्वास ठेवायचा, हे त्यांना कळत नव्हतं.

मी परत एकदा त्यांना हमी दिली, " तुम्ही पैशाचं टेन्शन घेऊ नका आणि माझ्या आई वडिलांच्या नकाराचं तर अजिबात घेऊ नका. तुम्हाला जर माझं स्थळ पसंत असेल, तर तुम्ही बेळगावला या. दोन्ही कुटुंबांची भेट होईल आणि लग्नाचा बेतही एकत्र बसून ठरवता येईल. "

त्यांनी होकार दिला. पण काहीशा गुळमुळीतपणे! त्यांचा निरोप घेऊन मी बाहेर आलो, टॅक्सी थांबलेलीच होती, मी व्ही टीच्या दिशेनं निघालो.

आपलं लग्न ठरलं, मनपसंत जोडीदार मिळाला ह्याचा आनंद होता, पण अजूनही शंभर टक्के खात्री वाटत नव्हती, बेळगावला घरी इन्नी आणि काका माझी उत्सुकतेने वाट पाहत होते. बेळगावात माझ्या लग्नाचं जमलं नव्हतं. पुण्याची मोहीम ही अयशस्वी झाली होती. आता ही मुंबई वारी तरी यशस्वी होणार का?

मी घरात शिरल्या शिरल्या दोघांचा प्रश्न. " काय झालं रे? "

मी म्हणालो, “मला एक मुलगी आवडली आहे. डॉक्टर आहे. एका मोठ्या हॉस्पिटलमध्ये नोकरी करते, तिच्याही बाजूने होकार आहे, पण... "

" आता ' पण ' काय? " इन्नीचा काळजीचा सूर..

" तिच्या घरच्यांना मी सांगितलं, तुम्ही बेळगावला या, माझ्या आई-वडिलांना भेटा. मग आपण निर्णय घेऊ. ' ते त्यांना फारसं आवडलं नाही. त्यांचं म्हणणं, बेळगावला आल्यावर तुमचे आई वडील ' नाही' म्हणाले तर काय करायचं? "

" बरोबर आहे, त्यांचं म्हणणं!"

मी चमकून काकांकडे पाहिलं, हे काका म्हणतायत?

मान डोलावून काका म्हणाले,

" अरे बाबा, मी पाच मुलींची लग्न केली आहेत. मुलीच्या बापाची मनःस्थिती मला चांगली माहित आहे. तुला मुलगी आवडली आहे ना? मग आम्ही डोळे झाकून ' हो' म्हटलं असतं. तू आमच्या पसंतीचं घोडं आडवं कशाला घातलंस? तिथल्या तिथे ' हो म्हणून टाकायचं. "

मी इन्नीकडे पाहिलं, तिनंही काकांच्या म्हणण्याला दुजोरा दिला.

काका कमी बोलणारे, फारसे आग्रही नाहीत. पण आता त्यांनी मला अगदी ढकलल्यासारखं केलं.

" तू आत्ताच्या आता त्यांना फोन कर, म्हणावं, ' माझ्या आई वडिलांचा होकार आहे. तुम्ही बेळगावला लग्नाच्या तयारीनेच या. "

मला काकांचे पाय धरावेसे वाटले.

श्यामलच्या घरची मंडळी बेळगावला आली, ती लग्नासाठीच! मी अमेरिकेत सेंट लुइसला पेट्रोलाईट कंपनीला फोन केला. ' माझं लग्न आहे. तेव्हा मी पंधरा दिवस उशिरा येऊन कामावर रुजू होईन' असं सांगितलं.

कंपनीनं माझी विनंती मान्य केली.

लगीन घाई सुरु झाली. पटकन ठरलेलं लग्न पटकनच उरकायचं होतं. त्यामुळे लग्नाची तयारी, खरेदी, भेटीगाठी, आमंत्रणं, बोलावणी, असा जल्लोष उडाला.

लग्नाआधी एकमेकांची थोडीशी ओळख व्हावी, निवांतपणे गप्पा मारता याव्यात, म्हणून एकदा मी आणि श्यामल फिरायला गेलो. चार मैल दूर असलेल्या हिंगलग्याच्या गणपतीच दर्शन घेतलं. चालत गेलो आणि चालतच परत आलो.

प्रचंड दमायला झालं, भूकही लागली होती म्हणून आम्ही एक रेस्टॉरंटमध्ये गेलो. मी श्यामलला विचारलं, " तुला काय खायचं आहे? "

ती म्हणाली, " मला खायला नको".

मी म्हटलं, " नको? मला तर भयंकर भूक लागली आहे. "

मी काहीतरी मसाला डोसा वगैरे मागवला. मी खात होतो, आम्ही बोलत होतो. मध्ये एकदा दोनदा तिला विचारलं,

" एवढं चालून आलो, तुला भूक लागली नाहीये? तू पण घे ना काहीतरी!"

ती ' नको, नको' च म्हणाली.

मजा म्हणजे लग्न झाल्यानंतर मात्र एकदा ती मला म्हणाली,

" त्या दिवशी तू माझ्यासमोर बसून एकटा खात होतास, मला पण किती भूक लागली होती!"

मी आश्चर्याने थक्क झालो.

" अगं पण, मी तुला विचारलं होतं, तू 'नको' म्हणालीस.

तिनं मान उडवली, ' नको म्हटलं, म्हणजे नकोच असतं असं नाही. तू आग्रह केला असतास, तर मी खाल्लं असतं. "

बायकांची भाषा. पुरुषांना कळत नाही, हे गहन गूढ मला तेव्हा उमगलं. संसार करणं, म्हणजे तारेवरची कसरत हेही त्या क्षणापासून लक्षात आलं.

परत एकदा अमेरिकेला गेलो. नोकरीच्या सेंट लुईस गावात पोचलो. ह्या वेळी मनात मिश्र भावनांचा गोंधळ उडाला होता. नवीन गाव, नवी नोकरी आणि संसार मांडण्याची तयारी. आयुष्याची नवी सुरुवात होते आहे, म्हणून उत्साह होता, उत्सुकता होती, पण त्याच बरोबर ' श्यामल सोबत नाही' ह्याचं दुःख, विरहाची आग, एकटेपणाची बोच होती.

मी ग्रीन कार्ड होल्डर असल्याने माझ्या बायकोला अमेरिकेचा व्हिसा मिळायला एक वर्ष- दीड वर्ष  लागणार, हे ज्ञान नव्यानंच मिळालं होतं. लग्न होवून, जेमतेम पंधरा दिवसांचा आमचा सहवास आणि मग ' ती तिथे अन मी इथे!'

गेल्या गेल्या मी लगेच पेट्रोलाईट कंपनीत कामाला जायला लागलो. सुदैवाने नोकरी मनासारखी होती.  इथलं काम खूप इंटरेस्टीग होतं. पेट्रोलाईट ही ३०० मिलियन डॉलर्सची उलाढाल असलेली एक मोठी कंपनी होती. कंपनीत जवळ जवळ दोन हजार लोक काम करीत होते. त्यामध्ये सुमारे २५० रिसर्च केमिस्ट होते, त्यातला मी एक.

इंडस्ट्रीला लागणारी वेगवेगळी स्पेशालिटी किंवा फ़ॉर्म्युलेशन केमिकल्स बनवणे हे आमचं काम. चुइंगमपासून, पेंट्सपासून पेट्रोलपर्यंत ही केमिकल्स अनेक उत्पादनामध्ये वापरली जायची.

उदाहरणार्थ, घराला रंग देतो, तो रंग पटकन घट्ट होऊ नये, त्याचा प्रवाहीपणा कायम आणि ठराविक राहावा. म्हणून त्यात काही खास केमिकल वापरले जातं.  हे केमिकल पेट्रोलाईट कंपनी बनवायची. किंवा जमिनीतून पेट्रोलचं उत्पादन काढताना, पेट्रोलमधलं पाणी वेगळं करण्याची आवश्यकता असते. हे काम करणारं केमिकल, ह्याच कंपनीत बनायचं.

कंपनीत माझ्यासारख्या चार लोकांचा एक ग्रुप होता. आमचा बॉस होता, माईक नेमन. कंपनीच्या प्रयोगशाळेत सकाळी नऊ ते संध्याकाळी पाच असा मोजून मापून काम करणे, हा माझ्यासाठी एक नवा अनुभव होता.

अमेरिकेत ह्या आधीची पाच वर्षंही मी प्रयोगशाळेतच काम करीत होतो. पण ते विद्यार्थी म्हणून. तेव्हा माझा दिनक्रम फार वेगळा असायचा.

सकाळी मी आरामात उठत असे, अगदी दहा अकरा वाजेपर्यंत ताणून देत असे. त्यानंतर सर्व आटोपून प्रयोगशाळेत प्रवेश करेपर्यंत दुपारचा एक वाजायचा. पण मग मात्र रात्रीचे दोन वाजोत की पहाट होवो, प्रयोगाचा ठरलेला टप्पा पूर्ण केल्याशिवाय मी घरी जात नसे. इथे सेंट लुईसला प्रयोगशाळेतलं काम, ही नोकरी असल्याने, माझ्या एकूणच वागण्याला शिस्त आली, त्यात संसारी गृहस्थ ही नव्याने मिळालेली पदवी. माझा सर्व नूरच बदलून गेला. कपड्यांपासून वागण्या वावरण्यापर्यंत, माझ्यात आमुलाग्र फरक झाला. केवळ चार अक्षता डोक्यावर पडल्याने माणूस एवढा बदलतो? मला खरंच वाटत नव्हतं.

कामाला लागल्यापासून एक महिन्याच्या आत मी घर घेतलं. आमचं पहिलं घर हे एक भाड्याचं छोटं अपार्टमेंट होतं. एक बेडरूम, लिव्हिंग रूम आणि किचन, पण ह्या अपार्टमेंट बिल्डींगमध्ये स्विमिंग पूल होता. लॉंड्री होती.

घर घेताना, ते सजवताना, लावताना सतत डोक्यात श्यामलचा विचार असायचा. तिला ही गोष्ट आवडेल का? तिला तमुक गोष्टीची गरज भासेल का?

विचार तिचे पण सोबत एकट्याचीच! ही उणीव असह्य झाली की पत्र लिहायचं. पत्र पोचायला पंधरा वीस दिवस लागायचे. तेवढ्यात पुढची एकदोन पत्र पोस्टात पडलेली असायची. पत्र पुढे मागे पोचली तर गोंधळ नको, म्हणून मी पत्रावर नंबर घालायला लागलो. म्हणजे, ' पत्र बारावे' ' पत्र तेरावे' वगैरे वगैरे.

पुढे एक वर्षानंतर श्यामल जेव्हा अमेरिकेला आली, तेव्हा एक वर्षात लिहिलेल्या, माझ्या सत्तर पत्रांचा गठ्ठा तिनं बरोबर आणला होता.

पत्र लिहिण्याचा श्यामलचा वेग माझ्या एवढा नव्हता. माझ्या तीनचार पत्रांनंतर तिचं एक पत्र यायचं. पण माझ्यासाठी ती लाईफ लाईन असायची.

पेट्रोलाईट कंपनीत कामाला लागून काही महिने झाले होते. गेली दोन वर्ष कंपनीच्या प्रयोगशाळेत एक विशिष्ट प्रयोग होत होता. पण तो गिऱ्हाइकाच्या पसंतीला उतरत नव्हता, यशस्वी होत नव्हता. मी नोकरीला लागल्यानंतर माझ्याकडेही हेच काम सोपविण्यात आलं.

काम असं होतं, की एका प्रसिद्ध गालिच्यांच्या कंपनीला, एक विशिष्ट पद्धतीचं ॲडहेसीव्ह (चिकट द्रव्य) तयार करून हवं होतं. गालीचा जमिनीवर ठेवून चिकटवल्यानंतर तो दहा मिनिटात जमिनीला चिकटला पाहिजे. अशी ह्या कंपनीची मागणी होती.

मी ह्या बाबतीत ही आत्तापर्यंतची फ़ॉर्म्युलेशन पाहिली आणि माझ्या पध्दतीप्रमाणे प्रयोग सुरु केले. नवीन  मॉलेक्यूल्स (परमाणु ) बनवणं ही माझी स्पेशालिटी होती, त्याचा वापर केला आणि वेगवेगळे घटक मिसळत किंवा कमी करत प्रयोग करीत राहिलो.

आमचे प्रयोग यशस्वी होत आहेत किंवा नाहीत, ह्याची वेळो वेळी चाचणी होत असे. हा प्रयोग करायला लागून काही महिने झाले.

एक दिवस अचानक, आमच्या कंपनीचे चेअरमन मिस्टर नासर आमच्या प्रयोगशाळेत आले. त्यावेळी मी माझ्या कामात गुंग होतो. एक ढगाळ लॅब कोट आणि डोळयावर गॉगल्स अशा वेशभूषेत मी प्रयोग करीत होतो. आजूबाजूला नेहमीसारखाच सर्व पसारा, इकडे तिकडे न पाहता किंवा माझा ग्रुप लीडर माईक नेमन ह्याच्याशी न बोलता ते घाईघाईने माझ्या केबिनमध्ये शिरले. आणि म्हणाले, " हाय  श्री, कॉंग्रॅच्युलेशन्स!"

मी उडालोच, कंपनीचा टॉप बॉस माझ्यासारख्या एका साध्या केमिस्टशी स्वतः बोलायला येतो? केबिनमधलं एक जुनाट स्टूल पुढे ओढून, मिस्टर नासर, त्या स्टूलवर बसले.

मी घाबरलो, त्यांची उंची, महागड्या चकचकीत सूटवर कुठे डाग पडेल, अशी मला भीती. पण आजूबाजूच्या गबाळग्रंथीपणाचं त्यांना सोयरसुतक नव्हतं, ते एकदम टॉप मूडमध्ये होते.

ते भराभरा बोलायला लागले, " गालीचांच्या कंपनीवाला आपला कस्टमर, एकदम खूष झाला आहे. तू बनविलेलं, ॲडहेसिव्ह  त्यांना पसंत पडलं आहे. कॅन यु इमॅजीन? गेली दोन वर्ष आपण झगडतो आहोत. दोन वर्षात आपल्या अनेक केमिस्टनी प्रयत्न केले. ह्या

कस्टमरचं समाधान होत नव्हतं. पण आज तू तयार केलेलं ॲडहेसिव्ह 'ओके ' आहे, असं सांगितलं. इतकंच नाही तर आपल्याला खूप मोठी ऑर्डरही दिली आहे. 'कॉंग्रॅच्युलेशन्स ॲन्ड कीप इट अप!"

मी कसाबसा " थॅंक यु" म्हणालो. तोपर्यंत मिस्टर नासर निघून गेलेसुद्धा! मला अतिशय आनंद झाला.

आपण चांगलं काम करतो आहोतं, याबद्दल शाबासकी मिळणं खूप महत्वाचं असतं. घरी जाऊन केव्हा एकदा पत्र लिहून श्यामलला ही बातमी कळवितो असं मला होऊन गेलं.

कंपनीचे चेअरमन मिस्टर नासर मला भेटायला आले, त्यामुळे आमच्या प्रयोगशाळेतल्या इतरांना चांगलाच धक्का बसला. विशेषतः माझा बॉस माईक नेमन ह्याला ही गोष्ट फारच लागली. त्याचं दुर्दैव म्हणजे ह्या घटनेला चार दिवस झाले नाहीत, तर मिस्टर नासर परत एकदा आमच्या प्रयोगशाळेत माझ्या केबिनमध्ये आले, परत एकदा तेच ते छोटं स्टूल ओढून त्यावर बसले आणि भराभरा बोलायला लागले.

" श्री, तुला महितच असेल, की ओक्लाहामातल्या टलसा ह्या शहरात, आपल्या कंपनीची एक शाखा आहे. तिथे देशातल्या सर्व मॅनेजर्सची एक मिटिंग असते. दर तीन महिन्यांनी एकदा. पुढच्या आठवड्यात ही मिटिंग आहे. तेव्हा तू माझ्या बरोबर ये आणि तू बनविलेल्या ॲडहेसिव्हचं प्रेझेन्टेशन कर. "

परत एकदा मी आश्चर्यचकित! मिस्टर नासर ह्यांचे मी आभार मानले आणि मग मात्र, ' हा एक दुर्लभ असा बहुमान मिळाला' म्हणून मनातल्या मनात चार उड्या मारल्या.

पुढचा आठवडा सुरु व्हायला, नेहमीपेक्षा फारच जास्त वेळ लागतो आहे, असं मला वाटत होतं. शेवटी एकदाचा तो आठवडा सुरु झाला, आणि मिटिंगचा दिवसही उजाडला.

आमच्या कंपनीच्या जेट विमानातून मिस्टर नासर, मी आणि आणखी चारपाच जण टलसाला गेलो. दिवसभर वेगवेगळया लोकांची भाषणं झाली. काही महत्वाच्या चर्चा झाल्या आणि मी माझ्या प्रयोगाचं प्रेझेन्टेशन केलं.

जसे गेलो. तसेच त्याच विमानातून परत आलो. पण नंतरही कितीतरी वेळ मी हवेत उडत असल्यासारखा वावरत होतो.

ह्यानंतर कंपनीतलं सर्व चित्र माझ्यापुरतं तरी पार बदलून गेलं. चेअरमन नासर ह्याच्या हाताखाली व्हाईस प्रेसिडेंट, जनरल मॅनेजर, ग्रुप लीडर आणि केमिस्ट अशी उतरंड होती, मी ह्या उतरंडीतल्या सर्वात शेवटच्या पायरीवरचा माणूस. पण का कोण जाणे. मिस्टर नासर माझ्या कामात तर रस घ्यायचेच, पण माझ्याशी खूप आपलेपणानी बोलायचे. वय, अनुभव, हुद्दा ह्या सर्वच बाबतीत असमान असूनही आमची छान मैत्री झाली.

टलसाला दर तीन महिन्यांनी होणाऱ्या मिटिंगला ते मला बरोबर घेऊन जायला लागले. मला ही मिटिंग म्हणजे पिकनिकच वाटायची. एकतर कधी नव्हे ते केमीस्टच्या गबाळया पोशाखाऐवजी सूट घालायची संधी. मग नासरांच्या शेजारी बसून ऐटीत कंपनीच्या जेट विमानांनी प्रवास. मिटिंगला भाषणं असायची. तशीच खाण्यापिण्याचीही रेलचेल असायची. संध्याकाळी घरी परत यायचं.

कंपनीतल्या कामाचा वेळ छान गेला, तरी घरी आल्यावर घर खायला उठायचं. एकट्याचा संसार अगदी असह्य झाला तेव्हा मी कंपनीकडे पंधरा दिवसांची रजा मागितली. आधी रजा मिळत नव्हती. पण मी गयावया केल्यावर रजा मंजूर झाली. आणि परत एकदा क्रेडीट कार्डवर तिकीट काढून इंडियात आलो.

विरहाने तळमळणारा तुलसीदास, साप ही दोरी समजून, ही दोरी धरून बायकोला भेटायला गेला, त्यापेक्षा माझी मनःस्थिती वेगळी नव्हती.

परत एकदा पंधरा दिवसांची नवराबायकोची भेट आणि मग परत ताटातूट! ह्या भेटीमुळे माझ्या एकटेपणाच्या दुःखावर थोडी फुंकर मारली जाईल, असं वाटलं होतं. तर झालं उलटंच!

परत आल्यानंतर एकटेपणा अधिकच वाढला, त्यावर उतारा म्हणून परत एकदा मी स्वतःला कामात बुडवून टाकलं.

माझा बॉस माईक नेमन हा माझ्या दुप्पट वयाचा. आता रिटायर्ड व्हायला आलेला. कंपनीतला जुना माणूस. धर्माने ज्यू  अन त्यातही अत्यंत कट्टर वृत्तीने नेमधर्म नियम पाळणारा. ठराविक दिवशी बाहेर काही खायचं नाही. सूर्यास्तानंतर गाडीत बसायचं नाही. अशा बऱ्याच गोष्टी तो अगदी काटेकोरपणे करायचा.

ओक्लाहामामध्ये टलसा इथल्या मिटींगला कधी कधी त्याचीही वर्णी लागायची. मला एक दिवस आठवतो. मिटिंग खूप लांबली. त्या दिवशी त्याला बाहेरच काही खायचं नव्हतं. म्हणून तो उपाशी होता. परत आलो आणि एअरपोर्ट वरून माझ्या गाडीतून घरी जायला निघालो. माईकचं लक्ष सूर्याकडे. सूर्य बुडणार त्या क्षणी तो म्हणाला, " श्री, गाडी थांबव. "

मला काही कळलं नाही, पण त्याच्या म्हणण्याप्रमाणे मी गाडी थांबवली, खाली उतरून त्याने माझा निरोप घेतला.

" ओक बाय  श्री! थॅन्क्स फॉर द राईड. पण आता सुर्य डुबला. आता मी गाडीत बसू शकत नाही. यु डोंट वरी, तू जा. मी हळू हळू चालत घरी जाईन. "

दिवसभर उपाशी असलेला साठीच्या जवळचा तो म्हातारा, रस्त्याच्या बाजूच्या मातीतून चालायला लागला. अंगावर दिवसभर घातलेला सूट. तोही चालण्यासाठी आरामदायी नाहीच आणि अशा परिस्थितीत त्याला किमान दोनतीन मैल जायचं होतं. मला त्याची दया आली, पण इलाज नव्हता. तो त्याच्या मानसिकतेचा गुलाम होतं. आणि म्हणूनच तो जे कष्ट करीत होतं त्यात त्याला आनंदच होता.

माईक नेमनने  त्याचा धर्म त्याने त्याच्या मर्जीप्रमाणे पाळावा. माझं काही म्हणणं नव्हतं. पण बॉस म्हणून तो माझ्यावर दादागिरी करायला लागला, ती सहन करणं मला शक्य नव्हतं.

तो मला सांगायला लागला, " प्रयोगशाळेत तू काही सिद्ध केलंस, काही नवीन शोध लावलास तर तो तू मला आधी सांग. कंपनीला ती माहिती मी देईन. "

त्याच्या म्हणण्याचा अर्थ मला कळला. प्रयोगशाळेत माझं काम यशस्वी झालं, तर ते क्रेडीट त्याला स्वतःला घ्यायचं होतं. मी त्याचं म्हणणं आधीही ऐकत नव्हतो आणि आताही ऐकलं नाही.

माझ्या शोधाबद्दलची माहिती मी स्वतः कंपनीच्या वरिष्ठांना द्यायचा. त्यामुळे माईक नेमनची खात्री पटली की, " हा मुलगा जरा जादाच आहे!"

माईक नेमनच्या जोडीला, जॉन वूड्स हा आमच्या मॅन्युफॅक्चरिंग युनिटचा मॅनेजरही आता माझ्या खनपटीला बसला. हाही माझा बॉस. ह्याचीही तीच मागणी. "तुझ्या शोधासंबंधी तू आधी माझ्याशी बोललं पाहिजेस. जर तू मला महत्व दिलं नाहीस, तर तुझा रिसर्च वापरून केलेलं प्रॉडक्ट, मी मॅन्युफॅक्चरिंगसाठी घेणार नाही. मी ते दाबून ठेवेन."

कुठूनही मी वर येऊ नये, म्हणून माझे हे दोन्ही बॉस माझ्यावर दबाव आणत होते. माझी घुसमट व्हायला लागली.

सुदैवानं त्याच सुमारास श्यामलला व्हिसा मिळाला. तिची येण्याची तारीख ठरली आणि कंपनीतलं राजकारण काही काळ विसरून मी राणीसाहेबांचं स्वागत करायच्या तयारीला लागलो.

लग्न होऊनही ब्रह्मचाऱ्याची मठी असणाऱ्या माझ्या घरात श्यामल आली असती, की सगळं चित्र पालटलं असतं. मी उत्साहाने कामाला लागलो. आणि हे चित्र आधीच पालटण्यासाठी कंबर कसली.

ती येणार म्हणून खास इंडियन स्टोअरमध्ये जाऊन ग्रोसरी खरेदी केली. आपल्या पद्धतीच्या भाज्या, चण्याचं पीठ, मसाले, डाळी, कणिक आणि काय काय! दोनचार पेंटिंग विकत घेतली. ती प्रत्येक खोलीत लावली. फ़्लॉवर पॉट आणले. त्यात कृत्रिम फुलांचे गुच्छ रचून ठेवले. पलंगावर सॅटिनचा मऊ पलंगपोस आला आणि जोडीला नवीन मऊ मऊ असा कम्फर्टर! घर अगदी प्रसन्न दिसायला लागलं.

श्यामलला  घ्यायला मी न्यूयॉर्कला जाणार होतो. तिकडे जायच्या आदल्या दिवशी मी पोळीभाजी पुलाव असा सगळा साग्रसंगीत स्वयंपाक केला आणि फ्रीजमध्ये ठेवून दिला.

केनडी इंटरनॅशनल  एअरपोर्टवर मी श्यामलचं स्वागत केलं. तिला सेंट लुइसला घरी घेऊन आलो. मी खपून जी सारी तयारी केली होती, त्याचं ती कौतुक करेल, म्हणून मी तिच्याकडे आशेने पाहिलं. पण तिचं कुठे लक्ष नव्हतं. ती दमलेली, थकलेली होती. फारसं न बोलता, इकडे तिकडे न पाहता ती झोपायला गेली.

इकडे वूड्स आणि नेमन, मला आपल्या कब्जात घेण्याचा प्रयत्न करीत असले. तरी मी यांना फारशी दाद देत नव्हतो. आता कंपनीत मला प्रमोशन मिळालं होतं. माझ्या हाताखाली दोन केमिस्ट काम करीत होते.

एक दिवस मिस्टर नासर परत एकदा तरातरा आमच्या प्रयोगशाळेत आले, नेहमीप्रमाणे सिनिअर मॅनेजरकडे लक्ष न देता, माझ्या केबिनमध्ये शिरले, ते खूप काळजीत आहेत, असं दिसत होतं. मला म्हणाले,

" श्री, आपल्या एका रिॲक्टरमध्ये प्रॉब्लेम झाला आहे. त्यात चाललेल्या एका रिॲक्शनच्या वेळी काही हाय मॉलेक्युल्स तयार झाले आणि त्यामुळे रिॲक्टरच्या काही पाइप लाईन्स बंद झाल्या आहेत. मोठा प्रॉब्लेम आहे. तू काही करू शकशील का? "

नासर माझ्यावर विश्वासाने एवढी मोठी जबाबदारी सोपवताहेत, हे पाहून खूप बरं वाटलं. पण त्याचवेळी टेन्शनही आलं. अशक्य अशी गोष्ट प्रत्येक वेळीच शक्य होते, असं नाही. तरीही मी मनापासून म्हणालो, " मी सॅम्पल घेतो आणि प्रयत्न करतो. "

श्यामल आली आणि घराला घरपण आलं. काहीही म्हणा, घरात गृहिणीचा वावर असला आणि घरावरून गृहिणीचा हात फिरला की घर क्षणार्धात हसायला लागतं. अशा घरात पाऊल टाकलं, की कामावरच टेन्शन विसरायला होतं. 'इथल्या वातावरणाची श्यामलला सवय झाली की तिच्या करियरसंबंधी जरा नीट बसून बोलू, ' असं मी ठरवलं.

एक दिवस नेहमीसारखा मी कामावर गेलो. आज माझ्या देखरेखीखाली पायलट प्लांटमध्ये अत्यंत कठीण प्रयोग पार पडणार होता. पायलट प्लांट म्हणजे मॅन्युफ़ॅक्चरिंग युनिटमध्ये उत्पादन सुरु होण्याआधीची रंगीत तालीम. मॅन्युफ़ॅक्चरिंग युनिटसारखाच इथेही

एक रिॲक्टर असतो, पण तुलनेनी लहान. ह्या रिॲक्टरमध्ये छोट्या प्रमाणात उत्पादन बनवायचं आणि मग त्या बाबतीती शंभर टक्के खात्री पटली की मगच ते उत्पादन मोठ्या प्रमाणात बनवायला लागायचं.

आज पायलट प्लांटमध्ये आम्ही हायड्रोजन ब्रोमाइड हा विषारी वायू वापरून, एक नवीन प्रकारचं ॲडहेसिव्ह बनविणार होते. हायड्रोजन ब्रोमाइड वापरण्याआधी एक खास खबरदारी घ्यावी लागते. ती म्हणजे रिॲक्टरचे धातूचे सर्व पाइप्स बदलून तिथे काचेचे पाइप्स बसवावे लागतात. प्रयोगाआधी कंपनीच्या इंजिनिअर्सनी धातूचे पाइप्स काढून तिथे काचेचे पाइप्स बसवले. बाकी सर्व गोष्टी नीट तपासल्या. रिॲक्टरमध्ये मिश्रणाचे सर्व घटक घालून त्यात हायड्रोजन ब्रोमाइड वायू सोडून १२० ते १४० डिग्री सेंटी ग्रेड तापमानाला, रिॲक्शन सुरु झाली.

पायलट प्लांट मधला रिॲक्टर तुलनेने छोटा, तरीही ८ फुट उंच, ६ फुट रुंद. अशा मापाचा असतो.

तो एखाद्या प्रेशर कुकरसारखा दिसतो.

सुरक्षित अंतरावर उभे राहून आम्ही उत्सुकतेने हा प्रयोग पाहत होतो. आणि अचानक..... रिॲक्टरच्या एका भागातून उकळता द्राव बाहेर यायला लागला. पाठोपाठ हायड्रोजन ब्रोमाइडचा विषारी धूरही वातावरणात पसरला.

रिॲक्टर कुठूनतरी गळतो आहे. हे लक्षात आलं. अशावेळी ताबडतोब करायचा उपाय म्हणजे रिॲक्टरची मुख्य झडप बंद करून रिॲक्शन थांबवणे.

मी जोरात ओरडलो, " पळा! पळा! जीव वाचवा! माणसं घाबरून प्रयोगशाळेच्या दरवाज्याकडे धावली. मी मात्र रिॲक्टरच्या दिशेने धावत गेलो. विषारी धुराचा भपकारा सहन करीत रिॲक्टरची मुख्य झडप मी बंद केली.

काही मिनिटांचा प्रश्न होता. त्यात माझं तर बरं वाईट झालंच असतं. पण बाकीही काय अनर्थ झाला असता कोणाला ठाऊक? विषारी वायू पसरून प्राणहानी झाली असती किंवा कदाचित मोठा स्फोटही झाला असता. सुदैवाने संकट टळलं. जीवावरचं शेपटावर निभावलं.

शेपटावर अशासाठी की तेव्हापासून मला कसलाही वास येत नाही. वास घेण्याची माझी शक्ती आणि मेंदूतलं वास पारखण्याचं केंद्र कायमचं निकामी झालं आहे.

नंतर या सर्व प्रकरणाची चौकशी झाली, तपासणी केली गेली तेव्हा कळलं की रिॲक्टरमध्ये धातूचा एक पाइप बदलायचा राहून गेला होता. तो फुटला आणि गळती सुरु झाली. ही चूक खरं तर इंजिनिअर्सची होती. पण ती वेळ चूक सुधारण्याची होती. चूक कोणाची आहे, हे शोधण्याची नव्हती. क्षणाचाही विचार न घेता मी कृती केली, ह्यामुळे माझं मलाच खूप बरं वाटलं.

मला वाईट एका गोष्टीच वाटलं. की माझा एक चांगला शोध ह्या सर्व प्रकारात वाया गेला. पुढे परत हा प्रयोग झाला नाही आणि माझा शोध कुठेही वापरला गेला नाही.

श्यामल आता इथे छान रुळली होती, घर संसार, खरेदी सर्व चांगल्या पद्धतीने मॅनेज करत होती. एकदा माझ्या लक्षात आलं, की गेले कित्येक दिवस ती सतत लायब्ररीत जाते आणि घरीही कसली कसली लठ्ठ अशी अभ्यासाची पुस्तक वाचत असते. शेवटी मी तिला विचारलं, " तू कसला अभ्यास करते आहेस? "

तर ती म्हणाली, " मी विचार करते आहे, इसीएफएमजीची परीक्षा द्यावी. "

मी म्हटलं, " म्हणजे काय? "

तेव्हा तिनं मला सांगितलं, " मी जरी मुंबईची एमबीबीएस ही डॉक्टरची डिग्री मिळवली असली, तरी इथे प्रॅक्टिस करायची असेल, तर इथली एक प्रवेश परीक्षा द्यावी लागते. ह्या परिक्षेच नाव इसीएफएमजी. खूप अवघड असते म्हणे ती. ह्या परीक्षेत पास झाल्यावर तुम्हाला हॉस्पिटलमध्ये रेसिडेन्सी करता येते. आणि त्यानंतर तुम्ही डॉक्टर म्हणून काम करू शकता. "

मी ह्या प्रवेशपरीक्षेबद्दल जरा खोदून विचारलं, तेव्हा श्यामल म्हणाली.

" ह्या परिक्षेचा अभ्यासक्रम करून घेण्यासाठी क्लास आहे. पण त्याची फी खूप आहे. अठराशे डॉलर्स. म्हणून मग मी ठरवलं... “

संकोच हा श्यामलचा एक स्थायीभाव आहे, हे तोपर्यंत माझ्या लक्षात आलं होतं. आणि स्वाभिमान हा तिच्या व्यक्तिमत्वाचा एक प्रमुख रंग!

" नवऱ्याकडे एवढे पैसे कसे मागायचे?” अशा विचारांनी तिनं मला काही सांगितलं नव्हतं आणि विचारलंही नव्हतं.

मी तिला म्हणालो, " हे बघ श्यामल हा तुझ्या करियरचा, तुझ्या आयुष्याचा प्रश्न आहे. त्यासाठी पैसे खर्च झाले तरी चालतील. पण जी सोय उपलब्ध आहे तिचा फायदा तू घ्यायला हवा.” तिच्या स्वभावानुसार ती किंचितसं हसली आणि मान डोलवून तिनं माझ्या म्हणण्याला होकार दिला.

भारतातून काही खास स्वप्नं पाहत इथे आलेल्या तरुण जोडप्यांप्रमाणे आमचंही वेळापत्रक आता अगदी भरगच्च झालं. सकाळी दोघांनीही लवकर घराबाहेर पडायचं. मी श्यामलला तिच्या क्लासमध्ये सोडायचं. तिथून तिनं नंतर लायब्ररीत जायचं आणि अभ्यास करीत बसायचं. संध्याकाळी कामावरून घरी जाताना मी तिला पिकअप करायचा वगैरे वगैरे!

एकमेकांच्या साथ संगतीने आणि एकमेकांच्या आधाराने आमचं सहजीवन सुरु झालं. श्यामलचं ध्येय आणि तिथे जाणारी वाट निश्चित झाली होती.

माझ्या मनात मात्र उलट सुलट विचार चालू होते. जे आहे त्यात मी समाधानी नव्हतो. मला नक्की काय हवं आहे ते त्या क्षणी मला माहित नव्हतं. मला एवढंच माहित होतं की केवळ केमिस्ट म्हणून नोकरी करण्यापेक्षा, मला काहीतरी आगळं वेगळं आव्हान स्वीकारायला आवडेल. माझी खात्री होती की मी त्यात नक्की यशस्वी होईन.

नासरनी मला रिॲक्टरचा प्रॉब्लेम सोडवायला सांगितलं होतं. तेव्हापासून दोन वर्ष सतत मी ह्या प्रॉब्लेमचा पाठपुरावा केला होता. कशाचाही उपयोग होतं नव्हता. रिॲक्टरमध्ये चालू असलेली रिॲक्शन कधी पूर्ण व्हायची, कधी नाही. कधी त्यात बनविलेलं उत्पादन पूर्णपणे फुकट जायचं, माझे प्रयोग चालूच होते आणि शेवटी मला शोध लागला, की मी जर टेट्रा हायड्रोफ़्युरेन' नावच सॉल्व्हन्ट (द्रावक- द्रव पदार्थ, ज्यात दुसरा

काही पदार्थ विरघळतो. ) वापरलं, तर रिॲक्टर उत्तम रीतीने काम करतो. हे सॉल्व्हन्ट वापरल्यानंतर रिॲक्टरची जाळी आणि पाइप्स गाळाने तुंबत नाहीत.

माझ्या शोधामुळे रिॲक्टर परत उत्तम काम करायला लागला आणि कंपनीचा खूप फायदा झाला. मला आणखी एक प्रमोशन मिळालं. मी ग्रुप लीडर झालो.

पण ह्या छोट्या मोठ्या विजयाने किंवा बढतीने मला आता फारसा आनंद होत नव्हता. मला कळून चुकल होतं की मी कितीही उत्तम काम केलं तरी माझी मेहनत ही ढोर मेहनतच ठरणार. कदाचित माझ्या पाठीवर कौतुकाची एक थाप पडेल, कदाचित माझा पगार वाढेल आणि प्रमोशनही मिळेल. पण निर्णय घेण्याचं स्वातंत्र्य मला कधीच नसणार. माझ्या हातात सत्ता कधीच येणार नाही.

अमेरिकेतल्या उद्योग जगतातला एक अलिखित नियम माझ्या लक्षात आला होता. इथला भारतीय माणूस शिक्षित असतो. तो तंत्रज्ञ बनतो, शास्त्रज्ञ म्हणून वाहवा मिळवतो, पण कुठल्याही ऑर्गनायझेशन मधला टॉप बॉस क्वचित बनतो. ती जागा गोऱ्या अमेरिकन लोकांची!

शेवटी एक दिवस मी निर्णय घेतला. 'बस झाला रिसर्च! आता आपण मॅनेजर व्हायचं. आपल्या हातात कंपनीची सूत्रं असायला हवीत. आपण निर्णय घ्यायचे, आपण 'पॉलीसी मेकर ' ही पदवी मिळवायची.

निर्णय घेणं सोपं असतं. तो अंमलात आणणं कठीण! पण वर जायचं असेल तर कठीण मार्गाला पर्याय नसतो. मॅनेजर होण्यासाठी एम. बी. ए, करणं हा एकच मार्ग मला दिसला.

मी एम बी एला प्रवेश घेतला. आणि वयाची तिशी उलटलेली असताना परत एकदा विद्यार्थी दशेत प्रवेश केला. एका नव्या जिद्दीने, एका नव्या उमेदीने!

' आपण आई बाबा होणार! ह्या श्यामलन दिलेल्या गोड बातमी नंतर, ' बाबा' ह्या नव्या भुमिकेबद्दल खूप उत्सुकता वाटायला लागली. त्याचबरोबर आपली जबाबदारी वाढणार ह्याची जाणीव झाली. तशी मी मनाची तयारी केली.

बाळाच्या आगमनाची चाहूल लागलेली असतानाच श्यामलला एम. डी. करण्यासाठी निमंत्रण आलं. तेही एक नव्हे तर चांगलं सहा सात ठिकाणहून ऑफर्स आल्या.

आता ही गोष्ट किती आनंदाची, अभिमानाची! पण श्यामल आनंदापेक्षा काळजीने चूर झाली. " आता मला दिवस रात्र काम करावं लागणार. मधेच बाळाचा जन्म ! बाळाकडे मी लक्ष तरी केव्हा आणि कसं देणार?

मी तिला धीर दिला,

" बाळाकडे मी जास्तीत जास्त लक्ष देईन, तू निर्धास्त राहा. "

मग इकडच्या पद्धतीप्रमाणे बाळाच्या आगमनाची पूर्व तयारी. आम्ही दोघांनी लॅमाझ नावाच्या एका चांगल्या क्लासमध्ये नाव घातलं. ' बायको गर्भार असताना नवऱ्यानं तिची कशी काळजी घ्यावी?' इथपासून 'बाळाचं आगमन सुकर व्हावं, म्हणून आईने करण्याचे श्वसनाचे व्यायाम!' अशी आमची शारीरिक व मानसिक संपूर्ण तयारी इथे केली गेली.

सातव्या महिन्यात आम्ही टेस्टला गेलो, तर डॉक्टरनी श्यामलला बेड रेस्ट घेण्याचा सल्ला दिला. स्वतः डॉक्टर असलेले पेशंटच डॉक्टरांचा सल्ला धुडकावून लावतात. श्यामलही ह्याला अपवाद नव्हती.

ती ह्या प्रसूती तज्ञ डॉक्टरला सांगायला लागली.

' छे छे! मला बेड रेस्ट घेणं जमणार नाही. आमच्या हॉस्पिटलमध्ये आधीच स्टाफ खूप कमी आहे, मी जर नाही गेले तर त्यांची फार गैरसोय होईल. '

डॉक्टर तिला म्हणाले.

" बाळाची पूर्ण वाढ व्हायला अजून दोन महिने अवकाश आहे ह्या काळात तू बेड रेस्ट घेण्याची आवश्यकता आहे. नाही तर तू केव्हाही बाळंतीण होशील आणि मग अपुऱ्या दिवसाच्या बाळाची सर्व बरी वाईट जबाबदारी तुला स्वीकारावी लागेलं. "

आम्ही दोघं घरी आलो, तरीही श्यामलने आपला मुद्दा सोडला नव्हता. तिचा आपला एकच हेका, ' मी सध्या इमर्जन्सी विभागात काम करते आहे, हा एक महिना तरी मला कामावर जायलाच हवं. "

मी म्हणालो, ' तू हॉस्पिटलमध्ये कामाला गेल्यामुळे, आपल्या बाळाला किवा तुला काही धोका पोचला, तर चालेल का तुला? ते काही नाही, तू तुझ्या विभागाच्या डीनना फोन करून तुझी परिस्थिती सांग आणि सुट्टी माग"

मी 'माग' हा शब्द उच्चारला आणि श्यामलचा प्रॉब्लेम माझ्या लक्षात आला, एकतर कामाच्या बाबतीत विलक्षण सिन्सिअर! आणि त्यातून कोणाकडे काही मागणे, म्हणजे तिला अगदी धर्मसंकट वाटायचं. पण ह्या वेळी माझ्या निक्षून बोलण्याचा उपयोग झाला, श्यामलने सुट्टी मागितली, आणि बेड रेस्ट घेण्यासाठी ती घरी राहिली.

शेवटी एकदाचे प्रेग्नन्सीचे बत्तीस आठवडे संपले. आता बाळ जन्मलं तरी धोका नव्हता. परत एकदा आमचं नॉर्मल आयुष्य सुरु झालं. बाळाच्या आगमनाआधीच बहुतेक तयारी झाली होती, एक दिवस मी बाजारातून एक मोठा  पाळणा घेऊन आलो. हा पाळणा ' सेल्फ हेल्प' प्रकारचा होता. म्हणजे सुटे पन्नास भाग जोडून, हा पाळणा तयार करायचा होता. सर्व साधारण अमेरिकन माणूस, असली कामं सहजगत्या करतो. पण ह्या बाबतीतलं कौशल्य नसल्यामुळे  एक पाळणा जोडण्यात, माझा एक संपूर्ण विकएंड  खलास झाला.

बाळाच्या जन्माआधीचे शेवटचे असे काही केअर फ्री दिवस, म्हणून मी आणि श्यामल एके दिवस बोटिंग करायला गेलो. ही एक प्लास्टिकची बोट मी वीस डॉलर्स ना घेतली होती. पंपाने हवा भरून ती तलावात सोडायची आणि वल्हि मारून वल्हवत आरामात पाण्यात फिरायचं.

आमचा दोघांचा हा एक आवडीचा छंद होता. त्या दिवशी आम्ही मस्त पैकी मनसोक्त बोटिंग केलं, आणि घरी आलो. घरी आल्या आल्याच श्यामल म्हणाली. " श्री, हॉस्पिटलला  फोन कर. मला कळा यायला लागल्या आहेत. "

तसं काही टेन्शन नव्हतं. श्यामलची बॅग भरून तयार होती. डॉक्टरना फोन करून, आम्ही घराबाहेर पडलो. हॉस्पिटल वीस मैल लांब होतं. मी गाडी जरा वेगाने चालवायला लागलो.

अचानक आभाळ अंधारलं आणि सोसाट्याचा वारा सुटून पाऊस कोसळायला लागला. समोरचं काही दिसेनासं झालं, मी गाडीचा वेग जरा कमी केला आणि श्यामलला

म्हणालो, " काळजी करू नको, नेहमीचाच रस्ता आहे, गाडी थोडी हळू चालवली म्हणजे झालं. "

तिच्याशी बोलता बोलता गॅस(पेट्रोल )च्या इंडिकेटरकडे लक्ष गेलं आणि मी चमकलो. पेट्रोल जवळ जवळ संपलं होतं. मी मनातल्या मनात स्वतःला शिव्या घातल्या. दिवसभर बोटिंग करून आलो, त्या नादात मी गाडीत पेट्रोल आहे की नाही हे पाहिलंच नव्हतं.

मुकाट्याने मी गाडी वळवली. पेट्रोल पंपावर गेलो पेट्रोल भरलं आणि परत एकदा हॉस्पिटलच्या दिशेने निघालो. वादळ, वारा पाऊस विजांचा कडकडाट चालूच होता. हॉस्पिटलमध्ये पोचलो. तर डॉक्टरांनी रागावून विचारलं, " एवढा वेळ का लागला?" माझं उत्तर ऐकायला ते थांबले नाहीत. त्यांनी श्यामलला ताबडतोब डिलिव्हरी रूममध्ये नेलं.

बाळाच्या जन्माच्या वेळी मी श्यामल बरोबर असायला हवा, अशी माझी इच्छा होती, लॅमाझ क्लासमध्ये जाऊन लेसन घेतल्यामुळे डॉक्टरनी मला परवानगी दिली. पहिलटकरीण असूनही श्यामल ने फार वेळ घेतला नाही आणि नीलचा जन्म झाला.

त्यानंतर पंधरा वीस मिनिटात बाळाला स्वच्छ करून त्याचं वजन करून, नर्स त्याला बाहेर घेऊन आली. माझ्या हातात त्या इवल्याशा जीवाला ठेवून, तिनं माझं अभिनंदन केलं आणि निघून गेली.

नीलकडे पाहताना माझ्या मनात भरले त्याचे ते चकाकणारे डोळे. जगाकडे अपार कुतूहलानं पाहणाऱ्या माझ्या मुलाला मी जवळ घेतलं. आणि मनात आलं, ' आज निसर्गाचं चक्र पूर्ण झालं. "

दोन दिवसांच्या नीलला घेऊन श्यामल घरी आली, आता ती दीड महिना घरी असणार होती. त्यानंतर इन्नी आणि काका येणार होते. सहा महिन्यांनी ते गेले की श्यामलचे आई बाबा येणार होते आणि तेही सहा महिने राहणार होते.

म्हणजे लहान बाळ किमान एक वर्ष तरी, दोन आजी आजोबांच्या सहवासात वाढलं असतं. बाकी मीही नोकरीचा वेळ सोडल्यास, बाकीचा वेळ बाळासाठी आणि बाळाबरोबरच घालवणार होतो.

बापाच्या भुमिकेविषयी मी खूप विचार केला होता. आणि आई वडिलांनी मुलाला कसं वाढवावं ह्या बाबतीत मी काही गोष्टी निश्चितपणे ठरवल्या होत्या.

त्यातली पहिली गोष्ट. मूल झालं, म्हणजे पायात बेड्या पडल्या असं समजण्याची गरज नाही. उलट आपण आपल्या नेहमीच्या आयुष्यात अगदी मौजमजा करण्यातही मुलाला सामील करून घेऊ.

१८ मे रोजी नील झाला. २४ मे हा आमच्या लग्नाचा वाढदिवस. श्यामल म्हणाली, " ह्या वेळी आपण घरीच राहू. फारतर बाहेरून काहीतरी खायला मागवू. "

मी म्हणालो, " नाही. आपण नेहमीप्रमाणे सुंदरशा हॉटेलात जेवायला जाऊ, नीललाही बरोबर नेऊ. "

सहा दिवसांच्या नीलला छानपैकी गुंडाळून, खास तान्ह्या बाळासाठी असलेल्या बास्केट वजा सीटमध्ये ठेवून, आम्ही बाहेर जेवायला गेलो. जेवताना आमच्या शेजारच्या खुर्चीवर त्याची बास्केट ठेवली होती. तो शांत पहुडला होता. त्याच्याकडे लक्ष ठेवत, आमचंही जेवण हसत खेळत पार पडलं.

नीलला घेऊन गेलो, असं, हे पाहिलं आउटिंग! ते सुरळीत पार पडल्याने माझा आत्मविश्वास बळावला. दुसऱ्याच दिवशी सेंट लुईसमध्ये वीणा सहस्त्रबुद्धे याचं गाणं होतं.

इथेही आम्ही कालच्यासारखीच व्यवस्था करून नीलला बरोबर घेऊन गेलो. तो त्याच्या बास्केटमध्ये झोपला होता. आम्हालाही गाण्याचा आनंद घेता आला. त्या भरगच्च हॉलमध्ये सात दिवसाचं एक तान्ह बाळ उपस्थित आहे, हे कोणाला कळलं देखील नाही.

नीलला घरी आणलं. त्या दिवसापासून म्हणजे त्याच्या जन्माच्या तिसऱ्या दिवसापासून, त्याला आंघोळ घालण्याचे काम मी माझ्याकडे घेतलं. त्यासाठी मी एक छान युक्ती शोधून काढली. किचन सिंकमध्ये एक छोटं टब ठेवलं. त्यात तो बरोबर मावायचा. मग एका हातानं त्याचं डोकं सावरत, दुसऱ्या हातानं त्याला आंघोळ घालायची. इकडे किचन सिंकमध्ये गरम पाण्याची सोय असते, त्याचा असाही उपयोग झाला.

नील एक महिन्याचा झाला आणि आम्ही स्वतःच्या स्वतंत्र घरात राहायला गेलो. सेंट लुईसच्या वेब्स्टर ग्रोव्हज ह्या उपनगरात हे एक दुमजली प्रशस्त घर होतं. घराबद्दलच्या आमच्या सर्व कल्पना आणि स्वप्नं इथे पूर्ण झाली. बाळासाठीही स्वतःची सुरेख सजविलेली खोली होती.

इन्नी आणि काका अमेरिकेत आमच्या घरी आले, पहिल्यांदाच! नातवाला भेटून, आमचं घर, आमचा संसार पाहून दोघं खूष झाले. श्यामल आता हॉस्पिटलमध्ये जायला लागली होती. दिवसभर आम्ही दोघं घरी नसताना नीलला सांभाळण्याची जबाबदारी इन्नीने उचलली. आणि आम्ही निश्चिंत झालो.

सगळं कसं छान दृष्ट लागण्यासारखं चाललं होतं. पण दृष्ट लागू नये म्हणून जसं काजळाचं एक छोटंसं गालबोट लावलं जातं. तसाच एक किंचित विसंवादाचा सूर अधून मधून आमच्या घरात उमटायचा. तो सूर म्हणजे बाळाला वाढविण्याची ज्याची त्याची वेगळी दृष्टी आणि कल्पना!

इन्नीनं आपली स्वतःची पाच मुलं वाढवली होती तेव्हा तिला माझ्यापेक्षा कितीतरी जास्त अनुभव होता. हे अगदी खरं! पण एकतर एका पिढीचा फरक आणि त्यात आम्ही एका वेगळ्या जगात, वेगळ्या देशात राहत होतो, ही महत्वाची गोष्ट. मला अमेरिकन लोकांची मुलं वाढविण्याची पद्धत तर्कशुद्ध आणि व्यवहारी वाटायची. मला ती पद्धत पूर्णपणे पटली होती.

उदाहरणार्थ, मुलांची झोपायची स्वतंत्र खोली. घरी आल्या दिवसापासून नील त्याच्या खोलीत, त्याच्या पाळण्यात झोपायला लागला. ही गोष्ट श्यामललाही आधी पटली नव्हती. पण ती इथलं जग पाहत होती. हॉस्पिटलमध्ये काम करीत होती. त्यामुळे ही व्यवस्था आई वडिलांच्या दृष्टीनेच नव्हे, तर मुलाच्याही दृष्टीने योग्य आहे, हे तिला पटलं.

इन्नीला मात्र मुलं वाढवण्याची आमची पद्धत कधी कधी खूप कठोर वाटायची. नील वेगळ्या खोलीत झोपतो तर एक वेळ झोपू दे. पण तो रडायला लागला की आपण धावत जाऊन त्याला उचललं पाहिजे, असं तिचं मत!

अशावेळी तिला थोपवून मी म्हणायचो, " इन्नी ! प्रत्येक वेळी मुल रडलं, तर त्याला उचलून घेण्याची गरज नसते. जर त्याचं पोट भरलेलं असेल, त्याचा डायपर स्वच्छ असेल, त्याला कुठलंही दुखणं खुपण नसेल आणि तरीही तो रडत असेल, तर त्याला रडू द्यायचं. तो रडेल आणि आपणहून शांत होईल. "

इन्नी कळवळून विचारायची, " अरे असं कसं? मुलांना मायेची उब नको का? "

ह्यावर माझं म्हणणं, " हवी, नक्कीच हवी. ती मायेची उब तुम्ही त्याला द्या. पण त्याचं रडणं थांबल्यानंतर! तो रडायचा थांबला की मग आपण त्याला उचलून घ्यायचं. त्याला जवळ घ्यायचं. असं केलं नाही, तर कारण नसताना रडायची वाईट सवय त्याला लागेल. आता तुम्ही दोघं आहात, तुम्ही धावून त्याला उचलणार आहात. पण पुढे ह्या सवयीचा त्याला त्रास होईल आणि आम्हालाही. "

अर्थात काही काही गोष्टी मी इन्नीला तिच्या मनाप्रमाणे करायला देत असे, त्यातली एक गोष्ट म्हणजे " बाळाला तेलाने मालिश करणे आणि त्याच्या डोक्यावर तेल थापणे. " बाळाला ह्याची गरज नसते. असं माझं मत असलं तरी त्या बाबतीत मी आग्रह धरला नाही.

कारण त्यामुळे काही चांगलं झालं नाही, तरी काही बिघडणार नाही हे मला माहित होतं.

इन्नीनं एक गोष्ट चांगली केली, ती म्हणजे बाळाशी गप्पा. एवढ्या तान्ह्या बाळाशीही  ती काय काय बोलायची, त्याला काय काय दाखवायची. त्याच्या जोडीला हसायची.

अमेरिकन पालक आपल्या मुलांशी असे गप्पा मारल्यासारखे बोलत नाहीत किंवा सतत त्यांच्या अवती भोवती वावरतही नाहीत. त्यामुळे अमेरिकन मुलं दिसतात गोंडस, पण खूप ॲक्टीव वाटत नाहीत. नील खूप ॲक्टीव, उत्साही नि आनंदी बाळ होता. त्याचं सर्व श्रेय इन्नीला!

नीलला सांभाळायला सहा महिने एक आजी आजोबा होते, तर पुढचे सहा महिने दुसरे आजी आजोबा. मग मात्र आमचे आम्ही तिघच उरलो.

ह्या वेळी रेसिडेन्सी आणि इतर ड्युटी ह्या मुले श्यामल हॉस्पिटलमध्ये जरा जास्त बिझी झाली. शिवाय तिला रात्रपाळी, दिवसपाळी असेल तसं कामावर जायला लागायचं.

माझी नोकरीची वेळ नऊ ते पाच अशी ठरलेली असल्याने नीलची जास्त जबाबदारी माझ्यावर आली. पुढे माझा स्वतःचा व्यवसाय सुरु झाला. तेव्हा श्यामल तिच्या करियरमध्ये सेटल झाली होती. त्या वेळी आमचा दुसरा मुलगा समीर ह्याच्याकडे तिनं जास्त लक्ष दिलं. संसारात एकमेकांची वाढ होऊ देत, एकमेकांना सांभाळून घेणं खूप महत्वाचं असतं. ह्या बाबतीत मी आणि श्यामलनं एकमेकांना चांगलं समजून घेतलं.

नील एक वर्षाचा झाला आणि आता कुठलेच आजी आजोबा नसल्याने प्रथमच त्याला बेबी सिटरकडे ठेवण्याची वेळ आली. ब्रेंडा नावाची एक अमेरिकन बाई आम्हाला चांगली वाटली. तिच्याकडे आणखीही दोनतीन मुलं यायची. इथे नील चांगला रमेल, असा आम्ही विचार केला, कामावर जाताना सकाळी ८ वाजता नीलला ब्रेंडाकडे सोडायचं आणि संध्याकाळी ५ वाजता ब्रेंडाच्या घरून त्याला घेऊन यायचं, हे काम माझ्याकडे आलं.

पहिल्या दिवशी मी त्याला ब्रेंडाकडे सोडलं, तेव्हा तो खूप रडायला लागला. संध्याकाळी मी त्याला आणायला गेलो तेव्हाही तो रडत होता. दोनचार दिवसांनी त्याला सवय होईल, अशी मीच माझी समजूत घातली.

दोनचार दिवसांचे पंधरा दिवस झाले, तरी त्याच रडणं थांबेना. उलट आता त्याला ब्रेंडाकडे नेताना, तिचं घर आलेलं कळायचं आणि तिच्या रस्त्याला गाडी लागली की तिथपासूनच त्याचं रडणं सुरु व्हायचं. संध्याकाळी मी परत यायचो, तेव्हा हा ब्रेंडाच्या बाहेरच्या दरवाजाला जी फळी होती, तिथे उभा राहून रडत माझी वाट पाहत असायचा.

अशावेळी पोटात अगदी तुटायचं. पण करणार काय! एकच उपाय होता. बेबी सिटर बदलणे. आम्ही तोच निर्णय घेतला नी त्याला विल्माकडे ठेवायचा ठरवलं.

मुलांची काय गम्मत असते, कळत नाही, ब्रेंडाकडे जाताना रडणारा, नील, विल्माच्या घरी मात्र पहिल्या दिवसापासून शांतपणे गेला आणि शांतपणे राहिला. वरवर पाहता दोघीही चांगल्याच होत्या. पण त्याला ब्रेंडा आणि तिचं घर का आवडलं नाही? आणि विल्मा का पसंत पडली? ह्या प्रश्नांची उत्तरं मला कधीच मिळाली नाहीत.

न्युरॉलॉजीमध्ये एम. डी. केल्या नंतर, श्यामलला हॉस्पिटलमध्ये चांगली नोकरी मिळाली. घर घेतलेलं होतं. नीलचं सर्व रुटीन छान बसलं होतं. संसाराला स्थैर्य आलं होतं.

त्यामुळे परत एकदा माझ्यातला अस्वस्थ आत्मा जागा झाला. मी एमबीए झालो, पण त्यामुळे माझ्या नोकरीत किंवा कामाच्या स्वरुपात फारसा फरक पडला नव्हता. सहा वर्षात माझा पगार दुप्पट झाला होता एवढीच काय ती प्रगती!

पण बाकी कंपनीतलं क्षुद्र राजकारण तसंच होतं. दबावतंत्र, हेवेदावे, युद्धनीती सर्व काही जैसे थे! शेवटी मी ठरवलं, बास झाली ही नोकरी आणि कोणाची तरी गुलामगिरी! आता थोडसं कॅलक्युलेटेड रिस्क घ्यायचं आणि स्वतःचा व्यवसाय सुरु करायचा.

नव्याने बिझिनेस सुरु करायचा तर जागेपासून भांडवलापर्यंत, फारच मोठी उडी झाली असती. हे धाडस कदाचित अंगाशीही आलं असतं. यापेक्षा केमिकल ॲनालिसिस करणारी एखादी जुनी छोटी लॅब विकत घ्यावी आणि मग ती मोठी करावी, असं सगळं मी पक्कं केलं.

लॅब विकत घेण्याआधी जमलं तर वर्ष दीड वर्ष, तिथे नोकरी करायची, एकूण सेटअपचा अंदाज घ्यायचा आणि मगच ती विकत घ्यायचा प्रस्ताव मांडायचा. असाही एक चाणाक्ष आणि धोरणी विचार होता. थोडक्यात काय, तर कुठूनही धोका पोचणार नाही, अशी परफेक्ट स्कीम ठरली. तेव्हा मी ' यलो पेजेस ' मधल्या जाहिराती शोधायला सुरुवात केली.

छोट्या साईझच्या तीस चाळीस कंपन्यांना मी नोकरीसाठी अर्ज पाठवले. त्यातल्या बहुतेकांचं उत्तर आलं.

"तुमच्यासारखा पीएचडी आणि एमबीए केलेला हायली क्वालिफाइड माणूस आमच्या कंपनीला परवडणार नाही. "

काहींनी मला प्रश्न विचारला, "पेट्रोलाईटसारखी मोठी कंपनी सोडून, आमच्यासारख्या छोट्या कंपनीत येण्यामध्ये तुमचा काय इंटरेस्ट आहे? "

ह्यावर " तुमची कंपनी मला विकत घ्यायची आहे, " असं खरं उत्तर तर मी देऊ शकत नव्हतो.

ज्या कंपन्यांनी ' तुमचा पगार आम्हाला परवडणार नाही' अशी शंका व्यक्त केली होती, त्यांना मी एवढंच कळवलं की ' तुमच्या इथे मी अर्ध्या पगारावर काम करायला तयार आहे. ' पण या माझ्या ऑफरमुळे कदाचित त्याचा  संशय वाढला असावा. कारण माझी कुठेही डाळ शिजली नाही. मी अगदी नर्व्हस झालो.

त्याच सुमाराला सेंट लुइस मधल्या केमिर लॅबची माहिती मला कळली. डॉ. क्लॅरा क्रेव्हर नावाच्या एक बाई ही लॅब चालवत होत्या. त्या आता पासष्ट वर्षाच्या होत्या.

क्रेव्हर बाईना मी फोन करून विचारलं, " तुमच्याकडे माझ्यासाठी काही जॉब आहे का? "

त्या तिरसटपणे म्हणाल्या, " माझ्याकडे जॉब नाही. उलट मी ही कंपनी विकायचा प्रयत्न करते आहे. माझ्या मुलाला, जावयाला विचारलं पण ते म्हणतात आम्हाला ही कंपनी चालवण्यात इंटरेस्ट नाही. "

मी त्यांना लगेच म्हणालो, " डॉ. क्रेव्हर, तुम्हाला तुमचा बिझिनेस विकायचा आहे का? तर तसं सांगा. मी बिझिनेस विकत घ्यायलाही तयार आहे. "

क्रेव्हर बाई म्हणल्या, " हे बघ ही कंपनी माझ्या श्रमानं, माझ्या बुद्धीनं मी उभी केली आहे, आज ह्या कंपनीला जे नाव आहे ते केवळ माझ्यामुळे! कळलं? तेव्हा उगीच कोणी सोम्या गोम्या येईल आणि कंपनी विकत मागेल, तर ती मी देणार नाही. तूच सांग, तू केमिस्ट्रीत पी एच डी केली आहेस. पण तुला माझ्या व्यवसायातली काय माहिती आहे? "

मी सरळपणे म्हणलो, "अगदी बरोबर आहे, तुमचं म्हणणं. मला तुमच्या व्यवसायाबद्दल खूप माहिती नाही. पण मी एवढं सांगतो की पेट्रोलाईटसारख्या मोठ्या कंपनीत मी चागलं नाव कमावलेलं आहे. तिथे मी कितीतरी महत्वाचे शोध लावले आहेत. तुम्ही जर मला एक संधी दिलीत, तर मी असंच चांगलं काम केमिरमधेही करून दाखवीन. केमिरचं नाव मी कायम राखीन. "

क्रेव्हर बाई विचारात पडल्या. मी माझं म्हणणं पूर्ण केलं, "मी तुमच्याकडे पार्टटाइम काम केलं तर, तुम्हाला चालेल का? तुम्ही मला फारसा पगारही देऊ नका. मी तुमच्याच कंपनीतलं काम पाहीन. समजावून घेईन आणि तुम्हाला मदत करेन. तुम्हाला माझं काम पटलं तर परत एकदा आपण बसून बोलू आणि निर्णय घेऊ. '

क्रेव्हर बाई तयार झाल्या. त्या म्हणाल्या, " आठवड्याचे दहा तास तू माझ्या लॅबमध्ये काम करू शकतोस. पगार मात्र मी फार देणार नाही. तासाला पंधरा डॉलर्स! चालत असेल, तर बघ."

मी कबुल झालो, मग लंच अवरमध्ये आणि शनिवार रवीवारी मी केमिरमध्ये काम करायला लागलो. ह्या काळात क्रेव्हर बाईंची मर्जी बसली, तर मला त्यांच्या व्यवसायाची खूप माहिती मिळाली,

डॉ. क्रेव्हर ह्या एक अत्यंत हुशार बाई होत्या. इंडस्ट्रीचे अतिशय अवघड असे प्रश्न, त्या केमिकल ॲनालिसिस करून सोडवून घ्यायच्या. त्यासाठी त्या इन्फ्रा रेड स्पेक्ट्रोस्कोपी नावाची पद्धत वापरायच्या आणि ही विशिष्ट पद्धत वापरण्याच्या बाबतीत त्यांच्याइतकी तरबेज व्यक्ती मी तरी पाहिली नव्हती. त्यामुळे कोणाला न जमलेली कामं जेव्हा क्रेव्हर बाईंकडे यायची, तेव्हा त्या आय. आर स्पेक्ट्रोस्कोपी पद्धतीनं काम यशस्वी करून दाखवायच्या. त्यांच्या व्यवसायातलं यश, त्यांच्या या कौशल्यामुळेच त्यांना मिळालेलं होतं.

ही झाली जमेची बाजू. पण त्याच बरोबर त्यांच्या बिझिनेसमध्ये काही उणीवाही होत्या. प्रॉब्लेम सोडविण्यासाठी क्रेव्हर बाई आय. आर. स्पेक्ट्रोस्कोपीशिवाय दुसरी पद्धत वापरायच्या नाहीत. आणि म्हणून ह्या पद्धतीने सोडवता येणार नाहीत, असे प्रॉब्लेम आले, तर त्या चक्क ' मी हे काम करणार नाही' असं सांगायच्या.

दुसरी गोष्ट म्हणजे, त्यांची कंपनी हा एक खांबी तंबू होतं. एक सेक्रेटरी, एक मदतनीस असे मोजके दोन तीन लोक घेऊन, मुख्य काम त्या स्वतःच करायच्या. त्यामुळे कंपनी चांगली चालली असली, तरी इतक्या वर्षात ती फारशी वाढली नव्हती. किंबहुना ' केमिर ही कंपनी म्हणजे डॉ. क्रेव्हर' असं समीकरण होतं. ह्याचाच अर्थ, ' क्रेव्हर बाई नाहीत, तर कंपनीच नाही' असं समीकरणही योग्य ठरलं असतं.

मी ह्या सर्व गोष्टींचा विचार केला. क्लारा क्रेव्हर बाई नसल्या, तरीही मी ही कंपनी चालवेन, मोठी करेन, अशी खात्री वाटली, तेव्हा परत एकदा मी बाईंसमोर कंपनी विकत घेण्याचा प्रस्ताव मांडला. एका दृष्टिनं बरं झालं, कारण ही वेळ अगदी योग्य होती.

केमिर लॅबच्या क्रेव्हर बाईंसह



ह्या वेळेपर्यंत क्रेव्हर बाईना माझ्याबद्दल विश्वास वाटायला लागला होता. माझं काम त्यांना पसंत पडलं होतं. दुसरीकडे त्यांचा नवरा त्यांना आग्रह करत होता, " पुरे झालं तुझं हे काम काम काम. तू आता कंपनी विक, मी रिटायर्ड झालो आहे, आपण जरा हिंडू फिरू, मजा करू. "

क्रेव्हर बाईंनी मला आश्वासन दिलं, की " ही कंपनी मी तुला विकेन. "

मी एकदम खुश! कंपनी विकत घेण्याबाबत फायनल बोलणी व्हायची होती. टर्म्स आणि कंडीशन्स  ठरायच्या होत्या. पण मी माझ्या बाजूने तयारी सुरु केली. म्हणजे कर्जासाठी एकदोन बँकामध्ये बोलून ठेवलं. कंपनी घेतल्यानंतर आपण तिथे काय सुधारणा करायच्या, ह्या संबंधीची योजना  आखायला लागलो.

अचानक माझ्या एक गोष्ट लक्षात आली. आणि मी हादरलोच. गावातल्या दुसऱ्या एका टेस्टिंग लॅबचा मालक फ्रेड फायरस्टोन हा सध्या वरचेवर येत होता आणि क्रेव्हर बाईशी बोलणी करत होता. इतकंच नाही, तर तो त्यांना अधून मधून जेवायलाही घेऊन जात होता.

फ्रेड फायरस्टोनला केमिर ही कंपनी विकत घ्यायची होती, ही गोष्ट हळू हळू उघड झाली. त्या बाबतीतील त्याचे आणि माझे मार्ग अगदी वेगळे होते. मी आपला सरळ, मराठी बाण्याचा रोखठोक बोलणारा माणूस. ' माझं कामच माझ्याबद्दल बोलेल. ' असा विश्वास बाळगणारा. तर फ्रेड मात्र टिपिकल अमेरिकन गोडबोल्या. त्याच्यासारखा एक देखणा तरुण आपल्याशी प्रेमानं बोलतो, वागतो ह्यामुळे नाही म्हटलं तरीं पासष्टीच्या क्लारा बाईचे

जमिनीवरचे पाय सुटलेच. त्या फ्रेडवर इतक्या भाळल्या की त्याच्या अगदी कह्यात गेल्यासारख्या वागायला लागल्या.

मला हे सर्व दिसत होतं. कळत होतं. पण मी काय करणार! शेवटचा प्रयत्न म्हणून मी बाईंशी स्पष्ट बोलायचं ठरवलं. मी त्यांना विचारलं, " तुमचा विचार बदलला आहे का? "

त्या म्हणाल्या, " हो, मी माझी कंपनी फ्रेडला विकणार आहे. तसा करार मी त्याच्याबरोबर केला आहे. "

आपली सर्व धडपड फुकट गेली, म्हणून मी अगदी निराश झालो. म्हणालो," बाई, तुम्ही असं कसं केलात? आपलं ठरलं होतं कि... "

त्या तटकन म्हणाल्या " तू कंपनी विकत घेऊ शकशील, असं मला वाटलं नाही. "

मी थक्क झालो, पण चिकाटीनं बोलणं चालू ठेवलं, " फ्रेड म्हणतो आहे, लोन घेणार; पण त्याच्या लोनचं काही खरं नाही. "

आता मात्र बाई माझ्यावर डाफरल्याच.

" हे बघ, तो (फ्रेड ) सगळं व्यवस्थित करतो आहे. आमचं डील झालेलं आहे, तू आता आशा ठेऊ नको. "

मी हटलो नाही. शेवटचा एक चिवट धागा पकडून म्हणालो, " तुम्ही म्हणता ते ठीक आहे. पण आपण एक बॅकअप कॉन्ट्रॅक्ट केलं तर? म्हणजे समजा, फ्रेडचा आणि तुमचा व्यवहार जमला नाही, तर त्याच किंमतीत तुम्ही तुमचा हा बिझिनेस मला विकायचा. "

त्या ठाम स्वरात म्हणाल्या, " असं घडणं शक्यच नाही. "

पण मग त्यांना काय वाटलं कोणास ठावूक? थोड्या नरमाइनं म्हणाल्या, "फ्रेडबद्दल मला खात्री आहे, पण हवं तर तू म्हणतोस, तसं बॅकअप कॉन्ट्रॅक्ट आपण करून ठेऊ. "

बिझिनेसमध्ये काहीही घडू शकतं आणि जातीच्या बिझीनेसमननं कधीही आशा सोडू नये, ह्याचा प्रत्यय मला लवकरच आला.

क्रेव्हर बाई बरोबर बॅकअप कॉन्ट्रॅक्ट  केलं आणि मी आशा करीत राहिलो की फ्रेडला लोन मिळणार नाही. त्याचा बेत फिसकटेल आणि... माझी आशा फळाला आली, फ्रेडचं लोन खरोखरच फिस्कटलं. तो क्रेव्हर बाईकडे आला आणि म्हणाला, केमिर कंपनी विकत घेण्यासाठी मला थोडेसे पैसे कमी पडतायत. "

त्यावर बाई म्हणल्या, " ठीक आहे, फ्रेड! तू तुझी कंपनी माझ्याकडे गहाण ठेव. "

फ्रेड तयार होईना, उलट तो हट्टाने म्हणाला, " नाही, हे डील माझ्याच टर्म्सवर झालं पाहिजे. नाही तर मी डील मागे घेतो. "

फ्रेडनं डॉ. क्लारा क्रेव्हरना ओळखलं नव्हतं. त्या फार कडक बाई होत्या आणि त्यांना कोणी चॅलेंज केलेलं आवडायचं नाही. त्यांनी फ्रेडला एका वाक्यात सुनावलं, " मी माझा बिझिनेस तुला विकणार नाही!"

झालं! ह्या एका वाक्यानं फ्रेडचं आणि त्यांचं डील तुटलं. आणि बॅकअप कॉन्ट्रॅक्ट नुसार माझं डील पक्क झालं.

आता खरं सांगायचं तर दोनतीन वर्ष थांबून मग ही कंपनी घेणं मला जास्त सोयीचं होतं. पण समोर आलेली संधी दवडणं म्हणजेही मुर्खपणा ठरला असता.

मी बँकांकडे कर्ज मागायला सुरुवात केली. मला बिझिनेसचा आधीचा अनुभव नाही, म्हणून काही बँकांनी ' नाही' म्हटलं. शेवटी एका बँकेनं पंच्याहत्तर हजार डॉलर्सचं कर्ज दिलं. थोडे पैसे मी क्रेडीट कार्ड वरून काढले. तरीही जवळ जवळ २५ हजार डॉलर्स कमी पडत होते.

परत एकदा मी क्रेव्हर बाईना भेटायला गेलो. पैशांची नेमकी स्थिती सांगितली आणि प्रामाणिकपणे म्हणालो, " आता तुम्हाला योग्य वाटेल, तसं तुम्ही करा!"

तर आश्चर्य म्हणजे, बाई म्हणाल्या " ठीक आहे. २५ हजार डॉलर्स मी तुला कर्ज देते आहे. एका वर्षात तू ते फेड म्हणजे झालं!"

माझा माझ्याच कानांवर विश्वास बसेना. काही मिनिटात  सर्व व्यवहार उरकला. सह्या झाल्या आणि की केमिर लॅब, ह्या कंपनीचा मालक झालोसुद्धा!

शेवटी गंगेत घोडं न्हालं. १९९० सालच्या ऑक्टोबर महिन्यातल्या त्या एका दिवशी मी केमिरचा मालक झालो. पण खरं म्हणजे दोन कंपन्यांचा मालक! कारण केमिर हा छोटासा उद्योग दोन कंपन्याचा एकत्र बनलेला होतं. केमिर आणि पॉलिटेक लॅब! रिटायर्ड होण्याआधी क्रेव्हर बाईचे यजमान, केन क्रेव्हर हे पॉलिटेक लॅब सांभाळायचे, तर क्रेव्हर बाई केमिर सांभाळायच्या.

शेवटी डॉ. क्लेरा क्रेव्हर यांनी मला आपला बिझिनेस विकला, तेव्हा मी अचानक एका रात्रीत दोन कंपन्यांचा मालक आणि बॉस झालो.

म्हणायला दोन कंपन्यांचा उद्योग समूह! पण एकूण सेटअप कोणी पाहिला असता, तर त्याला हसायला आलं असतं. एका जुन्या बिल्डींग मधली जेमतेम ९०० चौरस फुटांची जागा. तीही खालच्या मजल्यावरचे ४५० चौरस फुट आणि वरच्या मजल्या वरचे ४५० चौरस फुट अशी वर खाली! वरच्या मजल्यावर जाण्यासाठी एक जुनी, लाकडी, पायऱ्या तुटलेली डळमळीत शिडी. प्रयोगशाळेत सामान मोजकंच, तेही जुनंपानं. अत्याधुनिक उपकरणं नाहीत. फ़ॅक्स मशीन नाही. कॉपिअर (झेरॉक्स मशीन) नाही. नाही म्हणायला एक जुनापाना का होईना कॉम्प्युटर होता आणि चक्क दोन फोन! काळा फोन केमिरचा, लाल फोन पॉलीटेक लॅबचा!

दोन कंपन्यांमध्ये मिळून एकूण तीन माणसांचा स्टाफ होता. म्हणजे एका कंपनीचा दीड माणूस, असे म्हणूया हवं तर! ही तीन माणसं म्हणजे रुथ नावाची ७० वर्षे वयाची सेक्रेटरी! पॅम नावाची एक केमिस्ट आणि मार्क हा क्रेव्हर बाईंचा भाचा किंवा मानलेला मुलगा!

कंपनीचा बॉस म्हणून मी जेव्हा ह्या जागेत पाऊल टाकलं, तेव्हा रुथनं माझ्या हातात तिचा राजीनामा दिला, एकतर तिचं वय झालेलं होतं, आणि क्लारा क्रेव्हर गेल्यानंतर तिची काम करायची इच्छा नव्हती. मार्क हा व्यसनी आणि लाडावलेला. तो कधी यायचा, कधी नाही.

म्हणजे आता इन मीन तीन माणसं, असंही म्हणायला नको. कधी मी कंपनीचा टेलिफोन ऑपरेटर असायचो, तर कधी साफ सुफ करणारा गडी. क्लायन्टकडे मिटिंगला जाताना मी सीईओ असायचो. तर कधी प्रयोगशाळेत कामात गुंतलेला केमिस्ट असायचो! तरीही काळा फोन वाजला की मी ऐटीत म्हणायचो,

" हॅलो केमिर!" आणि लाल फोन वाजला की उचलून तितक्याच ऐटीत म्हणायचो, " हॅलो, पॉलीटेक लॅब "!

कधी कधी ताबडतोब फ़ॅक्स पाठवायचा असायचा, किंवा कागदपत्रांच्या झेरॉक्स कॉपीज काढायच्या असायच्या. अशावेळी केमिस्ट पॅम सार्जंटही ड्युटी संपवून घरी गेलेली असली, तर मी लॅबच्या दरवाजावर पाटी लावायचा,

" मालक कामासाठी बाहेर गेले आहेत. पंधरा मिनिटात परत येतील. " आणि धावत रस्ता क्रॉस करून समोरच्या दुकानातून फ़ॅक्स पाठवायचा किंवा झेरॉक्स करून घ्यायचा.

कधी कधी क्लायन्टचा फोन असायचा. " ताबडतोब भेटून काही महत्वाचं बोलायचं आहे, आम्ही तुमच्या लॅबमध्ये येऊ का? "

ह्यावर मी नम्रपणे म्हणायचा, " कशाला त्रास घेता? मीच तुमच्याकडे येतो. "

क्लायन्ट खुश! मीही खुश!

काही क्लायंट मात्र आग्रहाने म्हणायचे, " नाही, आम्हीच तुमच्याकडे येतो. "

अशा वेळी त्यांना दुसऱ्या दिवशी येण्याचं निमंत्रण द्यायचं आणि मग माझी धावपळ काही पाहायला नको. दुसऱ्या दिवशी लॅबमध्ये येताना मी घरून व्हॅक्युम क्लिनर घेऊन यायचा. पाहुणे येण्याआधी घरातली बाई जशी झाड लोट, साफ सुफ करते, तशी निगुतीने मी लॅब साफ करायचा. म्हणजे जमेल तेवढी! त्यानंतर टायबिय लावून सूट बिट घालून मालकाच्या भूमिकेत, क्लायंटच्या स्वागताला तयार!

क्रेव्हर बाईंचा व्यवसाय मी विकत घेतला, तेव्हा एक करार असा होता की आता नवीन मालकांची ही जुनी कंपनी नीट चालेपर्यंत क्रेव्हर बाईंनी मार्गदर्शनासाठी म्हणून एकूण चाळीस तास वेळ द्यायचं.

त्याप्रमाणे सुरुवाती सुरुवातीला मी त्यांना उत्साहाने बोलावून घेतलं. कामाच्या बाबतीतलं त्याचं मार्गदर्शन मोलाच होतं. मला त्यांच्याकडून खूप शिकायला मिळालं. पण त्याचबरोबर त्यांच्या वागण्याचा काही त्रासही मला सहन करावा लागायचा.

त्यांनी तीस वर्ष हा व्यवसाय एक हाती चालवला होता. आताही मी तो त्याच पद्धतीने चालवावा असा त्यांचा आग्रह असायचा. हा नवा मालक आहे, त्याचे विचार वेगळे असतील, हे त्या जमेत धरायच्या नाहीत. त्यांचा एकूण अविर्भाव असा असायचा, " हा कालचा पोरगा! ह्याला काय कळतं आहे? त्यामुळे त्या सारख्या, " अरे अरे असं करू नको, किंवा अरे अरे, तसं कर. " " दुसरं टेक्निक वापरू नको. " तुला काही कळतच नाही, ' असे शेरे - ताशेरे झाडत राहायच्या.

शेवटी मी त्यांना बोलवायचं बंद केलं. व्यवसायात, डोक्यावर सासू असून चालत नाही. हे मी ओळखलं होतं. व्यवसाय सोडून आमचे बाकीचे संबंध चांगले राहिले.

आता खऱ्या अर्थाने केमिरची सर्व जबाबदारी माझ्या एकट्यावर आली. व्यवसाय कसा करायचा आणि कसा करायचा नाही ह्याबद्दल मी काही गोष्टी ठरवल्या होत्या. त्यातली पहिली गोष्ट, ही कंपनी म्हणजे क्रेव्हर बाईंची हौस होती, मला केवळ हौस पुरवायची नव्हती. तर मला उत्तम बिझिनेस करायचा होता. म्हणूनच कामाच्या बाबतीत मी क्रेव्हर बाईंच्यापेक्षा अगदी उलट धोरण आखलं. कुठल्याही कामाला ' नाही' म्हणायचं नाही. तुम्ही तुमची कुठलीही समस्या घेऊन या. आम्ही ती सोडवून देऊ, हे माझं व्यवसायातलं पहिलं सूत्र ठरलं.

क्रेव्हर बाईंची स्पेशालिटी म्हणजे इन्फ्रा रेड स्पेक्ट्रोस्कोपी, ही पद्धत मला माहित होती. त्यात मी त्यांच्या इतका एक्सपर्ट नव्हतो. पण ही उणीव भरून काढण्यासाठी मला आणखी बऱ्याच पध्दती येत होत्या.

न्यूक्लिअर मॅग्नेटिक रेझोनन्स स्पेक्ट्रोस्कोपी, मास स्पेक्ट्रोस्कोपी, गॅस क्रोमॅटोग्राफी, हाय प्रेशर लिक्विड क्रोमॅटोग्राफी, ह्या सर्व पद्धती वेगवेगळ्या कारणांसाठी उपयोगी पडायच्या. एकच हत्यार न वापरता मी माझ्याकडची सर्व हत्यारं वापरायला लागलो. आणि हळू हळू क्लायन्टसना माझ्याबद्दल विश्वास वाटायला लागला.

सुरुवातीला काही छोटी मोठी कामं आली, ती नीट पार पडली आणि मग एक मोठी औषध कंपनी, त्यांचा एक प्रॉब्लेम घेऊन माझ्याकडे आली.

ही औषध कंपनी एक हिरव्या रंगांच्या औषधी गोळया बनवायची. कंपनीच्या स्टॉकमध्ये असलेया ह्या हिरव्या गोळयावर अचानक पांढरे पिवळे डाग पडायला लागले.

कारण काय? ते कोणालाच कळेना. पण त्या प्रॉब्लेममुळे कंपनीत चिंतेत वातावरण निर्माण झालं. अमेरिकेत फूड अॅड ड्रग असोसिअशनचे नियम अतिशय कडक असतात, हे नियम जरा जरी डावलले तरी तुमच्यावर खटला होऊ शकतो. आणि लाखो रुपयांची नुकसान भरपाई द्यावी लागते.

म्हणजे ह्या डाग पडलेल्या गोळया विकता येत नाहीत आणि फेकून द्याव्या तरी परत मोठं नुकसान आहेच. कात्रीत सापडल्यासारखी स्थिती झाली, तेव्हा ही कंपनी माझ्याकडे आली. ' हिरव्या गोळयांवर पांढरे पिवळे डाग पडण्याचं कारण काय?' हे शोधण्याची जबाबदारी त्यांनी माझ्यावर सोपवली.

प्रथम मी औषधी कंपनीच्या लोकांशी बोललो. मी त्यांना म्हटलं.

' मला डाग पडलेल्या आणि चांगल्या अशा दोन्ही गोळया दाखवा. " मग मी त्यांच्याकडून गोळीचा फ़ॉर्म्युला विचारून घेतला. आणि आणखीही बरीच माहिती गोळा केली.

" हा प्रॉब्लेम केव्हापासून सुरु झाला? डाग उन्हाळयात पडतात की हिवाळयात? वर्षानुवर्ष ज्या पद्धतीने गोळया तयार होतात, त्यात काही फरक केला होता का? किंवा मिश्रणाचे जे घटक नेहमी वापरले जातात, त्यात काही फरक झाला का? "

या सर्व प्रश्नांची उत्तर मिळाली, तेव्हा मी ह्या औषधी गोळयांचं रासायनिक पृथक्करण सुरु केलं. बरेच प्रयोग झाले, शेवटी मला कारण सापडलं.

ह्या औषधी गोळयांमध्ये, मिश्रणाच्या घटकांनी एकत्र रहावं, म्हणून एक विशिष्ट प्रकारचा स्टार्च वापरला जायचा. ह्या स्टार्चमध्ये मला असं एक सॉल्व्हंट (द्रावक ) सापडलं. जे तिथे असायला नको होतं.

आता मला नेमका उलगडा झाला, गोळीच्या हिरव्या रंगाच्या मिश्रणावर ह्या सॉल्व्हंटची रिअॅक्शन व्हायची आणि गोळीतल्या मिश्रणाचा कुठे कुठे रंग बदलायचा.

मी हेही शोधून काढलं की डाग पडले, तरी ह्या गोळीमुळे शरीराला कोणत्याही प्रकारचा अपाय नव्हता.

कारण, कारणमीमांसा आणि उपाय अशा सर्व गोष्टी मी लेखी स्वरुपात कंपनीला दिल्या आणि औषधी कंपनीचे लोक विलक्षण खुश झाले. आता त्यांना कोर्ट कचेरीचं आणि

नुकसानभरपाईचं भय उरलं नाही, "डाग पडलेली गोळी शरीराला अपायकारक नाही" असा दाखलाच आमच्या लॅबनं त्यांना दिला.

फक्त फूड अँड ड्रग असोसिएशनचे कडक नियम लक्षात घेऊन, आताचा डाग पडलेला स्टॉक फेकून द्यायला हवा आणि नवीन उत्पादनात योग्य तो स्टार्च वापरायला हवा. एवढ्या दोन गोष्टींमुळे कंपनीवरचं अरिष्ट टळलं.

एखादी मोठी आणि कठीण केस वकिलांनी जिंकली, तर त्यांचं जसं नाव होतं, तसंच माझ्या बाबतीत घडलं. ' हिरव्या गोळयांवर पिवळे पांढरे डाग का पडतात? हे रहस्य मी सोडवलं, आणि माझ्याकडे नवनवीन क्लायन्टस गर्दी करायला लागले.

माझ्या व्यवसायात मी आता बॉस झालो असलो तरी आमच्या घराचा बॉस, अजूनही नीलच होता. श्यामलचं आणि माझं आयुष्य त्याच्याभोवती फिरत असायचं. आपली कामं सांभाळून त्याला सांभाळायचं. श्यामल घरी आली की खो दिल्यासारखा मी नीलला तिच्याकडे सोपवून म्हणणार, " चल, मी जातो आता लॅबमध्ये!"

९० सालात नोकरी सोडून मी केमिर लॅब घेतली. तेव्हा नील दोन वर्षाचा होता. त्या वेळी बरेचदा मी त्याला लॅबमध्ये घेऊन जात असे.

लॅबमध्ये त्याला मोकळा सोडणं, शक्य नव्हतं. म्हणून बरोबर त्याचं प्ले पेन आणि खेळणी असायची. प्ले पेन हा एक प्लास्टिकचा घडी करून ठेवता येण्यासारखा मोठा बॉक्स होता. लॅब मधल्या मोकळया जागेत, हा बॉक्स उघडून उभा करून ठेवायचा. त्यात खेळणी टाकून नीलला ठेवायचा. एकीकडे माझं काम चालू असायचं आणि नील प्ले पेनमध्ये खेळण्यांशी खेळत राहायचा.

एकदा असाच प्ले पेन लावून, त्यात नीलला ठेवलं आणि लक्षात आलं आज आपण त्याची खेळणी आणायला विसरलो. आता काय करायचं? लॅबमध्ये त्याला खेळायला देण्यासारखं काहीच नाही. मग मी माझा सेल फोन त्याला खेळायला दिला.

हे नवीन खेळणं पाहून नील खुश झाला. तो त्याची बटन दाबत, तऱ्हेतऱ्हेचे आवाज ऐकत खेळत राहिला. इकडे मीही कामाला लागलो.

बराच वेळ गेला आणि अचानक दारावर जोरात ठकठक आवाज झाला. मी दार उघडलं, तर दारात पोलिस!

मी गोंधळलो, एका पोलिस ऑफिसरनं जोरात विचारलं, " कोणाचं घर आहे? "

मी म्हटलं, " हे घर नाही, ही बिझिनेसची जागा आहे. "

तो आत येत कडक आवाजात म्हणाला, " आम्हाला बिझिनेसची जागा तपासायची आहे, इथे कोणीतरी लहान मूल आहे आणि त्याला काहीतरी प्रॉब्लेम आहे. ते संकटात आहे. "

मला काही कळेचना, मी म्हटलं, " छे छे,! असं काही नाहीये. तुमचा काहीतरी गैरसमज झाला आहे. हा माझा मुलगा इथे मजेत खेळतो आहे. "

मी बोलत असताना त्या पोलिस ऑफिसरनं इकडे तिकडे पाहिलं. त्याला प्ले पेन दिसलं. प्ले पेनमध्ये नील उभा होता. त्याच्या हातात फोन होता आणि तो फोनची बटनं दाबत होता.

नीलकडे पाहताना माझी ट्यूब पेटली, पोलिस ऑफिसरच्याही डोक्यात प्रकाश पडला. आणि एकाच वेळी ते दोन पोलिस ऑफिसर्स आणि मी, आम्ही जोरात हसायला लागलो.

नील आमच्याकडे पाहतच राहिला, "ही मोठी माणसं आता मोठ्या मोठ्यानं बोलत होती आता अचानक मोठ्या मोठ्यानं हसतात, काय म्हणाव वेड्यांना? असं त्याला वाटत असणार.

पोलिसांच्या आणि माझ्या लक्षात आलेली गोष्ट अशी होती, की ' नीलनं खेळता खेळता चुकून ९११ हे नंबर ह्याच क्रमाने दाबले असणार.

इकडे अमेरिकेत हे नंबर्स टेलिफोनवर फिरवले की पोलिसांना काळात, " कोणीतरी संकटात सापडलं आहे. आणि आपल्याला मदतीला बोलावलं आहे. ' नाईन वन वन ' ने नंबर फिरवणारा माणूस काही बोलला नाही तरी, हा फोन कुठून आला हे पोलिसांना कळतं आणि काही मिनिटातच ते त्या जागी पोचतात.

उगीच त्रास झाला, म्हणून मी पोलिस ऑफिसरकडे दिलगिरी व्यक्त केली. ह्या प्रकरणामुळे मला मात्र एक गोष्ट कळून चुकली, की 'बाप आणि बॉस ह्या भूमिका एकत्र करायच्या नाहीत. नाहीतर हा असा घोटाळा होतो'.








मा. विलासराव देशमुखांसह एका पारिवारिक कार्यक्रमात, मा. उद्धव ठाकरे , मा. सुशीलकुमार शिंदे व मा. मनोहर जोशी यांचेसमवेत.

मी केमिर लॅब चालवायला लागलो. त्यानंतर वर्षभरातच इतकं काम वाढलं की होती ती जागा अपुरी पडायला लागली. मी नवीन जागा शोधायला लागलो. माझ्या बँकेच्या मालकीची एक बिल्डींग होती, ती मी विकत घेतली.

इथे १८०० चौरस फुटांचं एक बेसमेंट होतं. त्याची मी प्रयोगशाळा केली. वरती ९०० चौरस फुटांच्या चार जागा होत्या. त्यातली एक जागा ऑफिस करता ठेवली आणि बाकीच्या जागा भाडेकरुना दिल्या.

ह्या भाड्यातून बँकेचा कर्जाचा हप्ता वळता व्हायचा. म्हणजे पूर्वीच्या तिप्पट मोठी जागा मला फुकट मिळाली. बेळगावला असताना वयाच्या चौदाव्या वर्षी मी ही युक्ती वापरली होती. आताही तीच युक्ती वापरली आणि ती यशस्वी ठरली.

आता माझ्या बिझीनेसला बिझिनेसचं स्वरूप आलं. प्रयोगशाळा मोठी झाली. त्यात लागतील तशी नवीन आणि आधुनिक उपकरणं मी घेतली. ऑफिसमधेही एक सेक्रेटरी आणि एक असिस्टन्ट असा स्टाफ तयार झाला.

आमचे बहुतेक कस्टमर्स हे इंडस्ट्रीमधले असायचे. पण एकदोनदा काही घरगुती समस्या आमच्यासमोर आल्या नि कस्टमरला " नाही" म्हणायचं नाही म्हणून मी त्या सोडवूनही दिल्या.

अशीच एकदा तिशी पस्तीशीची एक बाई थोडीशी बाचकत बिचकत आमच्या ऑफिसमध्ये आली. नाव कॅथी. कॅथीनं जरास अडखळत विचारलं, " माझा एक प्रॉब्लेम आहे, तुम्ही सोडवला का? "

" काय प्रॉब्लेम आहे? " मी विचारणा केली, तर तिनं माझ्यासमोर एक पांढरा शर्ट ठेवला. त्या शर्टवरचे लाल गुलाबी डाग दाखवीत ती म्हणाली, " हे डाग कसले आहेत ही माहिती मला हवी आहे. हा शर्ट माझ्या नवऱ्याचा आहे आणि तो म्हणतो हे शाईचे डाग आहेत. "

मी म्हटलं, " ठीक आहे, मी प्रयत्न करतो. "

तिनं फी विचारली. मी आमची ठरलेली फी सांगितली. ' बाराशे डॉलर्स '

ती कबुल झाली, म्हणाली, " चालेल, फक्त एकच गोष्ट करा, हा शर्ट खराब होऊ देऊ नका. "

शर्ट खराब न करता. केमिकल ॲनालीसिसने त्या डागांचं कारण शोधून काढणं, ही गोष्ट कठीण होती. पण मी तिची विनंती मान्य केली आणि तिला तीन तासांनी यायला सांगितलं.

नेहमीची आमची पद्धत अशी कि कपड्याचा थोडा भाग कापून तो सॉल्व्हन्टमध्ये घालायचा आणि त्यानंतर त्याचं केमिकल ॲनालिसिस करायचं. पण कॅथीची विनंती लक्षात घेऊन मी शर्ट जसाच्या तसाच ॲनालिसिससाठी घेतला.

तीन तासांनी कॅथी आली. उत्सुकतेने तिनं विचारलं, " कळलं का, कसले डाग आहेत ते?”

मी म्हणालो, " हो कळलं. ते डाग मेकअपचे आणि लिपस्टिकचे आहेत. "

अरे बाप रे! माझं वाक्य पूर्ण झालं अन कॅथी एकदम मटकन खाली बसली. तिचे डोळे पाण्यानी भरून आले.

काही क्षण विचित्र शांतता. कोणी काही बोललं नाही. तरी एकूण घटनेचा मला अंदाज आला.

कॅथीचा नवरा कॅथीशी खोटं बोलला होता. त्याचे कोणा दुसऱ्या बाईबरोबर जवळचे संबंध होते. कॅथीला तसा संशय होतं, माझ्या रिपोर्टमुळे तिचा संशय खरा ठरला होता.

कॅथी जड पावलांनी निघून गेली. कधी नव्हे ते काम नीट करूनही मला समाधान वाटत नव्हतं. वेदनेनं भरलेला कॅथीचा चेहरा आठवत होता. आणि आपण तिला चांगली बातमी देऊ शकलो नाही. ह्यामुळे कारण नसताना उगीचच अपराधीपणाची जाणीव बोचत होती.

अशीच एकदा आणखी एक बाई आली. खूप काळजीत असल्यासारखी वाटत होती. हिनं माझ्या समोर ऑल पर्पज फ़्लोअर (एक विशिष्ट मैदा)चा पुडा ठेवला आणि विचारलं, "ह्या पुड्यातलं पीठ तुम्ही तपासून द्याल का? "

मी म्हणालो, " देईन, पण प्रॉब्लेम काय आहे? "

ती म्हणाली, " माझ्याकडे माझी एक मैत्रीण आली होती. तेव्हा मी ह्या ऑल पर्पज फ़्लोअरची ग्रेव्ही बनवली आणि आम्ही ती ब्रेड बरोबर खाल्ली. काही वेळानंतर आम्हाला दोघीनाही खूप त्रास व्हायला लागला. पोटं दुखायला लागली, पोटं बिघडली. हे अचानक असं का व्हावं? आम्हाला काही कळेना. नंतर माझा नवरा म्हणाला, ' तुम्ही ऑल पर्पज फ़्लोअरची ग्रेव्ही खाल्लीत ना? त्यामुळेच असं झालं असणार, त्या पिठात कोणीतरी विष बिष मिसळलेलं असेल, 'मी भयंकर घाबरले, असं पिठात कोणी विष कसं मिसळेल? नवरा मला उगीच तर काहीतरी सांगत नाही आहे ना? सांगेलही. मी अप सेट व्हावी म्हणून तो काहीही करेल, त्याचं आणि माझं जराही पटत नाही. पण ते काहीही असेल, तर तुम्ही मला ह्या पिठात ' तसलं' काही आहे की नाही हे तपासून सांगा, म्हणजे माझा जीव भांड्यात पडेल. "

मी सांगितलेली फी द्यायला ही बाई तयार झाली. मी पिठाचं रासायनिक पृथक्करण केलं आणि आश्चर्य म्हणजे ह्या पिठात खरंच उंदराचं विष सापडलं.

ही बाई आली. तिला मी माझा रेपोर्ट दिला. तो वाचून ती एकदम नर्व्हस झाली. उदास झाली. मात्र मी तिचा प्रश्न नीट सोडवून दिला, म्हणून तिने माझे परत परत आभार मानले आणि घेऊन गेली. क्लायन्टचं शंका समाधान करणं, हे माझं काम आहे. पण कधी कधी माझ्या डोक्याला नुसता भुंगा लागतो. त्यातली ह्या बाईची ही केस.

' ह्या पिठात खरंच तिच्या नवऱ्यानं विष मिसळलं होतं की आणखी कोणी? आणि जर हे कृत्य तिच्या नवऱ्याचं होतं, तर त्या बाबतीत त्यानेच तिला सावध का केलं? तो गप्प का बसला नाही? "

बाईला तिच्या प्रश्नाचं उत्तर मिळालं. पण माझे प्रश्न अनुत्तरितच राहिले. कारण माझं शंका समाधान करणारी आणखी कुठली 'केमिर' मला माहित नव्हती.

टेनेसीमध्ये एका माणसाचा गाडीचे बंपर बनविण्याचा उद्योग होता. वर्षभर बम्पर्स बनवून तो फोर्ड मोटार कंपनी या एकाच क्लायन्टला विकायचा. चांगला जम बसलेला, असा त्याचा हा जुना उद्योग होता.

एकदा अचानक फोर्ड मोटर कंपनीने ह्या माणसाचे बम्पर्स ' नापास' असा शेर मारून परत पाठवून दिले. कारण असं सांगितलं कि, ' गाडी तयार झाल्यानंतर जेव्हा स्प्रे पेंटिंग केलं जात. तेव्हा ह्या बम्पर्सवर रंग चिकटत नव्हता. बम्पर्सवरचा रंग निघून येत होता. "

फोर्ड मोटर कंपनी' सारख्या बड्या आणि एकुलत्या एक गिऱ्हाइकाला नाराज करणं, बंपर बनविणाऱ्या उद्योजकाला परवडण्यासारखा नव्हतं. तो हादरला. 'हा प्रॉब्लेम का झाला? आणि तो कसा सोडवायचा?' ह्या प्रश्नाची उत्तरं त्याला हवी होती. कोणीतरी त्याला सांगितलं, की 'सेंट लुइसमधील केमिर नावाची कंपनी अशा प्रकारचे प्रॉब्लेम सोडवते.' तेव्हा तो माझ्याकडे आला. त्याचे रिजेक्ट झालेले बंपर मी तपासणीसाठी मागून घेतले आणि प्रयोग सुरु केले. ह्या वेळी मी इन्फ्रा रेड स्पेकट्रोस्कोपीचा वापर केला. पुष्कळ प्रयत्न केल्यानंतर ' बम्पर्सवर रंग का चढत नाही? ' ह्या रहस्याचा उलगडा झाला.

गोष्ट अशी होती की हे प्लास्टिकचे बंपर बनविण्यासाठी दोन प्रकारची पॉलिमर्स एकत्र केली जायची. ठराविक तपमानापर्यंत ही पॉलिमर्स गरम करून वितळवायची. ती एकत्र केली की रिॲक्शन व्हायची आणि बंपरसाठी योग्य असं एक भक्कम कडक प्लास्टिक तयार व्हायचं.

रिजेक्ट झालेल्या बंपरच्या तपासात मला कळलं की ह्या बंपरमध्ये ही दोन पॉलिमर्स पाहिजे तितकी वितळली नव्हती. त्यामुळे रिॲक्शन नीट झाली नव्हती आणि ती नीट एकत्र मिसळलीही नव्हती. परिणाम म्हणजे तयार झालेलं प्लास्टिक काहीसं हलक्या प्रतीचं होतं आणि म्हणून त्यावर रंग नीट बसत नव्हता.

समस्येचं कारण कळलं, पण हे कारण कशामुळे उद्भवलं हेही समजायला हवं. तरच ती समस्या नष्ट करता येते. तेव्हा परत आणखी काही प्रयोग केले आणि आणखी थोडा तपास केला. मग समस्येचे मूळ समजलं. बम्पर्स बनवायच्या कारखान्यातलं तापमान मोजणारं यंत्र नीट काम करीत नव्हतं. योग्य ते तापमान तयार होण्याआधीच हे यंत्र जास्त तापमान दाखवायचं. त्यामुळे प्रत्यक्षात कमी तापमान असताना मिश्रण केलं जायचं आणि संपूर्ण उत्पादनाचा तोल बिघडायचा.

ह्या दोषी तापमान यंत्राची दुरुस्ती करून ते ठीक करण्यात आल्यावर बंपर्सची क्वालिटी परत पहिल्यासाखी झाली आणि फोर्ड कंपनीनंही त्याबाबत समाधान व्यक्त केलं.

बम्पर्सचा कारखाना परत एकदा सुरळीत चालू झाला. मात्र मध्यंतरी आलेलं वादळ घालवून लावलं, म्हणून हा उद्योजक कमालीचा खूष झाला. केमिरच्या इतिहासात एक मानाचं पान नोंदलं गेलं.

रसायनशास्त्राशी संबधित समस्या सोडवणं. हे केमिरचं काम. म्हणजे म्हणायला व्यवसाय. पण इथे कुठलंही ठरलेलं असं उत्पादन नाही. किंबहुना कामाचं स्वरूप, त्याला लागणारा वेळ, त्यासाठी होणारा खर्च ही कुठलीही गोष्ट ठरलेली नाही. काम आलं की अंदाज पंचे बजेट मांडायचं. आणि त्या नुसार क्लायंटला फी सांगायची. सुदैवाने चुकलेल्या

अंदाजापेक्षा बरोबर केलेल्या अंदाजाची संख्या जास्त झाली, म्हणून हा व्यवसाय यशस्वी झाला. असं म्हणायला हरकत नाही.

पण कधी कधी अंदाज चुकला आणि भूल भुलैयात हरवल्यासारखी स्थिती झाली. त्याचीही एक गोष्ट.

हे कामही एका औषध कंपनीचं होतं. त्यांच्या एका औषधी गोळयांमध्ये कॅल्शियम कार्बोनेट आणि इतर काही रसायनं होती. ह्या गोळयांना कसलाही वास नव्हता. पण एकदा असं झालं की कंपनीच्या स्टॉकमध्ये असलेल्या ह्या गोळयांना कसला तरी उग्र रसायनासारखा वास यायला लागला.

' हे असं का झालं? ह्या गोळया बनविताना काही चूक झाली का? की कुठल्या घटकात काही भेसळ होतं? ' प्रश्नांची उत्तरं शोधण्यासाठी ही कंपनी आमच्याकडे आली. मला हा प्रॉब्लेम फारसा अवघड किंवा गुंतागुंतीचा वाटला नाही. त्यामुळे मी त्यांना अगदी बेताची फी सांगितली. प्रयोगशाळेत तपास सुरु झाला. ह्यावेळी मी गॅस क्रोमॅटोग्राफी ही पद्धत वापरली. माझ्या अंदाजाने चार पाच तासात प्रॉब्लेम सुटायला हवा होता.

प्रत्यक्षात चार दिवस झाले. वास न येणाऱ्या आणि वास येणाऱ्या गोळयांच्या रासायनिक पृथक्करणात काहीच फरक सापडेना. आम्ही वेगवेगळया प्रकारांनी झटतोय, झगडतोय, पण उत्तर मिळेना.

चार दिवसांचे चार आठवडे झाले, सर्व बाजूनी सर्व प्रकारे तपास करून झालं. तेव्हा आम्ही एकाच निष्कर्षापर्यंत आलो, की 'वास येणाऱ्या गोळयांचा प्रॉब्लेम रासायनिक नक्की नाही. तो कदाचित बायोलॉजीकल (जीवशास्त्रातला ) असू शकेलं.

त्यावर उपाय म्हणजे बायालॉजीकल टेस्टिंग करून पाहणे. पण ती उपकरणं आमच्या प्रयोगशाळेत नव्हती. तेव्हा मी बायालॉजीकाल टेस्टिंग करणाऱ्या दुसऱ्या प्रयोगशाळेत गेलो. म्हणजे आता मी गिऱ्हाइक बनलो, आणि माझा प्रॉब्लेम त्यांच्याकडे सोपवला.

माझी अटकळ खरी ठरली. वास येणाऱ्या गोळयांमध्ये काही सूक्ष्म जंतू तयार झाले होते आणि जरी ह्या गोळयामध्ये रासायनिक घटक योग्य होते तरी ह्या जंतूंमुळे गोळयांना उग्र वास येत होता.

चार तासात उरकेल, असं वाटलेलं काम एक महिन्यांनी पूर्ण झालं. पण शेवटी मी कारण शोधून काढलं. गिऱ्हाइकाचा प्रश्न सोडवला आणि गिऱ्हाइकाचा विश्वास कमावला. ह्या गोष्टी महत्वाच्या होत्या.

' हे काम आम्हाला जमणार नाही' असं सांगून गिऱ्हाइकाचा विश्वास गमावला नाही, हे मोठं समाधान ह्या कामाने दिलं. वेळ वाया गेला किवा कमाई झाली नाही. ह्या गोष्टी समाधानापुढे अगदीच नगण्य होत्या.

चांगला बिझिनेस करण्यासाठी मी जो विचार केला, जे नियम ठरवले, जी मूल्यं आखून घेतली ती योग्य असावीत. कारण दोन वर्षातच कंपनीची जागा जशी तिप्पट मोठी झाली, तसाच कंपनीचा टर्नओव्हर आणि प्रॉफीटही दरवर्षी मोठ्या प्रमाणात वाढत गेला.

जागा वाढली, त्या बरोबर काम करणारी माणसंही वाढली. ऑफिसमध्ये आणि लॅबमध्ये मी गरजे नुसार वेळोवेळी, उत्तम काम करणाऱ्या लोकांची भरती करत गेलो. पण पाच वर्ष झाली, तरी कंपनीचा सेल्स पर्सन मी एकटाच होतो. ही एवढी मोठी जबाबदारी एकट्याने सांभाळताना माझी जी काही तारांबळ व्हायची ती विचारायला नको.

ह्या पाच वर्षात मी एक मिनिटही फोनपासून दूर झालो नाही. होणं शक्यच नव्हतं. कारण मी कुठेही असलो, तरी कुठल्याही क्षणी माझा फोन वाजायचा. त्यावेळी आजच्या एवढी कम्युनिकेशनची आधुनिक यंत्रणा नव्हती. पण ऑफिसमधल्या सेक्रेटरीला मी शिकवून ठेवलं होतं, की "मी ऑफिसमध्ये नसताना कोणाचाही फोन आला, तर तो ताबडतोब माझ्या सेल फोनला जोडून द्यायचा. ' डॉ. ठाणेदार ऑफिसमध्ये नाहीत. ' किंवा ' मिटिंगमध्ये आहेत' किंवा आता भेटू शकणार नाहीत' असं कधीही सांगायचं नाही." मी कुठेही असलो आणि कुठच्याही कामात असलो, तरी मी फोन उचलणार एवढं नक्की!

त्यामुळे ऑफिसमध्ये फोन आला आणि मी ऑफिसमध्ये नसलो, तरी फोनवर, डॉ. ठाणेदारांशी बोलू इच्छिणाऱ्या माणसाला, सेक्रेटरी म्हणायची, " डॉ. ठाणेदारांशी बोलायचं आहे का? एक सेकंद थांबा. " आणि खरोखरच ती एका सेकंदात तो फोन माझ्या सेल फोनला जोडून द्यायची. गिऱ्हाइकाला वाटायचं आपण ऑफिसमध्ये बसलेल्या डॉ. ठाणेदारांशी बोलतो आहोत, प्रत्येक्षात मी कुठे कुठे असताना फोन उचलला आहे हे पाहण्या सारखं आहे.

ड्रायव्हिंग करताना, शॉवर खाली आंघोळ करताना, मुलाची नॅपी बदलताना, दुसऱ्या एखाद्या मिटिंगमध्ये असताना, कधीही कुठेही! ड्रायव्हिंग करत असेन, तर गाडी बाजूला घेऊन उभी करायची आणि बोलायचं. शॉवर खाली असलो तरी फोन वाजला की पटकन टॉवेल गुंडाळून बाहेर यायचं आणि अर्धा अर्धा तास कस्टमरशी बोलत राहायचं. एकदा मुलांना घेऊन बाहेर गेलो होतो आणि धाकटा तान्हा मुलगा समीर ह्याचा डायपर बदलायची वेळ आली रेस्टरूममध्ये त्याचा डायपर बदलताना फोन वाजला.

" हॅलो, डॉक्टर ठाणेदार,? मी अमुक तमुक कंपनीचा रिसर्च डिरेक्टर बोलतो आहे. आमच्या इथे एक फार मोठा प्रॉब्लेम आला आहे. "

मग समीरचा डायपर बदलताना, माझी ह्या रिसर्च डिरेक्टरबरोबर अत्यंत गुंतागुंतीची शास्त्रीय चर्चा!

बायको मुलांबरोबर, सुट्टीसाठी हजार बाराशे मैल दूर, कुठे तरी मजा करत असतानाही फोन वाजला की मी तो घेणार आणि गिऱ्हाइकाचं म्हणणं ऐकून त्याला दिलासा देणार.

मी गिऱ्हाइकं जोडली आणि राखून ठेवली. त्याचं एक मोठं कारण म्हणजे, त्यांचं म्हणणं ऐकून घ्यायला, त्यांची सेवा करायला मी अक्षरशः चोवीस तास फोनवर उपलब्ध असायचो. फोनवरच्या बोलण्यातूनच गिऱ्हाइकाला विश्वास वाटायला लागायचा आणि प्रत्यक्ष काम झालं की गिऱ्हाइक कायमचं जोडलं जायचं.

लहान बाळांसाठी तयार अन्न बनविणारी गर्बर नावाची एक मोठी प्रसिद्ध कंपनी होती. तऱ्हेतऱ्हेची  फळं, भाज्या, तांदूळ, गहू, अशी धान्य किंवा इतर पौष्टिक पदार्थ वापरून ही कंपनी बाळांसाठी योग्य असं अन्न बनवायची आणि काचेच्या हवाबंद बाटल्या मधून ते विकायची. वर्षानुवर्ष हीच पध्दत ते वापरत होते.

पण आता ह्या गर्बर कंपनीला असं वाटायला लागलं की काचेच्या बाटल्याऐवजी आपण प्लास्टिक बाटल्या वापरल्या तर? एकतर किमतीत फरक असल्याने खूप पैसे वाचतील आणि हाताळण्याच्या दृष्टीनेही प्लास्टिकची बाटली सर्व अर्थाने, सर्वांसाठी योग्य! म्हणजे तुटण्याफुटण्याने नुकसान होण्याची भीती नाही. अगदी लहान बाळाच्या हातातही प्लास्टिकची बाटली असली, तरी त्याला इजा होणार नाही.

पण कल्पना कितीही चांगली वाटली, तरी असं मनात आल्याबरोबर पॅकिंग बदलता येत नाही. 'खाण्याच्या  ह्या विशिष्ट पदार्थासाठी हे पॅकिंग योग्य आहे किंवा नाही' ह्या बाबतीत फूड ॲन्ड ड्रग असोसिअशनकडून प्रमाण पत्र मिळवावं लागतं.

ह्या कामाची पहिली पायरी म्हणून गर्बर कंपनी माझ्याकडे आली. बेबी फूडसाठी योग्य अशी प्लास्टिकची बाटली शोधण्याचं काम तिनं माझ्यावर सोपवलं.

मी प्लास्टिकच्या बाटल्यांचे उत्पादन करणाऱ्या तीनचार कंपन्यांशी बोलणी केली आणि त्यांनी पाठवलेल्या बाटल्या बेबी फूडसाठी योग्य आहेत का, ही तपासणी करायला लागलो.

वरवर पाहता हे काम सोपं वाटलं. पण ह्या तपासासाठी आम्ही तब्बल दीड महिना वेगवेगळे प्रयोग केले. शेवटी गर्बर कंपनी बनवत असलेल्या बाळांच्या अन्नासाठी सुयोग्य अशी प्लास्टिकची बाटली मी निश्चित केली आणि एफडीए म्हणजे ' फूड ॲन्ड ड्रग ॲडमिनिस्ट्रेशनने माझ्या निवडीला मान्यताही दिली.

माझ्या ह्या कामाची फी होती दीड लाख डॉलर्स! मी खुश झालो कारण माझ्यासाठी हा आकडा फार महत्वाचा होता. क्रेव्हर बाईकडून मी केमिर कंपनी विकत घेतली, तेव्हा कंपनीच्या वर्षाच्या विक्रीचा आकडा होता दीड लाख डॉलर्स! आज केवळ पाच वर्षांनंतर मी दीड महिन्यात दीड लाख डॉलर्स मिळवले होते. मी योग्य दिशेने चाललो आहे. ह्याची गर्बरच्या कामामुळे परत एकदा खात्री पटली.

एका बाजूला कंपनीची वाढ होते आहे, हे समाधान होतं. पण त्याच वेळी आपलं आयुष्य अगदी विस्कळीत झालं आहे. अशी काहीतरी विचित्र भावना टोचत असायची. हातातला सेल फोन वाजावा असंही वाटायचं. पण तो सतत वाजत राहिला की त्याचा गळा आवळायचा मोह व्हायचा. 'आहे मनोहर तरी गमते उदास' अशी परिस्थिती. काहीतरी चमत्कारिक अशी कोंडी,

जेव्हा जेव्हा आजच्या अर्जुनाची मनःस्थिती द्विधा होते, तो गोंधळात पडतो, तेव्हा तेव्हा तो चक्रधारी कृष्ण त्याला कुठल्या न कुठल्या रूपांत भेटतो. त्याला योग्य तो मार्ग दाखवतो, असा माझा विश्वास आहे. निदान मला तरी तो भेटला, डॅन सुलेव्हानच्या रूपाने.

मी एका सेमिनारला गेलो होतो. नेहमीप्रमाणे तिथे भाषण, चर्चा, परिसंवादांची झुंबड उडाली होती. माझं कशातच फारसं मन नव्हतं आणि अचानक डॅन सुलेव्हानचे शब्द माझ्या कानावर पडले.

" तुमचा बिझिनेस, हा जर वन मॅन शो असेल, तर तो कधीही वाढणार नाही. "

मी दचकलो, ' हा मला उद्देशून बोलत तर नाही ना? '

मी जागच्या जागी खिळून उभा राहिलो. डॅन सुलेव्हानचा एक एक शब्द कानावर पडत होता आणि माझ्या डोक्यातली जळमटं निघून जात होती. त्याचा प्रत्येक शब्द खरा होता. व्यवहारी शहाणपणा शिकवणारा होता. आत्मपरीक्षण करायला लावणारा होता. बिझिनेस कन्सलटंट, डॅन सुलेव्हान सांगत होता.

' बऱ्याचशा बिझिनेसमेनचा  असा गैरसमज असतो कि, ' आपल्या बिझनेसमधलं प्रत्येक काम मीच सर्वात उत्तम रीतीने करतो. ' त्यामुळे तो काय करतो? तर सर्वच गोष्टी तो स्वतः करायला जातो. म्हणजे झाडूही तोच मारतो, पोस्टर्सही तोच चिकटवतो, फोन तो स्वतःच अटेंड करतो. वगैरे वगैरे. त्यामुळे तो दिवसाचे बारा, चौदा नव्हे तर वीस वीस तास बिझी राहतो.

पण यशस्वी बिझनेसमन व्हायचं असेल तर नेमक्या  ह्याचा गोष्टी टाळायला हव्यात. तुम्ही दिवसाचे किती तास काम करता, ह्यापेक्षा दिवसाचे किती तास तुम्ही मोकळे असता, महिन्याचे किती दिवस तुम्ही काम करत नाही, ह्यावर तुमच्या बिझिनेसची वाढ अवलंबून असते. हे तुम्हाला नक्की जमेल, पण त्यासाठी 'मीच प्रत्येक काम चांगलं करू शकतो' हा भ्रम दूर करायला हवा. ज्या गोष्टी आपल्यापेक्षा दुसरा कोणीतरी जास्त चांगल्या करतो, त्या गोष्टी दुसऱ्यावर सोपवायला हव्यात. अशी माणसं शोधून त्यांच्यावर जेव्हा तुम्ही जबाबदारी सोपवाल, तेव्हाच तुमचा बिझिनेस वाढेल."

डॅन सुलेव्हाननं नंतर  बिझिनेसमनच्या मोकळया वेळाबद्दल तीन गोष्टी सांगितल्या. तो म्हणाला, ' महिन्यातले काही दिवस तुम्ही चक्क ' हे फ्री डेज  किंवा मोकळे दिवस आहेत' असं समजायचं. त्या दिवसांमध्ये तुम्ही बिझिनेसचं काहीही काम करायचं नाही. महिन्यातल्या काही दिवसांना तुम्ही ' बफर डेज ' असं नाव द्या. म्हणजे ह्या दिवशी तुम्ही बिझिनेसचं थोडसं काम करा. पण बाकीचा दिवस एखादा छंद पुरवण्यासाठी, समाज कार्य करण्यासाठी किंवा एखादी हौस पुरवण्यासाठी ठेवा. आणि महिन्यातले काही दिवस तुम्ही राखून ठेवा. त्यांना ' फोकस डेज ' असं नाव द्या. ह्या दिवसांमध्ये तुम्ही पूर्ण शक्तीनिशी बिझिनेसची कामं करा. पहा, ह्यामुळे तुमच्या बिझीनेसची किती भरभराट होते? आणि तुम्हीही किती सुखी, समाधानी माणूस बनता!"

डॅन सुलेव्हानच्या भाषणानंतर मी घरी आलो, ते एका भारलेल्या अवस्थेत! त्याच्या चार शब्दामुळे माझं संपूर्ण जग उलट पालट झालं होतं.

“Shri, you must write such inspiring book in English for the benefit of the youth of United States of America

Bill Clinton



प्रे.बिल क्लिंटन आणि
प्रे. बराक ओबामा
यांचेसमवेत घालवलेले क्षण.







१९९६ साल सुरु झालं आणि मी ठरवलं, ' नव्या वर्षात आपण डॅन सुलेव्हानचा सल्ला अमलात आणायचा. '

आतापर्यंत सेल्स, कस्टमर केअर, पब्लिक रिलेशन्स किंवा ह्या संदर्भात मोडणारी सर्व कामं मी एकटाच करीत होतो. आता प्रथमच ह्या जबाबदाऱ्या मी दुसऱ्यावर सोपवायच्या, असं ठरवलं. कंपनीचा सर्व डोलारा, हा प्रयोग आणि संशोधनावर अवलंबून असल्याने मला असं, वाटलं की कस्टमरशी किंवा बाहेरच्या लोकांशी बोलणारा माणूसही शास्त्रज्ञच हवा. माझ्यासारखा. त्यामुळे आमच्याच कंपनीत कामं करणाऱ्या तीन शास्त्रज्ञांवर मी ही जबाबदारी सोपवली. तेही उत्साहाने तयार झाले. बेंगरूळ असे लॅब कोट घालून दिवस रात्र प्रयोगशाळेत रसायनाची गाठ असलेलं कामं करण्यापेक्षा छान सूट बूट घालून लोकांशी बोलायचं काम त्यांना सोपं आणि सुखकर वाटलं. तिघांनीही आपल्यावर सोपविलेली ही नवी जबाबदारी सांभाळायचा मनापसून प्रयत्न केला. पण थोड्याच दिवसात त्यांच्या लक्षात आलं की प्रयोगशाळेतल्या संशोधनापेक्षा कस्टमर्सशी बोलणं फार कठीण आहे. आणि मग एक एक करीत ते तिघेही कंपनी सोडून गेले.

म्हणजे माझा प्रॉब्लेम तर सुटला नाहीच. उलट माझी प्रयोगशाळेतली तीन चांगली माणसं मी गमावून बसलो. पण मी धीर सोडला नाही. डॅन सुलेव्हानवर माझा विश्वास होता.

मी प्रयत्न चालू ठेवला. सेल्सची माझी जबाबदारी उचलतील, अशी माणसं शोधत राहिलो. अशी दोन माणसं मला लवकरच मिळाली. व्हान्स ल्योन आणि फ्रेड विलर्ड. दोघंही पीएचडी मिळवलेले शास्त्रज्ञ होते. आणि दोघानाही बोलण्याची, लोकांशी सुसंवाद साधण्याची उत्तम कला होती.

त्यांनी माझं काम पहायला सुरुवात केली. माझं त्यांच्या कामावर बारीक लक्ष होतं. थोड्याच दिवसात माझ्या लक्षात आलं की लोकांशी सुसंवाद साधण्याच्या बाबतीत हे दोघं माझ्यापेक्षा कितीतरी पटीनं सरस आहेत.

स्वतःविषयीचा माझा गैरसमज दूर झाला. महत्वाची गोष्ट म्हणजे खूप मोकळं मोकळं वाटलं. बिझिनेस सुरु केल्यापासून, सहा वर्षांनी प्रथमच, ही मोकळेपणाची भावना मला अनुभवायला मिळाली.

आता मी बिझिनेस वाढविण्याचा विचार करायला लागलो. ' केमिर सारखीच आणखी एखादी कंपनी विकत घेऊ या. ' असं मी ठरवायला आणि तशा एका कंपनीची माहिती मिळायला एक गाठ पडली. कधी कधी योगायोग जुळून येतो. तो हा असा.

मिनेसोटामधल्या सेंट पॉल ह्या गावातील बीटेक नावाची एक कंपनी होती. कंपनीचे मालक स्टीव्ह मॉरिसन ६५ वर्षाचे झाले होते. आणि त्यांना एक हार्ट अटॅक आला होता. ते कंपनी विकण्याच्या विचारात होते.

मला ही माहिती कळल्या बरोबर मी त्यांना फोन केला. कंपनी विकत घेण्याची तयारी दाखवली आणि काही दिवसातच ही कंपनी विकत घेतली. सर्व काही झट की पट!

कंपनी घेतानाच मी तिथे कामं करणाऱ्या लोकांना सांगितलं की " एक वर्षात ही कंपनी मी सेंट लुइसला हलवणार आहे. " काही लोक सोडून गेले, तर काही लोक सेंट लुइसला यायला तयार झाले. सगळ्यात महत्वाची गोष्ट म्हणजे ह्या कंपनीचे सर्व कस्टमर मात्र कायम राहिले. कंपनी सेंट लुइसला गेली, तरी त्यांना फरक पडणार नव्हता.

१९९६ सालच्या सप्टेंबर महिन्यातील शेवटच्या आठवड्यातील एक संध्याकाळ. त्या दिवशी मी थोडा लवकर घरी आलो. मुलांना घरी यायला अवकाश होता. हॉस्पिटल मधून येताना श्यामल त्यांना शाळेतून पिकअप करणार होती.

मी चहा करून घेतला. फ़ॅमिली रूममधल्या डायनिंग टेबलपाशी बसून मी चहा प्यायला लागलो. घरातला शांत निवांतपणा खूप सुखाचा वाटत होता. भिंतीच्या पूर्ण उंचीच्या काचांमधून दिसणारं हिरवगार लॉन आणि पाठीमागची हिरवीगार टेकडी नजरेला थंडावा देत होती.

ह्या हिरवाइवर दृष्टी खिळली आणि मी विचार करायला लागलो,

" किती सुखात आहोत आपण? आपलीच आपल्याला दृष्ट लागेल. बिझिनेस मनासारखं आकार घेतो आहे. श्यामलनं डॉक्टर म्हणून नाव लौकिक मिळवला आहे. आपला आनंदाचा ठेवा अधिकच श्रीमंत करणारी आपली दोन गुणी लाघवी मुलं!

ह्या मुलांना हाता खांद्यावंर वाढविण्याचा, खेळवण्याचा नितांत सुखदायी अनुभव आपण घेतला आणि आता दुनियेतलं पैशांनी खरेदी करता येणारं कोणतंही सुख आपण त्यांना देऊ शकतो, हे समाधानही पुरून उरणारं आहे.

दोनच वर्षापूर्वी  हे सुंदर भलं मोठं घर घेतलं. घर, बाहेर स्विमिंग पूल, घराला वेढणारं सुरेखसं लॉन आणि सभोवतालची भरगच्च हिरवाई.

## सेंट लुईसमधील घर



ह्या घरातल्या हॉलमध्ये किती पार्ट्या झाल्या, मुलांचे वाढदिवस आणि इतर उत्सव थाटामाटात साजरे झाले आणि गावातल्या तमाम मराठी मंडळीना बोलावून 'मिश्किली'सारखे, भारतातून आलेले सांकृतिक कार्यक्रमही पार पाडले.

नाही म्हटलं, तरी जमलेल्या काही लोकांच्या डोळयातून असूया टपकलेली आपल्याला स्वच्छ जाणवली आणि त्यांचंही चूक काय आहे? ह्या गावात, एका छोट्याशा भाड्याच्या अपार्टमेंटमध्ये आपल्या संसाराला सुरुवात झाली. दहा वर्षात स्वतःचं घर घेणं, एक नवी, एक जुनी गाडी असणं समजू शकतं. नव्हे, तेवढंच असावं! पण हे एवढं मोठं श्रीमंती थाटाचं घर घेणं, दारात मर्सिडीज लेक्सेससारख्या गाड्या मिरवणं, फ़ॅमिलीला घेऊन सुट्टीत दोनदोन महिने जगभर भटकणं, शोभतं का आपल्यासारख्या मराठी माणसाला?

मी हसत हसत थर्मासमधला अजून एक कप चहा ओतून घेतला. बाहेरच्या वातावरणात आता अचानक फरक झाला होता. आभाळ काळवंडलं होतं. सोसाट्याचा वारा सुटला होता. कुठच्याही क्षणाला पाऊस कोसळायला लागेलं, अशी लक्षणं होती.

मला आठवला, क्रुझवर असताना पाहिलेला समुद्राचा तुफानी पाऊस! ह्या वर्षी उन्हाळयाच्या सुट्टीत प्रथमच आम्ही मुलांना घेऊन एका अलिशान बोटीवरून सफारीला गेलो होतो. बहामा, नासा, अशा ठिकाणी जाऊन आम्ही परत आलो. पण येण्याच्या आदल्या रात्री अचानक बोटीला तुफानानी घेरलं. निसर्गाचं ते रौद्र रूप सुंदर होतं. आणि भयकारी. नजर पोचेल तिकडे, वरखाली सर्वकडे पाणीच पाणी! वरून पावसाचं पाणी आणि चोहोबाजूंनी खवळलेलं समुद्राचं पाणी. जेमतेम अर्धा तास चाललेलं निसर्गाचं भीषण सुंदर असं नाटक. आयुष्यात कधीही विसरता येणार नाही, इतकं प्रभावी!

आता स्वतःच्या उबदार घरात बसून, चहाचे घुटके घेताना, ह्या नाटकाची आठवण रम्य वाटत होती. पण केवळ ही क्रूझच नव्हे. तर ह्या उन्हाळयाच्या सुट्टीतला प्रत्येक क्षण आम्ही चौघांनी आनंदात घालवला होता. श्यामल मराठी बोलायची, पण खरं म्हणजे ती

कोकणी. ह्या उन्हाळयाच्या सुट्टीत न्यू जर्सीला भरलेल्या एका कोकणी अधिवेशनाला ती जाऊन आली. बरेच वर्षांनी मनसोक्त कोकणी बोलायला मिळालं, कोकणी लोकांची भेट झाली, म्हणून अगदी खुशीत होती.

ह्याच सुट्टीत आम्ही भारताची एक ट्रिप केली, डिस्नेवर्ल्डला भेट दिली आणि चार जुलै हा अमेरिकेचा वाढदिवस साजरा करायला, वॉशिंग्टनला गेलो. राजधानीतला स्वातंत्र्यदिनाचा सोहळा पाहणं, हा एक थरारक अनुभव होता, आकाशात उडणारी प्रकाशाची कारंजी आणि सप्तरंगी दारूकाम. एकूणच जल्लोष आणि धमाल चालली होती. वॉशिंग्टन मॉन्यूमेंटच्या आसपासच्या विस्तीर्ण गवतावर बसायचं, गप्पा मारायच्या आणि मनात आलं, की इकडे तिकडे हिंडायचं. डोक्यावर कसली काळजी नाही. घड्याळाची घाई नाही, कसलंही काम करायचं नाही. हे तीन महिने कसे गेले, केव्हा संपले कळलंच नाही. इतकी मजा आम्ही ह्या पूर्वी कधीच केली नव्हती.

बाहेर आता धुवांधार पाऊस सुरु झाला होता. मुलांची आणि श्यामलची वाट पाहत मी फ़ॅमिली रूम मधल्या कोचावर आडवा झालो, घरातले दिवे मुद्दामच लावले नाहीत. बाहेर अंधार होता. घरातही अंधार होता, कोसळणारा पाऊस काचेतून पाहताना निसर्गाशी एकरूप झाल्यासारखं वाटत होतं. मधेच एकदा वीज कडाडली, लॉनवर प्रकाशाची शेकडो फूलं उधळली गेली.

मला आठवली नीलची मुंज! केवळ महिन्याभरापूर्वी, आम्ही नीलची मुंज मोठ्या थाटामाटात साजरी केली होती.

लॉनवर खूप सुंदर मोठा मांडव टाकला होता. मांडवभर पसरलेली सुरेख सजविलेली टेबल्स, टेबलावर ताज्या फुलांचे शोभिवंत गुच्छ! दारात शहनाई वाजत होती. शंभर दीडशे लोक आले होते. शिकागोहून आलेल्या करंदीकर ह्या उपाध्याय गुरुजींनी मुंजीचे सर्व विधी शास्त्रशुद्ध रीतीने साग्र संगीत पार पाडले. मुंजीनंतर जेवण आणि जेवणानंतर गाण्याचा कार्यक्रम. मुंबईहून आलेली कलाकार मंडळी, रंजना पेठे, आणि मुकुंद फणसळकर ह्यांनी आलेल्या मंडळींना मराठमोळया गाण्यांची मेजवानी दिली.

रात्रीच्या वेळी हे संपूर्ण लॉन दिव्यांनी झगमगत होतं, आणि स्विमिंग पूलमध्ये सोडलेल्या तरंगत्या मेणबत्यांमुळे एकूणच वातावरणाला परीकथेचं स्वरूप आलं होतं.

त्या दिवशी श्यामलनं हिरवीगार गर्भ रेशमी नऊवारी पैठणी नेसली होती. तिने कपाळावर चंद्रकोर रेखलेली होती. अत्यंत आनंदाचा, कौतुकाचा असा तो सोहळा संपला, तेव्हा रात्री मी श्यामलला विचारलं होतं,

" आपलं सर्व किती छान चाललं आहे, नाही श्यामल? "

ती काहीच न बोलत किंचित हसली फक्त! क्षणभर, क्षणभरच मला असं वाटलं, 'तिच्या हसऱ्या चेहऱ्याआड काहीतरी गूढ असं सावट दडलेलं आहे. "

पण मला ह्या क्षणी ते पहायचं नव्हतं. ' आपल्याला काहीतरी भास झाला, ' असं मीच स्वतःला बजावलं.



श्यामल नील ला मुंजीच्यावेळी मातृभोजन बरवताना

शनिवार १२ ऑक्टोबर, १९९६

नीलच्या मुंजीच्या वेळी इन्नी येऊ शकली नव्हती. आता ती रवी (माझा धाकटा भाऊ) बरोबर आली. रवी अमेरिकेत आमच्या घरी पहिल्यांदाच येत होता. मी शनिवार रवीवार जोडून दोनचार दिवस सुट्टी घेतली होती आणि रवीला कुठे हिंडवावं, असे आमचे बेत सुरु होते.

श्यामल आज सकाळपासून बेचैन वाटत होती. तिचं काय बिनसलं आहे, कळत नव्हतं. मी तिला विचारलं पण ती नीट काही बोलली नाही. उलट त्रागा केला.

इन्नी आणि रवी देखत बोलणं वाढू नये, बोलाचाली होऊ नये, म्हणून मी गप्प बसलो.

दुपारच्या सुमारास कोणाला काही न सांगता श्यामल घराबाहेर पडली आणि गाडीत बसून निघून गेली, मला काळजी वाटली, पण बोलणार कोणाशी?

डोक्यात विचार चक्र चालू होतं. ' श्यामलचा नक्की प्रॉब्लेम काय आहे? तसं पाहिलं तर ती स्वभावाने चांगली आहे. अत्यंत साधी. सरळ आहे. कष्टाळू आहे, प्रामाणिक आहे, स्वभावदोष म्हणावं तर एकच, ती खूप विचार करते. छोट्या छोट्या गोष्टीची नको इतकी चिकित्सा करते, आणि स्वतःलाच बोल लावून घेते. अधून मधून निराशेनं खचलेली वाटते. असं का? सगळं इतकं छान चाललं आहे की तिनं स्वतःवर आणि जगावर खुश असायला हवं. पण ती नाराज वाटते, स्वतःवर आणि जगावरही! ह्याचं कारण काय? आणि मुख्य म्हणजे ह्या बाबतीत मी नक्की काय करायचं?

प्रश्नांना उत्तरं शोधण हा माझा व्यवसाय. पण ह्या प्रश्नावर माझ्याकडे उत्तरं नव्हती.

मंगळवार, १५ ऑक्टोबर १९९६

सकाळी समीर आणि नीलला सोडून श्यामल हॉस्पिटलला गेली. सर्वसाधारणपणे ती संध्याकाळी साडेचारपर्यंत घरी यायची. पण आज पाच वाजून गेले, तरी तिचा पत्ता नाही. मुलांना शाळेतून आणलं. संध्याकाळचे सहा वाजले होते. श्यामल अजूनही घरी आलेली नाही. शेवटी मी तिच्या सेल फोनवर फोन केला. तिनं फोन उचलला. मी काळजीच्या सुरत विचारलं, " श्यामल, कुठे आहेस तू"?

तिचा उदास असा स्वर कानावर पडला. " मी ड्रायव्हिंग करते आहे. "

" ड्रायव्हिंग? इतका वेळ? की हॉस्पिटल मधून निघायला उशीर झाला? "

" नाही, हॉस्पिटल मधून वेळवरच निघाले, पण मनःस्थिती ठीक नाहीये. म्हणून ड्रायव्हिंग करत एक मोठी चक्कर मारायला निघाले. "

मी म्हणालो, " मनःस्थिती ठीक नाहीये, तर घरी ये, श्यामल मुलं घरी आली आहेत, आम्ही तुझी वाट पाहतो आहोतं. "

ती क्षणभर काहीच बोलली नाही, मग म्हणाली, " ठीक आहे, येते. "

मी फोन बंद केला, वातावणात चमत्कारिक ताण, परत एकदा शनिवारचीच परिस्थिती. पण त्या दिवशी ती तासाभरानं घरी परत आली होती.

त्यामुळे आजही ती थोड्या वेळाने घरी येईल अशा आशेने मी वाट पाहत राहिलो.

दीड तास होवून गेला, मी घाबरलो, परत एकदा तिचा सेल फोन नंबर फिरवला.

" श्यामल, अगं आम्ही सगळे काळजी करतो आहोतं, कुठे आहेस तू? "

"मी अजूनही ड्रायव्हिंग करते आहे. लेकच्या दिशेने निघाले आहे. तिथे जाऊन मी लेकमध्ये उडी मारून जीव देणार आहे. "

माझ्या पायाखालची जमीन निसटली. मी जे ऐकलं, त्यावर विश्वास बसेना. ती असं का करते आहे हेही समजेना.

फक्त ही वेळ विचार करण्याची नव्हती. कृतीची होती. हातातला टेलिफोन ही लाईफ लाईन आहे, अशा आकांताने मी श्यामलशी बोलत राहिलो.

" तू असं खुळयासारखा विचार करू नको. तुला काय खुपत आहे, ते बोल, मोकळेपणानी बोल, पण आधी घरी ये. "

ती सारखी म्हणत होती, " माझी कोणाला जरूर नाहीये. उलट माझ्या वागण्याचा सर्वांना त्रास होतो." वगैरे.

आम्ही नक्की काय बोललो, सर्व लक्षात नाही, माझा एवढाच आटापिटा होता की तिनं आपला निर्णय बदलावा, गाडी वळवावी आणि परत यावं.

जवळ जवळ तासभर मी तिच्याशी बोलत होतो. तेवढा वेळ ती ड्रायव्हिंग करीत होती. शेवटी ती जेव्हा म्हणाली, " ठीक आहे, मी येते घरी. " तेव्हाच मी फोन खाली ठेवला.

तरीही ती येईल अशी खात्री नव्हती आणि ती आलेली पाहिल्याशिवाय जीवाला चैन नव्हती. दीड तास गेला.

शेवटी एकदाची रात्री साडेनऊ वाजता ती आली, कोणाशी काही न बोलता बेडरूममध्ये निघून गेली.

ती आली, ह्यामुळे जीव इतका भांड्यात पडला होता, की तिचा मूड ठीक नाही हे दिसत होतं, तरी त्या क्षणाला ती गोष्ट फारशी महत्वाची वाटली नाही.

मला तिच्याशी बोलायचं होतं. पण त्या आधी मी मुंबईला फोन केला, तिच्या आई बाबांशी बोललो. तिच्या गेल्या काही दिवसातल्या मनःस्थितीबद्दल, चमत्कारिक वागण्याबद्दल त्यांना सर्व सविस्तर सांगितलं. त्यांना म्हटलं, ' गेले चार साडेचार तास ती ड्रायव्हिंग करीत होती, आताच घरी आली आहे. तर तुम्ही तिच्याशी बोलाल का? तिला जरा समजवाल का? तिचे वडील म्हणाले " अहो, हा तुम्हा नवरा बायकोचा प्रश्न आहे, आम्ही काय करणार!" पण मी तिच्या आईला विनंती केली, त्या श्यामलशी बोलायला तयार झाल्या.

त्या दोघींचं काय बोलणं झालं. मला कळलं नाही, पण त्यांनी तिची समजूत काढली असावी.

बुधवार, १६ ऑक्टोबर. १९९६

रात्री एखादा वादळ येऊन जावं आणि सकाळी त्याचा मागमूसही उरू नये, तशी ही बुधवारची सकाळ.

श्यामल अगदी शांत होती. मी तिच्याशी कालच्या प्रकारबद्दल बोललो. तर ती म्हणाली, " मला आता काही प्रॉब्लेम नाही. "

मला बरं वाटलं, पण खरी गोष्ट अशी होती कि, आत्महत्या करण्याचा निर्णय तिनं घेतला होता. आता तिच्या मनात कुठलाही गोंधळ नव्हता. तिचा प्रॉब्लेम तिनं सोडवला होता. म्हणून ती शांत होती.

हे मला फार उशिरा कळलं. श्यामल गेल्यानंतर मी आत्महत्या, त्या मागची कारण, त्या माणसाची मनःस्थिती ह्याचा खूप अभ्यास केला. तेव्हा तिच्या एकेका बोलण्याचे किंवा वागण्याचे अर्थ माझ्या लक्षात आले.

ती बरेचदा म्हणायची. ' अजून काही वर्षांनी मी नसणार आहे, पण तू मुलांची चांगली काळजी घेशील, मला काही चिंता नाही. '

कधी कधी तिच्या डोक्यात यायचं.

' मी जेनेटिक्समध्ये परत एकदा पोस्टग्रॅज्युएशन करणार आहे. '

मी तिला म्हणत असे, ' अगं, तुला आणखी अभ्यास करायचा आहे. तर तुझ्या विषयाचा, न्युरॉलॉजीचा कर की! हे जेनेटिक्सचं अभ्यासाचं खूळ काय आहे? '

ह्यावर ती काहीच बोलायची नाही.

पण तिच्या चेहऱ्यावर एक गूढ भाव उमटायचा. आता वाटतं, बारा वर्ष आम्ही एकत्र संसार केला, पण हे 'श्यामल ' नावाचं कोडं मला कधीच उलगडलं नाही.

आणि जेव्हा ते उलगडण्याचा मी प्रयत्न केला, तेव्हा वेळ निघून गेली होती. !

गुरुवार, १७ ऑक्टोबर १९९६

नेहमीच्या इतर कुठल्या दिवसासारखा सुरु झालेला हा एक दिवस!

हा संपला तेव्हा मात्र आमची सर्वांची आयुष्य नेहमीसारखी राहिली नाहीत.

श्यामलन ऍंटिड्रिपेसंट गोळयांचा ओव्हर डोस घेऊन आपलं आयुष्य संपवलं होतं!

एका क्षणात माझा संसार संपला होतं. एका क्षणात माझ्यावर दोन लहान मुलांचा एकुलता एक पालक, ही अवघड जबाबदारी येऊन पडली होती.

ह्या एका दिवसाने माझं संपूर्ण आयुष्य दुभंगलं होतं!

मी आणि रवी हॉस्पिटल मधून घरी आलो, माझ्या चेहऱ्याकडे पाहूनच, इन्नीला अशुभाची जाणीव झाली असणार, तिनं मला काहीच विचारलं नाही.

पण नील आणि समीर माझी वाट पाहत होते. त्यांच्या निष्पाप चेहऱ्यांकडे पाहताना मला भडभडून आलं. मी दोघांना जवळ घेतलं आणि कसंबसं सांगितलं, " नील, समीर तुमची मॉम आता नाहीये. !"

नील थोडा मोठा, त्याला ह्या शब्दांचा अर्थ कळला, तो रडायला लागला, समीर चार वर्षाचा. तो नुसताच गोंधळून गेला. विचारायला लागला. " मॉम नाहीये? कुठे गेली आहे? "

मी जड हृदयाने सांगितलं, " लांब... खूप लांब... देवाकडे!

समीर पटकन म्हणाला, " डॅड, मॉमनं आज सकाळी मला सांगितलं होतं. "

" सांगितलं होतं? काय? "

समीर म्हणाला, " सकाळी तिनं मला शाळेत सोडलं, तेव्हा तिनं मला जवळ घेतलं आणि म्हणाली, मी आता खूप लांब जाणार आहे. !"

ज्या मुलाला ह्या शब्दांचा अर्थही कळत नव्हता, त्याचाच तिने निरोप घेतला, माझे डोळे पाण्याने डबडबले.

माझ्या गळयात हात टाकून समीर केविलवाणेपणाने म्हणाला, " सॉरी डॅड! मी तुला सांगितलं नाही सॉरी. "

मी नीलकडे पाहिलं, त्यानं मान हलवली.

" मॉमनं मला पण शाळेत सोडलं, पण मला ती काहीच बोलली नाही. "

मी दोघानाही पोटाशी धरलं, आणि मनसोक्त अश्रू वाहू दिले. कोणाला सांगितलं आणि कोणाला नाही. आता या कुठल्याच गोष्टीला अर्थ उरला नव्हता.

अर्थ उरला नाही, तरी काही व्यवहार पूर्ण करावे लागतातच. दुसरे दिवशी सकाळी साध्या कपड्यातले दोन पोलिस ऑफिसर घरी आले.

त्यांना श्यामलच्या आत्महत्येचं कारण शोधायचं होतं. मृत्युच्या आधी श्यामल गाडी चालवीत होती. शेवटच्या क्षणी ती गाडीतून बाहेर आली आणि रस्त्यावर खाली पडली.

पोलिसांनी प्रथम गाडी तपासली. त्यांना श्यामलनं लिहिलेली दोन पत्र मिळाली. तशीच ॲन्टिडिप्रेसंट गोळयांची एक रिकामी बाटली सापडली, पोलिसांनी मला पत्रं दाखवली. एक पत्र इंग्रजीत होतं.

" ज्याला कोणाला हे पत्र मिळेल, त्याच्यासाठी.

मी डॉ. श्यामल ठाणेदार असं सांगत आहे कि, स्वतःचा जीव घेण्याचा निर्णय माझा स्वतःचा आहे, माझ्यावर त्यासाठी कोणी दबाव आणलेला नाही. किंवा त्या बाबतीत माझ्या जवळच्या कोणाचा कसलाही दोष नाही.... '

दुसरं पत्र मराठीत मला उद्देशून लिहील होतं.

*प्रिय,*

*तुला सुखी करायचा मी खूप प्रयत्न केला, पण करू शकले नाही, माझ्या वागण्यामुळे सर्वांनाच त्रास होतो, म्हणून मी माझं आयुष्य संपवते आहे. माझ्या आई वडिलाना पैशाची मदत कर. मुलांची काळजी घे.*

*तुझी श्यामल*

ही दोन्ही पत्रं पुढील तपासणीसाठी पोलिस घेऊन गेले. मराठीतलं पत्र वाचण्यासाठी त्यांनी मलाच सांगितलं, " गावातल्या कोणाचं तरी नाव सुचवा!"

मी एका मराठी बाईचं नाव सांगितलं, त्यांच्याकडून पोलिसांनी ते पत्र वाचून खात्री करून घेतली.

दोन्ही पत्रातून एक गोष्ट उघड होती की श्यामलचा निर्णय तिचा स्वतःचा होता. त्यासाठी तिनं कोणालाही जबाबदार धरलं नव्हतं.

पोलिस परत एकदा आले, ते केवळ उपचार म्हणून! म्हणाले,

" सॉरी, तुमच्या दुःखात आम्ही तुम्हाला त्रास दिला. " आणि निघून गेले.

एक बालंट टळलं होतं. आता माझ्यापुढे एक मोठा प्रश्न होता कि, "श्यामलने आत्महत्या केली, हे मी मुलांना कसं सांगू? "

मुलांची वय आठ नि चार! आपल्या आईनं आत्महत्या केली, हे ऐकून त्यांना काय वाटेल?

त्यांच्या मनावर त्या गोष्टीचा काय परिणाम होईल?

विचार करून मी असं ठरवलं, कि, श्यामलने आत्महत्या केली, हे मात्र मुलांना आता सांगायचं नाही. त्यांना जेव्हा समज येईल तेव्हा त्यांच्याशी ह्या बाबतीत बोलायचं.

मुलांना जर खरं खरं सांगणार नसू, तर लोकांना तरी कसं सांगायचं? लोकांकडून मुलांना ही गोष्ट कळणं, तर आणखीनच भयंकर! मग ठरवलं, श्यामलच्या आत्महत्येविषयी आता कोणालाच काही सांगायचं नाही.

माझ्या आयुष्यातली ही एक फार मोठी घोडचूक ठरली. कारण मुलांचं ठीक होतं. वेळ आली तेव्हा मी त्यांच्याशी मोकळेपणानी बोललो,

पण लोकांना खरं कारण न सांगितल्यामुळे उलटंच झालं. दोन चार व्यक्तींना खरं कारण माहिती होतं, कानोकानी बातमी पसरायला वेळ लागला नाही. पण माझ्याकडून खरं कारण न कळल्याने लोकांच्या मनात माझ्याबद्दल संशय निर्माण झाला आणि लोक माझ्याकडे विचित्र नजरेने पाहायला लागले.

कालपर्यंत मी होतो एक यशस्वी बिझिनेसमन! सच्छील, प्रेमळ कुटुंबप्रमुख! चांगला मित्र! आता एकदम मी खलनायक ठरलो. लोकांची अशी काही रिॲक्शन होईल, ह्याची मी कल्पना देखील केली नव्हती.

श्यामल गेल्यानंतर तिसऱ्याच दिवशीची गोष्ट. गावातली आमची अत्यंत जवळची मित्र मंडळी घरी आली. परक्या देशातलं आपलं कुटुंब म्हणावं, असे हे मित्र, वर्षानुवर्ष आम्ही एकमेकांच्या घरी जात येत होतो. उत्सव, सण आणि वाढदिवसासारखे प्रसंग एकत्र साजरे करीत होतो.

त्यांना पाहून मला खूप बरं वाटलं. ह्या अश्या प्रसंगात त्यांचाच तर आधार होता मला. पण आल्या आल्याच त्यांनी मला खडसावलं, की आमच्या असं कानावर आलं आहे की श्यामलने आत्महत्या केली. मग तू आमच्याशी खोटं का बोललास?

मला ठाऊक होतं, लक्षात आलं होतं, ते सर्व मी आता त्यांना सांगितलं. पण त्यांचं समाधान झालं नाही, उलट माझ्यावर अविश्वास दाखवीत त्यांनी विचारलं.

“श्यामलचा काही प्रॉब्लेम होता, तर तू पूर्वी कधीच कसं बोलला नाहीस? "

अरे, तो प्रॉब्लेम आहे, हेच तेव्हा माझ्या लक्षात आलं नाही. प्रत्येक माणसाच्या स्वभावात बरे वाईट गुण आणि दोष असतात. तिच्या स्वभावातले गुण दोष मला दिसतात आणि माझ्यातले तिला दिसत असतील किवा खुपत असतील असं मला वाटायचं. "

माझे मित्र माझं बोलणं ऐकून घेत नव्हते.

मी त्यांना विनंती केली कि, " तुमच्याशी मी मोकळेपणानी बोललो आहे. आणि खरं काय घडलं हे सगळं तुम्हाला सांगितलं आहे. पण कृपा करून श्यामलच्या मृत्यूचं खरं कारण माझ्या मुलांना कळू देऊ नका, अजून लहान आहेत ती!"

माझं बोलणं ऐकून न ऐकल्या सारखं करीत ही तथाकथित मंडळी निघून गेली.

त्यानंतर त्यांनी सह्या करून मला एक पत्र पाठवलं.

" ह्या पुढे तू तुझ्या मार्गाने जा, आम्ही आमच्या मार्गाने जाऊ, ह्या पुढे आपलं संबंध नाही. "

" मेलेल्याला मारणे" म्हणजे काय? तो अनुभव मी घेतला. आयुष्यात पहिल्यांदाच! पण त्याचवेळी मी मनाशी खुणगाठ बांधली.

" मी ह्यातून खचून जाणार नाही, मी माझं आयुष्य परत नीट चांगलं उभारीन, पाहाल तुम्ही. !

त्याच सुमारास केव्हातरी मला शिकागोहून फोन आला. हा श्यामलचा लांबचा भाऊ

" आय एम सॉरी! मला बातमी कळली.... "

वगैरे औपचारिक वाक्यं बोलून झाली.. मग तो पटकन म्हणाला,

" अनुवांशिक गुण म्हणतात, तो हा असा! श्यामलच्या वडिलांनीही आत्महत्या केली होती.

" श्यामलचे  वडील? "

" तुम्हाला माहित नाही? " श्यामलचे  वडील वेगळे होते. !

हे मी काय ऐकतो आहे?

"श्यामल दोन वर्षाची असताना तिच्या वडिलांनी आत्महत्या केली. त्यानंतर श्यामलच्या आईवर फार वाईट परिस्थिती आली. एकतर पैशाची चणचण. त्यात जवळचे लोक आणि नातेवाईकही तिच्याशी चांगलं वागत नव्हते. सगळेजण तिच्याकडे अशा दृष्टीने पहायचे की जणू काही नवऱ्याने आत्महत्या केली हा तिचाच दोष आहे. माय लेकींची खूप आबाळ झाली. त्यानंतर ह्या एका सद्गृहस्थांनी श्यामलच्या आईशी लग्न केलं. त्यांनी श्यामलला आपली मुलगी मानलं, आणि तसंच वाढवलं. श्यामल त्यांना ' बाबा' म्हणायला लागली.

श्यामलच्या आईने श्यामलला तिच्या खऱ्या वडिलांबद्दल कधीच काही सांगितलं नाही. श्यामल मोठी झाली, तिला दोन बहिणी झाल्या.

श्यामल हुशार, अभ्यासू! ती मेडिकलला गेली. डॉक्टर झाली, तिचे बाबांशी खूप खटके उडायचे. जनरेशन गॅप म्हणू या, किंवा वेगळे स्वभाव म्हणू या. पण दोघांचं पटायचं नाही आणि वादावादी व्हायची.

एमबीबीएस  झाल्यानंतर श्यामल हॉस्पिटलमध्ये नोकरी करायला लागली आणि तिनं एम. डी. ला ॲडमिशन घ्यायचं ठरवलं.

ह्या ॲडमिशन बरोबर बर्थ सर्टिफिकेट द्यायचं होतं. ते कुठे मिळेना. म्हणून मग श्यामल म्युनिसिपल ऑफ़िसमध्ये गेली आणि तिचं बर्थ सर्टिफिकेट  पाहून ती चक्रावली. तिचे वडील म्हणून तिच्या बाबांचं नव्हे, तर दुसरंच एक नाव होतं.

श्यामल बर्थ सर्टिफिकेट घेऊन घरी आली आणि तिनं आईला ते सर्टिफिकेट दाखवलं. श्यामलच्या आईचा चेहरा उतरला. पण मग तिला सत्य काय आहे ते सांगितलं.

श्यामल सैरभैर झाली. बाबांचा मोठेपणा तिला जाणवला, आणि स्वतःची लाज वाटायला लागली.

ह्या माणसाने आपल्याला आपली मुलगी मानलं आणि आपण मात्र त्यांच्याशी वाईट वागलो. ह्या विचाराने ती भयंकर अस्वस्थ झाली.

आईला काही न सांगता ती उठली आणि मुंबईभर भटकत राहिली. अचानक कळलेलं जन्माचे रहस्य आणि स्वतःच्या वागणुकीची लाज, ह्यामुळे तिला अगदी जीव द्यावासा वाटला.

पण तो दिवस सरला. संध्याकाळ झाली आणि मग ती घरी आली. आईला तिनं जाब विचारला कि, तू मला इतकी वर्ष अंधारात का ठेवलंस?

आई म्हणाली, " तुला त्रास होऊ नये म्हणून!"

नियतीचा कसा खेळ असतो पहा. इतक्या वर्षांनंतर तिनं डाव साधला, आणि शेवटी श्यामलनंही आपल्या खऱ्या वडिलांप्रमाणे आत्महत्या केली. "

श्यामलच्या भावाचे शेवटचे शब्द माझ्या कानावर पडत होते आणि नव्हतेही. माझ्या डोक्यात प्रश्नाचं एक मोहोळ तयार झालं होतं.

आपल्या आयुष्यातली ही इतकी महत्वाची गोष्ट श्यामलनं मला सांगू नये? का? तिला माझ्याबद्दल विश्वास वाटत नव्हता? की आणखी काही? तिला जेनेटिक्सचा अभ्यास करायचा होता. त्याचं कारण हेच असेल का?

बरेचदा ती मला म्हणाली होती,

' मला काहीतरी सांगायचं आहे, ' पण नंतर म्हणायची, ' काही नाही, मग सांगेन. ' ती गोष्ट हीच असेल का?

माझ्या मनात श्यामलविषयी विलक्षण अनुकंपा दाटून आली, कुठली वादळं डोक्यात भरून जगत होती, कुणास ठाऊक!

ह्या संपूर्ण गोष्टीत दोष कोणाचाच नव्हता. उलट माणुसकीची गहिरी छटाच उठून दिसत होती.

' फक्त ही गोष्ट मला आधी कळली असती तर? तर कदाचित मी श्यामलला अधिक चांगल्या रीतीने समजून घेतलं असतं का? किंवा तिचा नैराश्य हा आजार आहे, हे तिला

पटवून देऊ शकलो असतो का? त्यासाठी तिनं मानसोपचार तज्ञाची मदत घ्यावी, हे मी तिच्या गळी उतरवू शकलो असतो का?

प्रश्न प्रश्न आणि अधिक प्रश्न!

मी डोकं गच्च दाबून धरलं, चारी बाजूनी माझ्यावर काळोखाच्या लाटा कोसळतायत असं वाटलं, आणि अचानक...

प्रकाशाची एक तिरीप लखकन चमकली. प्रश्नाच्या ह्या सर्व गुंत्यामधला जो सर्वात महत्वाचा प्रश्न होता, त्याचं उत्तर मला सापडलं.

' जे श्यामलच्या बाबतीत झालं, ते तिच्या मुलांच्या बाबतीत होता कामा नये. त्यांना सत्य काय आहे, ते कळलंच पाहिजे. सत्याला सामोरं जाण्यानेच, ती सत्याशी सामना करू शकतील, अंधारात नाही. '

मुलांना लवकरात लवकर खरी गोष्ट सांगायची असं ठरवलं. फक्त त्या आधी आपलीही थोडी तयारी हवी असं वाटलं.

कित्येक दिवसांनंतर प्रथमच मी माझ्या सध्याच्या समस्येकडे वस्तुनिष्ठ रित्या पाहू शकलो. आत्तापर्यंत मी ह्या सर्व प्रकरणात भावनेनं इतका गुंतलो होतो की मला बाहेर पडण्याचा मार्गच सापडला नव्हता. समस्या हाताळण्याची माझी व्यावसाईक मती कुंठीत झाली होती. एखादा सामान्य माणूस जसा अशा वेळी गोंधळून जाईल, काहीतरी चुकीचा विचार करेल, तसं माझं झालं होतं.

पण आता माझं ध्येय मला समजलं होतं, आणि सर्व शक्तीनिशी मार्ग काढायला मी सिद्ध झालो होतो. ध्येय होतं, " मुलांना ह्या संकटातून, धक्का पोचू न देत बाहेर काढणे. "

ह्या वेळी माझ्या मदतीला आली इन्नी. तिनं माझ्यावर विश्वास ठेवला, माझं दुःख ते आपलं दुःख मानलं. घराची जबाबदारी तर तिनं उचललीच. पण मुलांना पोरकं वाटू नये, ह्यासाठी तिनं त्यांच्यावर मायेचं पांघरूण घातलं.

मी ऑफिसला जाणं जवळ जवळ बंद केलं, आणि ह्या समस्येचा संपूर्ण अभ्यास करायला लागलो. त्यासाठी एका बाजूला मी स्वतः मानसोपचारतज्ञाकडे जाऊन सल्ला घ्यायला लागलो. तर दुसऱ्या बाजूला नैराश्य, मानसिक आजार, अनुवांशिक आजार, आत्महत्या करणाऱ्या माणसांची मानसिकता अशा सर्व विषयांवरची पुस्तकं मिळवली, आणि ती वाचायला लागलो.

माझ्या मनाची थोडीफार तयारी झाली, तेव्हा मी मुलांना जवळ बोलावलं. आणि श्यामलच्या मृत्यूचं खरं कारण सांगितलं.

त्यांना धक्का बसला, दोघंही गोंधळून गेले आणि आपल्या परीनं ' तिनं असं का केलं असावं?' ह्याचा विचार करायला लागले.

नीलनं विचारलं, " डॅड, मी अभ्यास केला नाही, म्हणून मॉम रागावली का? तिनं असं केलं का? "

समीर म्हणाला, " मी वेड्यासारखा वागलो, की मॉम माझ्याशी बोलायची नाही, पण, मी तर काहीच हट्ट केला नव्हता. काहीच वेड्यासारखा वागलो नव्हतो. तरी तिनं असं का केलं? "

मग त्यांना समजेल अशा शब्दात सांगण्याचा मी प्रयत्न केला,

" हे बघा बाळानो, प्रत्येक गोष्टीचं कारण आपल्याला शोधता येत नाही. अशा वेळी ती गोष्ट आपण मान्य करायची आणि पुढे जायचं. मॉमचं तुमच्यावर खूप प्रेम होतं. ती तुमच्यावर रागावून निघून गेली नाहीये. पण तिचे काही प्रोब्लेम्स असतील, जे तुम्हाला आता समजतीलच असं नाही. कळलं? तर आपण आता एवढंच लक्षात घ्यायचं, की आता आपलं घर तिघांचं आहे आणि तिघांचंच असणार आहे. "

दोघंही मुसमुसायला लागले, मी त्यांना कुशीत घेऊन, धीर देऊन सांगितलं,

" मॉम नसली, तरी मी आहे ना? मी तुमचं सगळं नीट, छान करणार आहे,

“तुम्हाला कधी दुखलं, खुपलं, वाईट वाटलं किंवा बोलावंस वाटलं तर माझ्याशी बोलायचं. ह्या पुढे माझा सगळा वेळ मी फक्त तुमच्यासाठी ठेवला आहे. तुम्ही एकटे नाही, तुमचा डॅड आहे, हे कायम लक्षात ठेवा!”

मुलांना ह्यातलं कितपत काय समजलं, माहित नाही. मात्र " ह्याच्यापुढे डॅड आपली काळजी घेणार आहे, " एवढा विश्वास त्यांना आला असावा.

मुलांना मी नेहमीच सांभाळलं होतं, पण तेव्हा श्यामलची आणि माझी, दोघांची जबाबदारी असायची. आता सिंगल पेरेन्ट, एकुलता एक पालक म्हणून सर्व जबाबदारी माझ्यावर आली आणि लक्षात आलं, " हे काम किती कठीण आहे!" मुलांना वाढवताना शेकडो व्यवधानं सांभाळावी लागतात. हे काम आई जितक्या सहजपणे करते, तितकं बाबाला नाही जमत. खूप आटापिटा करावा लागतो.

मुलाचं खाणं पिणं, त्यांचे कपडे, त्यांचे युनिफ़ॉर्म, त्यांना शाळेत नेणं- आणणं, त्यांचे बाकीचे छंद जोपासणं, त्यांचा अभ्यास करून घेणं, त्याचं दुखलं खुपलं पाहणं, त्याचं मनोरंजन करणं आणि त्यांना चांगल्या सवयी, शिस्त लावणं.... कामांची यादी न संपणारी आहे.

मी कितीही केलं, तरी कमीच पडायचं. चार वर्षाच्या समीरला चष्मा लागला होता. कित्येक वेळा रात्री तो डोळ्यावर चष्मा ठेवूनच झोपून जायचा.

त्याला दररोज रात्री नवी गोष्ट लागायची. ती पुस्तकातून वाचलेली आवडायची नाही. ज्या गोष्टीत काहीतरी धमाल आहे, अशी काल्पनिक गोष्ट त्याला हवी असायची. पूर्वी माझ्यावर अधून मधून वेळ यायची, तेव्हा त्याचा हा हट्ट मी आवडीनं पुरवायचो.

पण सध्याच्या माझ्या मनःस्थितीत ही अशी गोष्ट रचणं, त्यात नाट्य आणि हास्य पेरणं, ही सगळीच कामगिरी अगदी अवघड वाटायची. तरीही हे रोजचं काम रोज रात्री करायला लागायचं.

आपापल्या खोलीत शांतपणे झोपलेल्या दोन्ही मुलांची पांघरूणं नीट करायची. त्यांच्या खोलीतले दिवे घालवायचे आणि मग दमून भागून आपल्या खोलीत जायचं.

अंथरुणाला पाठ टेकल्याबरोबर झोप येणं दूर! दिवसभर दाबून ठेवलेले अश्रू मुक्तपणे वाहायला लागायचे. मुलांसाठी मी होतो, पण माझ्यासाठी कोण होतं?

इन्नी घरात होती, न बोलता आधार देत होती हेच खूप! त्या पलीकडे तिला ह्या वयात माझं दुःख सांगून आणखी त्रास दयायचा नव्हता.

मला वीणाचे शब्द आठवले, श्यामल गेल्यानंतर काही दिवसांनी मी मुलांना घेऊन भारतात जाऊन आलो. तेव्हा वीणा, माझी धाकटी बहिण माझ्या गळयात पडून रडत म्हणाली,

" दादा, तू म्हणजे घराचा आधार! तुला कधी कोणाचा आधार लागेलं, असं वाटलंसुद्धा नव्हतं. "

जवळच्यानी दाखवलेली सहानुभूती, गावातल्या लोकांचा तुटकपणा, मित्रांनी उघड उघड फिरवलेली पाठ! हे असेच काय काय विचार येत राहायचे आणि रात्री उशिरापर्यंत झोप येत नसे.

कधीतरी डोळा लागणार. तेवढ्यात नील झोपेतून किंचाळत उठायचा. मी धावत त्याच्या खोलीत गेलो की मला बिलगून रडायला लागायचा. म्हणायचा, " डॅड, मला मॉम दिसली, ती माझ्या जवळ येत होती. पण ती काहीतरी विचित्रच दिसत होती. मला तिची भीती वाटली. "

मग त्याला थोपटून शांत करायचं, तो पुन्हा नीट झोप येईपर्यंत त्याच्या शेजारी बसायचं किंवा तिथेच आडवं व्हायचं.

अशावेळी एक एक क्षण मोजत मी स्वतःलाच विचारायचा,

' ही रात्र कधी संपणारच नाही का? "

चांगल्या किंवा वाईट गोष्टीचाही कधी ना कधी शेवट हा होतोच. तसंच १९९६ साल संपलं आणि सत्याण्णवही संपत आलं. तेव्हाच्या एका रवीवारची गोष्ट.

मी लवकर उठून किचनमध्ये शिरलो आणि एप्रन बांधून पॅन केक बनविण्याची तयारी करायला लागलो. आठवडाभर इन्नी स्वयंपाक करायची. रवीवारी मात्र मी बल्लवाचार्याची भूमिका करायचो. त्या दिवशी मुलांच्या आवडीचं काहीतरी नॉनवेज किंवा खास अमेरिकन खाणं मी बनवावं अशी त्यांची फार्माईश असायची.

मी पॅनकेकचं पीठ भिजवलं, तेव्हढ्यात इन्नी किचनमध्ये आली, माझी हालचाल पाहत क्षणभर उभी राहिली आणि तिनं एकदम विचारलं, " प्रसाद? "

(हो, ही गोष्ट आतापर्यंत सांगायचीच राहिली नाही का? माझं पाळण्यातलं आणि कागद पत्रांतलं नाव, श्रीनिवास. हे माझ्या आजोबांचं नाव. पण मग ' सासऱ्याचं नाव कसं घ्यायचं?' म्हणून इन्नीनं माझं अजून एक नाव ठेवलं, प्रसाद. तेव्हापासून मी घरात प्रसाद, बाहेर श्रीनिवास आणि अमेरिकेत गेल्यानंतर श्री!) तर इन्नीनं विचारलं, " तू आता काय ठरवलं आहेस? "

मी म्हणालो, " पॅनकेक्स करायचं ठरवलं आहे. "

इन्नी म्हणाली ' मी ब्रेकफास्टबद्दल बोलत नाहीये. तुझ्याबद्दल बोलते आहे. "

" माझ्याबद्दल काय? "

' तू आता लग्नाचं काय ठरवलं आहेस? '

मी दचकून तिच्याकडे पाहिलं, ती म्हणाली, " प्रसाद, मला वाटतं, तू आता परत लग्नाचा विचार करायला हवा. "

मी गुळमुळीतपणे म्हणालो, ' बघतो'.

' बघतो नाही' आता बघायलाच हवं. मी काही इथे कायमची राहणार नाही. मुलांना घरात आई हवी, तुला बायको हवी आणि घराला गृहिणी हवी, असं संन्याशाचा संसार किती दिवस चालवणार? "

आपलं म्हणणं मांडून इन्नी निघून गेली. माझ्या मनात मात्र खळबळ माजली.

गेलं संपूर्ण वर्ष मी फक्त मुलांचा विचार केला होता. कंपनीत जाणं जवळ जवळ बंद होतं. अधून मधून चक्कर टाकून एक धावता आढावा घ्यायचा. त्यावरून लक्षात यायचं कंपनीचा कारभार ठीक चालला आहे, मी नसल्यानं काही अडत नाहीये आणि अडत असतं, तरी ह्या काळात माझा वेळ मी कंपनीला दिला नसता.

बिझिनेसच्या मिटिंगपेक्षा मला ' मुलांच्या शाळेतल्या शिक्षक आणि पालकांच्या मिटींगला जाणं, जास्त महत्वाचं वाटत होतं. शाळेतली त्यांची नाटकं, त्यांची भाषणं, त्यासाठी तयारी करणं, त्यांना खेळायला घेऊन जाणं, आणणं, ह्या सर्व गोष्टी मी मनापासून न चुकता करीत होतो.

पण ' आईची आणि वडिलांची, अशा दोन्हीही भूमिका मी निभावून नेईन ' असं कितीही अट्टाहास केला, तरी आपलं कुटुंब अपूरं आहे, असं जाणवायचं.

ह्या उन्हाळयाच्या सुट्टीत मी मुलांना घेऊन पॅरीसला फिरायला गेलो होतो. खूप मजा केली. डिस्नेवर्ल्ड. आयफेल टॉवर, लूव्र अशी अनेक ठिकाणं पाहिली. दिवसभरात खाण्यासाठी आम्ही ह्या ना त्या रेस्तरॉंमध्ये किंवा कॅफेत जायचो, तेव्हा चार माणसांच्या टेबलपाशी बसल्यावर चौथी खुर्ची नेहमी रिकामी राहायची.

त्या खुर्चीकडे पाहताना मन उदास व्हायचं आणि एक बोचरी जाणीव व्हायची की, 'आपण एकटे आहोत. आपल्याला पार्टनर नाही.'

इन्नीच्या  बोलण्यामुळे मला आणखी एक प्रसंग आठवला.

श्रीकांत मोघे अमेरिकेत आले होते, त्यांचा मला फोन आला.

त्यांना आमच्या गावात आनंदयात्रेचा कार्यक्रम करायचा होता. मी त्यांना निमंत्रण दिलं.

कलाकार घरी येणार ह्याचा आनंद होता. खूप महिन्यानंतर घरात काही कार्यक्रम होतो आहे, ह्याचा दुप्पट आनंद होता. मी उत्साहाने गावातल्या मराठी मंडळींना कळवलं.

कोण कोण येतील आणि किती जण येतील, ह्याची जरा शंकाच होती. माझ्या पूर्वीच्या मित्र मंडळीनी तर मला वाळीतच टाकलं होतं. काही जणांना काहीतरी अर्धवट माहिती होती. ही माणसंही संशयाने पहायची आणि आमचं घर म्हणजे काहीतरी अशुभ प्रकार आहे असं भासवायची.

पण शेवटी पन्नास साठ माणसं आली, कार्यक्रम छान झाला. कार्यक्रमानंतर मी कलाकारांसाठी, खास मराठी पद्धतीचं जेवण ठेवलं होतं. काही पदार्थ करवून घेतले होते. काही मी बनवले होते. जेवणाचं टेबलही सुरेख सजविलेलं होतं.

जेवण झाल्यावर श्रीकांत मोघेनी पसंतीची पावती दिली.

" सर्व छान झालं, बरं का!" आणि हळूच विचारलं, “वहिनी दिसत नाहीत? "

मी त्यांना सत्य परिस्थिती सांगितली, ते हळहळले. माझी माफी मागत म्हणाले, "सॉरी, तुम्हाला दुखवायचा हेतू नव्हता. पण तुमच्या घरातलं वातावरण, टापटीप, ही तुमची लाघवी गोड मुलं आणि जेवणाचा थाट पाहून, तुमच्या घरात गृहिणी नाही, हे खरंच वाटणार नाही. "

त्यांचं बोलणं, मी माझं कौतुक म्हणून स्वीकारलं, तरीही घरात गृहिणी नाही' हे सत्य होतं, आणि ही घराची उणीव आहे, हेही मला मान्य होतं.

इन्नीच्या बोलण्यावर मी खूप विचार केला आणि मलाही असं वाटलं, कि, ' आता काहीतरी निर्णय घ्यायला हवा, मात्र त्या आधी मुलांशी नीट बोलायला हवं. '

मी समीर आणि नीलशी मोकळेपणानी बोललो. माझा हा प्रस्ताव त्यांना थोडा अनपेक्षित होता. पण त्यांनी माझं म्हणणं ऐकून घेतलं. मी जेव्हा त्यांना त्यांचं मत विचारलं, तेव्हा समीर म्हणाला, 'हो डॅड, तुम्ही दुसरी मॉम आणा मला चालेल. '

तर नील म्हणाला, " नाही डॅड, आपण तिघंच राहू, दुसऱ्या बाईला मी 'आई' नाही म्हणणार. "

मी दोघांनाही सांगितलं, ' आपण परत बोलू, विचार करू, मला अजिबात घाई करायची नाहीये. '

एकदोन महिने गेले, आम्ही इंडियाला जाणार होतो. त्या आधी परत एकदा मी हा विषय काढला. समीरचं मत बदललं नव्हतं, उलट पक्कं झालं होतं.

" डॅड, तू दुसरी मॉम आणलीस तर बरं होईल, घरात आपण तिघंच असतो, कधी कधी किती कंटाळा येतो ना? "

नील ह्याही वेळी मला विरोध करत म्हणाला, " डॅड, तू कशाला ह्या भानगडीत पडतो आहेस? आपण आहोत ते ठीक आहोत. "

ह्या वेळी मात्र मी त्याला समजावीत म्हणालो, " नील मी काही चुकीचं करेन का? मी जे करेन ते आपल्या सर्वांसाठी योग्य असंच करेन, जर मला कोणी चांगली मुलगी भेटली, ती तुम्हालाही आवडली, तरच मी तिच्याशी लग्न करेन, ठीक आहे? "

नील ' ओके डॅड ' असं म्हणाला खरा! पण अजूनही त्याला ही कल्पना 'ओ. के. ' वाटत नाही हे माझ्या लक्षात आलं.

भारतात आल्यानंतर मी गेल्या वेळे सारखीच ' टाइम्स ऑफ इंडिया ' त जाहिरात दिली. जाहिरात वाचून काहींनी उत्तरं पाठवली. त्यातल्या पहिल्या मुलीला मी भेटलो. ती शशी. शशी शर्मा.

माझ्या डोक्यावर जसं भूतकाळाचं ओझं होतं, तसंच तिच्याही डोक्यावर होतं. तिचा नवरा रेल्वेच्या एका अपघातात मरण पावला होता. तो बोटीवर काम करायचा.

पगार चांगला होता. पण एकूण मौजमजा, छानछोकी करायची आवड. त्यामुळे बचत काही नव्हती.

तो गेल्यावर शशी उल्हासनगरला राहायला आली. ही तिचीच जागा होती. लग्ना आधीपासून नोकरी करताना, तिनं घेतलेल्या ह्या जागेत, तिच्या माहेरची माणसं राहत होती. शशीची आई, भाऊ, बहिण, आणि आता शशी. अशी सर्व मंडळी ह्या चाळीतल्या एका छोट्या घरात एकत्र राहायला लागली.

जास्त पैसे मिळावे, ह्या उद्देशाने शशी नोकरी शोधायला लागली. केवळ बारावी झालेल्या शशीला नवीन नोकऱ्या मिळाल्या, त्याही दोन. भांडुपला एका छोट्याशा कंपनीत तिला कॅशियरचं काम मिळालं. तसंच पवईला एका बांधकाम कंपनीतलं अकौंटसचं पार्टटाइम कामही तिनं घेतलं.

मला शशी भेटली, तेव्हा ती दोन नोकऱ्या करीत होती. एक फुल टाइम, एक पार्ट टाइम, पण कुटुंबाची जबाबदारी आपण उचलतो आहोत ह्याचा तिला अभिमान होता. आणि कितीही कष्ट पडले तरी ते करण्याची तिची तयारी होती. ही साधी, सरळ, निष्पाप, स्वाभिमानी आणि स्वावलंबी मुलगी मला पहिल्याच भेटीत आवडली.

आम्ही आणखी एकदोनदा भेटलो. मग मी मुलांशीही तिची ओळख करून दिली. मुलांची आणि तिची भेट म्हणजे जरा विनोदच होता. शशी गढवालची, मुंबईत राहिल्यामुळे मराठी समजायचं आणि बोलायचीही. पण ते थोडं धेडगुजरी. तर मुलांचं मराठी, अमेरिकन इंग्रजी संस्कारांच! इंग्रजीत बोलावं, तर त्यांचे अमेरिकन उच्चार तिला कळत नव्हते, आणि तिचं मुंबईच्या धाटणीचं इंग्रजी त्यांना समजत नव्हतं. एकूण आनंदी आनंदच होता. पण शशीने पुढाकार घेऊन त्यांच्याशी संवाद साधण्याचा प्रयत्न केला आणि मुलंही तिच्याशी सौजन्याने वागली.

शशी आवडली होती, तरीही तिला पटकन होकार द्यायला मी कचरत होतो. दुधानं तोंड पोळल्यावर ताकही फुंकरून प्यावं, तशी स्थिती. मी उल्हासनगरला तिच्या घरी गेलो. तिच्या घरची माणसं साधी होती. मला तिच्या घरचं वातावरण आवडलं. तरीही शशीला

माझा निर्णय सांगायला मी अजून तयार नव्हतो. ह्या बाबतीत मुलं काय म्हणतायत, तोही मुद्दा महत्वाचा होता.

मग मी ह्या खेपेला आणखीही दोन तीन मुलीना भेटलो. त्या शशीपेक्षा जास्त सॉफिस्टीकेटेड, जास्त श्रीमंत, जास्त शिकलेल्या होत्या. पण का कोणास ठाऊक? त्यांच्याशी बोलताना असं वाटलं, त्या माझ्याशी नव्हे तर अमेरिकेशी लग्न करतायत.

मी गोंधळून गेलो, लग्नाच्या बाबतीतला निर्णय न घेता मी अमेरिकेला परत आलो. इन्नीही बरोबर होती. आमचं रोजचं रुटीन, मागल्या पानावरून पुढे सुरु झालं.

काही महिने गेले, समीरनं मला दोनतीनदा विचारलं,

" डॅड, तू दुसरी मॉम आणणार होतास ना? काय झालं? "

नीलचंही आता थोड मतपरिवर्तन झालं होतं. त्यानं आपणहून एकदा मला विचारलं,

" तू मुंबईला भेटलास, त्याच्यापैकी तुला कोणी आवडली का? "

मी त्यांना शशीबद्दल विचारलं.

त्या दोघांना ती पसंत होती. इन्नीला घरात वावरताना, काम करताना पाहिलं की मला अपराध्यासारखं वाटायचं. 'वयाच्या चाळीसाव्या वर्षांनंतरही मी आपला लहान मुलासारखा हक्कानं तिचा आधार घेतो आहे हे काही बरोबर नाही.'

१९९८चा मार्च महिना. परत एकदा मी मुंबईला आलो. शशीला भेटलो. आमच्या छान गप्पा टप्पा झाल्या. ह्या वेळी निघताना शशीनी मला विचारलं, ' लग्नाबद्दल तू काही ठरवलं आहेस का? "

मी तिच्या प्रश्नावर उत्तर देऊ शकलो नाही.

शशी म्हणाली, " ठीक आहे, तुझा निर्णय तू घ्यायचा तेव्हा घे, माझ्या बाजूने एक गोष्ट सांगते की आता जर आपण लग्न करणार असू, तरच आपण परत भेटायचं, नाहीतर नाही. "

तिच्या स्पष्ट बोलण्याने मी चमकलो.

ती पुढे म्हणाली, "श्री, मलाही आता तू आवडायला लागला आहेस, पण ज्या नात्याला भविष्य नाही, त्या नात्यामध्ये मला गुंतून पडायचं नाही, तुझ्यासारखीच मीही एकदा पोळलेली आहे. निराशा, दुःख, पचवलेलं आहे. आता पुन्हा तो अनुभव मला घ्यायचा नाही तेव्हा आपण निरोप घेऊ या. "

शशीने निरोपाचे शब्द उच्चारले आणि माझ्या आयुष्यात तिचं काय महत्व आहे, हे मला लख्ख दिसलं, माझ्या लक्षात आलं, ' मला तिला गमवायचं नाहीये. ' एका क्षणात माझा निर्णय ठरला. मी तिला ' हो' सांगितलं.

एकदा लग्न करायचं पक्कं झाल्यावर शशीला अमेरिकेला नेण्याची तयारी सुरु झाली. पासपोर्टचा अर्ज भरण्यापासून प्रत्येक गोष्ट करायची होती. पासपोर्ट मिळायला तीन महिने लागले. मग व्हिजिटर्स व्हिसासाठी अर्ज भरला. ह्या जन्मात माझं आणि व्हिसाचं काय वाकडं आहे कळत नाही. शशीचा व्हिसा अर्ज रिजेक्ट झाला.

तेवढ्यात मला एक शोध लागला. की हल्ली " फियॉन्से व्हिसा " नावाची एक नवीन सोय केलेली आहे. म्हणजे अमेरिकेत येऊन लग्न करू इच्छिणाऱ्या वधू किंवा वराला खास परवानगी मिळते. अट एकाच! अमेरिकेत गेल्यानंतर तीन महिन्याच्या आत लग्न करायला हवं.

आमची त्याला ना नव्हतीच. तर शेवटी एकदा आम्ही लग्न ठरवल्या पासून जवळ जवळ वर्षानं १९९९मध्ये शशीला "फियॉन्से व्हिसा" मिळाला.

व्हिसा मिळाल्याच्या दुसऱ्याच दिवशी माझ्या भावी पत्नीला घेऊन मी अमेरिकेला जायला निघालो.

मधल्या काळात, नवीन संसाराबाबत मी काही निश्चित विचार केला होता. गेली दोन अडीच वर्ष इन्नी माझं घर सांभाळीत होती. नाही म्हटलं, तरी तिच्या वयाला ही

जबाबदारी जरा जास्त होती. तिनं यथा शक्ती सगळं सुरळीत पार पाडलं. पण आता तिलाही थोड्या आरामाची नक्कीच गरज होती, ही एक गोष्ट.

दुसरी गोष्ट म्हणजे इन्नीनं आमच्या घराला काही एक पद्धत घालून दिली होती. तिनं घराला काही शिस्त लावली होती. ती चांगलीच होती, पण इन्नीनं आपल्या पद्धतीने घर चालवलं असतं, तर शशी आल्यानंतर हे घर ' आपलं ' वाटलं नसतं.

माझी अशी इच्छा होती, की अमेरिकेत आल्यानंतर पहिल्या दिवसापासून शशीनं आमचं घर 'आपलं' म्हणून चालवावं. ती नवखी असेल. तिला इथल्या पध्दती ठाऊक नसतील, तर ती अनुभवातून शिकेल, पण ' गृहस्वामिनी' हे पद मिळालं की ती नक्कीच आपली जबाबदारी चांगली पार पाडेल.

शशीला फियॉन्से व्हिसा मिळण्याआधी मी इन्नीशी ह्या बाबतीत बोललो. तिलाही हे पटलं. त्यामुळे फियॉन्से व्हिसा मिळण्याची तारीख जवळ आली तेव्हा मी मुलांना आठ दहा दिवसा करिता बेबी सीटरकडे ठेवलं, आणि इन्नीला घेऊन भारतात आलो.

इन्नीला बेळगावला पोचवून मी फियॉन्से व्हिसा मिळण्याची वाट पाहायला लागलो. शेवटी एकदा तो ' सोनियाचा दिवस' उजाडला.

शशी नि मी सेंट लुइसला पोचलो. ते आमच्या नव्या घरात! हे घर मी एक महिन्या पूर्वी घेतलं होतं. आधीचं घर खूप सुंदर होतं. पण तिथल्या प्रत्येक गोष्टीत श्यामलची आठवण जिवंत होती. माणूस जातो. आठवणी उरतात. त्या उराव्यात, पण मनात! त्या आठवणींचा वर्तमान काळाला अडसर होता कामा नये. तेव्हा जिथे श्यामलनं आणि मी संसार केला, जिथे आमचं संसार संपला, ते आमचा सुंदर घर मी विकलं. शशीचं स्वागत करण्यासाठी मी नवीन घर सजवलं.

सेंट लुइस मधल्या एका सुरेख सोनेरी संध्याकाळी शशीनं माझ्या सोबतीनं या घरात पाऊल ठेवलं. समीर आणि नील दोघांनी हसऱ्या चेहऱ्यांनी आमचं स्वागत केलं.

अमेरिकेतलं आपलं घर, आपली माणसं पाहताना शशीच्या चेहऱ्यावर निखळ आनंद होता. माझं भरलेलं घर बघून मी समाधान भरून पावलो होतो. तर समीर आणि नीलही खुश दिसत होते. आमच्या येण्याची आतुरतेने वाट पाहत होते.

जरा वेळानं नील म्हणाला, " डोळे बंद करा, देअर इज अ सरप्राइज फ़ॉर यु!

मी आणि शशीने डोळे बंद केले, मुलाची थोडीशी धावपळ कानावर आली, मग आदेश मिळाला, " आता उघडा डोळे!"

आम्ही डोळे उघडले, तर समोरच्या टेबलवर एक सुंदर केक. त्यावर आईसिंगच्या अक्षरांनी लिहल होतं. वेलकम तो अमेरिका!

जरासं लाजत नीलनं सांगितलं, " हा केक मी बनवला, मॉमच्या स्वागतासाठी. "

मी शशीकडे पाहिलं, तिचे डोळे पाण्यानी भरले होते, मलाही माझे अश्रू थांबवता आले नाहीत.

दुसऱ्या इनिंगची सुरुवात तर चांगली झाली होती.

शशी अमेरिकेत पहिल्यांदाच येत होती. इतकंच नाही, तर तिला अमेरिकेची काही देखील माहिती नव्हती. अगदी ' बिल क्लिंटन ' हा अमेरिकेचा प्रेसिडेंट आहे' ह्याचाही तिला पत्ता नव्हता. इथे येण्याआधी ज्या छोट्याशा जगात ती वावरत होती, तिथे रोजच्या केवळ जगण्यासाठी इतके कष्ट करावे लागतं होते की बाकीच्या जगात काय चाललं आहे, हे पहायलाही फुरसद नव्हती. अमेरिका, अमेरिकन लाईफ स्टाइल ह्या जगाचा आणि तिचा कधी संबंध आला नव्हता आणि येण्याची सुतराम शक्यताही नव्हती.

पण मी तिच्या आयुष्यात आलो आणि केवळ माझ्यावर विश्वास ठेवून तिनं ह्या साता समुद्रापारच्या अनोख्या दुनियेत प्रवेश केला. तिच्या बाबतीतला एक सर्वात चांगला गुण म्हणजे स्थिती स्थापकत्व! कुठलीही नवीन परिस्थिती मोकळेपणी स्वीकारणे आणि त्या परिस्थितीशी हसत जमवून घेणे. हे तिला सहज जमायचं.

म्हणून आल्यानंतर काहीच दिवसात समीरची आणि तिची चांगलीच गट्टी जमली. नीलचं वय अडनिडं होतं. अकरा वर्षांचं! पण आपल्या आनंदी हसऱ्या स्वभावानं आणि प्रेमळ वागण्यानं तिनं नीललाही आपलासा केला. त्यांनीही नवीन मॉम मनापासून स्वीकारली.

अर्थात ह्याला माझी कॅटलिस्ट किंवा मध्यस्थाची भूमिकाही थोडीफार उपयोगी पडली. इथली दहा अकरा वर्षाची मुलं अत्यंत स्वतंत्र मनोवृत्तीची, बंडखोर वृत्तीची असतात. त्यांना ' अमुक एक गोष्ट मी सांगतो म्हणून कर, ' असं म्हणून चालत नाही.

शशीला हा अनुभव नवीन होता. तेव्हा किंचित संघर्षाचा प्रसंग आला, तर मी शशीला, इथल्या मुलांच्या मानसिकतेबद्दल समजावून सांगायचा. तिला म्हणायचा, " तू त्याला समजून घे त्याच्याशी प्रेमाने जमवून घे. "

त्याच वेळी नीललाही थोडं बाजूला घेऊन, दोस्ताच्या नात्याने सांगायचा,

" नील, अरे तिला इथल्या मुलांच्या वागण्याची सवय नाहीये. ती इथे नवी आहे, ती तुला काही सांगत असेल, तर ते प्रेमापोटी, एवढंच लक्षात घे, आणि जरा तिच्याशी प्रेमाने जमवून घे. "

इन्नीची ही बेळगावी पॉलिसी अमेरिकेतही उपयोगी पडायची आणि मला हसायला यायचं. 'शेवटी माणूस वरून कितीही वेगळा दिसू दे, तो आतून सर्व ठिकाणी सारखाच असतो."

शशीनं इथली राहणी, इथलं वातावरण, इथलं खाणं पिणं ह्या सर्व गोष्टी इतक्या चटकन आत्मसात केल्या, की मी पाहतच राहिलो.

ज्या मुलीनं मुंबईला कधी ट्रेन किंवा बसशिवाय प्रवास केला नव्हता, ती इथे येऊन ड्रायव्हिंग शिकली, मग मुलांना शाळेत नेणे, आणणे, त्यांना खेळायला किंवा स्विमिंगला पोचवणे, ग्रोसरी करणे, अशा इथल्या गृहिणींच्या सर्व जबाबदाऱ्या ती अगदी निगुतीने पार पाडायला लागली. इतकंच काय, तिला इथल्या इंग्रजी भाषेचा चांगला सराव झालं, तिनं ॲडमिनीस्ट्रेशन असिस्टंट नावाचा कोर्स पूर्ण केला आणि माझ्या बिझिनेसमध्ये मला मदत करायला लागली.

ती माझ्या सहवासात अस्खलित मराठी बोलायला लागली, गावातल्या मराठी कार्यक्रमांमध्ये उत्साहाने भाग घ्यायला लागली. अगदी नाटकात काम करायची वेळ आली, तेव्हाही तिनं आनंदाने भाग घेतला.



आमचा संसार पाहायला इन्नी आली, तेव्हा तिला खूप समाधान वाटलं. पदराने डोळे पुसत, तिनं माझ्या डोळ्यावरून हात फिरवला. तो स्पर्श मला बरंच काही सांगून गेला.

' खूप भोगलंस, आता झालं गेलं, गंगेला मिळालं. पण तुम्हाला सगळ्यांना सुखी असलेलं पाहून खूप बरं वाटलं. '

इन्नीचा थरथरता हात मी हातात घेतला, तेव्हा मला माझ्या मित्रानं केलेली एक सावधगिरीची सूचना आठवली. शशी मला आवडली होती, पण अजून मी लग्नाबद्दल थोडं साशंक होतो. तेव्हा हा मित्र म्हणाला होता, " तू म्हणतोस, ही मुलगी (शशी ) चांगली आहे वगैरे! ते ठीक आहे, पण तुझी आणि तिची इंटेलेक्च्युअल पातळी अगदीच वेगळी आहे. त्याचं काय? "

त्याचं म्हणणं चूक नव्हतं, पण त्यावेळी मी पटकन म्हणालो,

" आज मला इंटेलेक्च्युअल पातळीपेक्षा इमोशनल सपोर्टची (भावनिक आधाराची ) जास्त गरज आहे, आणि मला असं वाटत, ही मुलगी त्या बाबतीत मला योग्य ती साथ देईल."

माझा अंदाज बरोबर ठरला होता. इन्नीकडे पाहत मी किंचीतसा हसलो, माझ्या मनातला भाव तिलाही कळला होता.

१९९६ ते ९८ ह्या काळात मी बिझीनेसमध्ये जराही लक्ष घातलं नव्हतं. अधून मधून जायचं आणि आकडेवारी तपासायची, इतकंच! त्यातून मला कळायचं, की ' दरवर्षी सेल, वीस ते पंचवीस टक्क्यांनी वाढतो आहे. त्याच प्रमाणात फायदाही जास्त होतो आहे. '

ह्याचाच अर्थ, मी नाही म्हणून बिझिनेसचं काही अडलं नाही. मी ज्यांच्यावर जबाबदारी सोपवली, त्यांनी आपलं काम चोख केलं आहे. आणि डन सुलेव्हानचा उपदेश मी पाळला, तेही अगदी योग्यच केलं आहे.

१९९९ सालापर्यंत मी बऱ्यापैकी सावरलो आणि मग परत एकदा ऑफिसमध्ये जायला सुरुवात केली, रोजच्या व्यवहारात लक्ष घालत नव्हतो. पण आजूबाजूला काय चाललं आहे, हे बघत होतो. ह्या वर्षी सेल फक्त तीन टक्क्यांनी वाढला होता. पण नफा त्या प्रमाणात वाढला नाही. उलट गेल्या वर्षीपेक्षा थोडा कमीच झाला. ह्याचा अर्थ कुठे तरी काहीतरी चुकतंय. वरवर सर्व ठीक दिसलं. तरी कुठे तरी पाणी मुरतंय. बिझिनेसच्या ढिल्या झालेल्या यंत्राला ट्यूनअपची गरज आहे.

एकदा प्रॉब्लेम आहे म्हटल्यावर चॅलेंज घेऊन तो सोडवायचा, हा माझा मूळ स्वभाव जागा झाला. कित्येक वर्षांनी मी परत एकदा झडझडून कामाला लागलो. इतके दिवस न दिसलेल्या अनेक गोष्टी मला दिसल्या. मी त्यांची काटेकोरपणे नोंद करीत गेलो.

एक म्हणजे, काही प्रामाणिक काम करणारे लोक असमाधानी होते. त्यांच्या सूचना आणि अडी अडचणी ऐकून घेतल्या जात नव्हत्या. दुसरी गोष्ट, काही लोक अडेलतट्टूपणे वागत होते. " हे काम आमचं नाही, ' आम्ही हे काम करू शकत नाही, ' अशा प्रकारे ते काम टाळायचे.

तिसऱ्या प्रकारचे लोक काम करीत होते, पण अपेक्षित रिझल्ट्स देत नव्हते. त्याशिवाय कस्टमर सर्व्हिस थोडी फार ढिसाळ झाली होती. लोकांचे प्रॉब्लेम्स सोडविताना उणीवा राहत होत्या. म्हणजे एकूणच गाडी रुळावरून थोडी घसरली होती. ती पूर्वीप्रमाणे रुळावर आणून व्यवस्थित धावण्यासाठी मेहनत करायला हवी होती.

एकदा खात्री पटल्यानंतर मी भराभर निर्णय घेतले.

कंपनीचं ज्यांच्यामुळे नुकसान होतं होतं, अशा काही लोकांना मी कामावरून काढलं. काही लोकांना थोडीशी अद्दल घडवली. म्हणजे त्यांची पदावनती करून त्यांना खालच्या जागा दिल्या. ' चांगलं काम केल्यास परत पूर्वीचं पद मिळेल, ' अशी सूचना केली. काही लोकांना प्रमोशन्स देऊन, त्यांची पाठ थोपटली. कंपनीचा चेहरा मोहरा आणि संपूर्ण वातावरणच बदलून गेलं. ' आपण चूक केल्यास शिक्षा होते. ' कामावरून काढलंही जातं' हे कळल्यावर सरसकट सर्व माणसं जबाबदारीनं, मनापासून काम करायला लागली. माझ्या गैरहजेरीत माझी जबाबदारी ज्यांच्यावर टाकली होती, ते कंपनीचे वरिष्ठ अधिकारी मला म्हणाले,

' श्री, कंपनीतल्या काही अनिष्ट प्रथा आमच्या लक्षात आल्या होत्या, पण तू आता जशी काही थेट ॲक्शन घेतली, काही मोठे निर्णय घेऊन ते अमलात आणले, ती कारवाई करण्याचा धाडस आमच्यात नव्हतं. "

त्यांचं म्हणणं बरोबर होतं. ह्या प्रकरणानं मीही एक धडा शिकलो, कि, ' योग्य अशी माणसं निवडून, त्यांना सर्व कामं वाटून दिली, तरी सूत्रधार आपणच असायला हवं. आपली पकड ढिली झाली तर कंपनीचा डोलारा कोसळायला वेळ लागतं नाही. "

मी घेतलेले निर्णय योग्य होते, हे वर्ष संपताना जी आकडेवारी मिळाली, त्यावरून पूर्णपणे सिद्ध झालं.

आतापर्यंत सर्वात जास्त सेल, २००० साली झाला आणि त्याच प्रमाणात प्रॉफीटही वाढला, एकविसाव्या शतकात प्रवेश करणारं हे वर्ष आपल्यासाठी भाग्यशाली ठरणार असं अंदाज मी बांधत होतो. त्याच सुमाराला मला एक फोन आला.

सेंट लुइसमध्ये आमच्याच पद्धतीचं काम करणारी एक मोठी कंपनी होती. इंडस्ट्रिअल टेस्टिंग लॅब. ह्या कंपनीचा प्रमुख अधिकारी इआन निकोल ह्यानं मला फोन करून विचारलं, " अरे श्री, दोनतीन वर्षापूर्वी ही आमची कंपनी विकत घेण्यात तुला इंटरेस्ट होता ना? अजूनही तुझा विचार कायम असेल, तर आता आम्ही कंपनी विकायला तयार आहोतं. "

मी हसलो, ह्या कंपनीचं आणि माझं नात फार जुनं होतं. मला तो सर्व इतिहास आठवला आणि नियतीवर विश्वास ठेवावासा वाटला.

१९९० साली पेट्रोलाईट कंपनीतली नोकरी सोडण्याआधी ज्या अनेक कंपन्यांमध्ये मी नोकरीसाठी अर्ज केला होता, त्यातली ही एक कंपनी होती, इंडस्ट्रिअल टेस्टिंग लॅब. अल सीगल नावाचा अमेरिकन ज्यू माणूस ह्या कंपनीचा मालक होता.

नोकरी मागण्याच्या निमित्ताने मी अलला दोनतीनदा भेटलो. आमची छान मैत्री झाली. अलला माझा स्वभाव खूप आवडला. पण तो म्हणाला,

" माझी कंपनी लहान आहे, मी तुला नोकरी देऊ शकत नाही. "

त्यानंतर मी नोकरी सोडली, केमिर घेतली. वगैरे सर्व काळात त्याचे आणि माझे मैत्रीचे संबंध होते.

१९९६मध्ये अलच्या कंपनीचा सेल थोडा कमी झाला, अलला काळजी वाटायला लागली. एकतर तो थकला होता, वयाच्या ७२ व्या वर्षी परत एकदा कंपनी वर आणण्यासाठी कष्ट करायचे, हे त्याच्या जीवावर आले होते.

१९९६मध्ये मी कंपन्या विकत घेऊन, बिझिनेस वाढवायचा जोरदार प्रयत्न करीत होतो. ह्या प्रयत्नाचा एक भाग म्हणून मी अलच्या कंपनीचा अभ्यास केला. ही कंपनी आता थोडी खाली गेली असली, तरी इथली परिस्थिती सुधारता येईल आणि कंपनी फायदेशीर करता येईल. अशी माझी खात्री पटली.

माझं होमवर्क पूर्ण झालं, तेव्हा मी अलला विचारलं,

" तुझी कंपनी, तू मला विकतोस का? "

अल तयार झाला, किमतीवर घासाघीस सुरु झाली, अल एका आकड्यावर अडून बसला. मला ती किंमत जास्त वाटत होती. मग आमची बोलणी पुढे सरकलीच नाहीत.

गंमत म्हणजे अलला माहित होतं की, " मी त्याच्या कंपनीचा सांगोपांग अभ्यास केला आहे. कंपनीतली गुणी माणसं, त्यांचा पगार, कंपनीची पॉलिसी, सध्याचा एकूण सेटअप आणि त्यातले गुणदोष ह्या सर्व गोष्टी माझ्याकडे आकडेवारीनिशी तयार आहेत. ' तेव्हा बरेच वेळा त्याच्या कंपनीची त्यालाच काही माहिती हवी असली किंवा कुठे काही प्रॉब्लेम आला की तो मला फोन करायचा, माझा सल्ला घ्यायचा. माझ्याकडून माहिती मिळवायचा. मला हसायला यायचं. पण त्याला हवी असलेली माहिती किंवा सल्ला मी त्याला देत असे.

मग अलला कंपनीसाठी एक चांगली ऑफर आली. इंग्लंडमध्ये बॉडीकोट नावाची एक मोठी कंपनी होती, ह्या कंपनीनं अलला माझ्या दुप्पट पैसे ऑफर केले आणि अलने तडका फडकी निर्णय घेऊन बॉडिकोटला आपली कंपनी विकली.

मला जेव्हा कळलं तेव्हा खूप वाईट वाटलं, ' एक चांगली कंपनी आपल्या हातातून गेली' म्हणून मी हळहळलो.

त्यानंतर थोड्याच दिवसात श्यामलनं जगाचा निरोप घेतला आणि बिझिनेस वाढवणं तर दूरच राहील, होता तो बिझिनेसमध्येही मी लक्ष घालीनासा झालो. त्यावेळी वाटलं, ' बरं झालं ही अलची कंपनी मी घेतली नाही. सध्याच्या परिस्थितीत ही कंपनी सुधारण्याचा खटाटोप मला जमलाच नसता!'

१९९६मध्ये अलनं कंपनी बॉडीकोटला विकली, त्याचे त्याला दाम दुप्पट पैसे मिळाले. पण दुर्दैव म्हणजे निवृत्तीनंतर मिळालेल्या पैशाचा त्याला उपभोग घेता आला नाही. कंपनी विकल्यानंतर काहीच दिवसांनी अलला हार्ट अटॅक आला आणि त्याचं निधन झालं.

त्यानंतर बॉडीकोटनं घेतलेल्या अलच्या कंपनीचा आणि माझा तसा काही संबंध उरला नाही. पण एकाच गावातील स्पर्धक म्हणून माझं लक्ष असायचं. मला माहिती मिळाली ती अशी,

' बॉडीकोटला ही कंपनी चालवता आली नाही. कंपनीतले प्रॉब्लेम्स वाढत गेले आणि कंपनीला दरवर्षी अधिकाधिक तोटा होतं गेला. '

आज २००० सालच्या इंडस्ट्रिअल टेस्टिंग लॅबचा प्रमुख अधिकारी इआन निकोल ह्यानं 'कंपनी विकत घेणार का? ' असा प्रस्ताव माझ्यासमोर मांडला. मी परत एकदा ह्या कंपनीचा विचार करायला लागलो.

इंडस्ट्रिअल टेस्टिंग लॅब ही कंपनी आज जरी पूर्वीपेक्षा वाईट स्थितीत असली, तरी आजही ती घेण्यात माझा फायदा होता.

कारण केमिर ज्या प्रकारचं काम करत होती, त्यापेक्षा थोडं वेगळं, पण केमिरच्या कामाला पूरक ठरेल असं काम ही कंपनी करीत होती.

तेव्हा ती ताब्यात घेण्याने केमिरची शक्ती, आकार आणि फायदा जास्त झाला असता.

प्रत्यक्ष बोलणी करण्याआधी परत एकदा मी माझ्या पद्धतीने ह्या कंपनीचा अभ्यास केला. आजही ह्या कंपनीत काही चांगले लोक काम करीत होते. त्यांना बरोबर घेऊन काही नवे लोक आणून मी ही कंपनी फायदेशीर करीन अशी माझी खात्री पटली.

मग ह्या कंपनीचा प्रमुख अधिकारी इआन निकोल ह्याला मी भेटलो.

इआननं सत्य परिस्थिती लपवली नाही, तो म्हणाला,

" बॉडीकोटने ही कंपनी विकत घेतली खरी, पण तीन वर्षात फायदा होणं तर दूर! उलट तोटाच झाला आणि तो वाढत गेला. तेव्हा आम्ही असं ठरवलं आहे की सध्या काम करीत असलेल्या सर्व माणसाना काढून टाकायचं. आणि मग मशिनरी आणि जागा विकायची. तुला जर इंटरेस्ट असला, तर आपण व्यवहाराबद्दल बोलू. "

मी त्याला म्हणालो, मला मशिनरी आणि जागा यात इंटरेस्ट आहेच, पण मला इथल्या माणसांमध्येही इंटरेस्ट आहे. ह्या माणसांशिवाय मशिन्सना काही किंमत नाही. म्हणूनच कंपनी मी विकत घेईन, ती माणसां सकट. "

माझं म्हणणं इआनला सोयीचच वाटलं, कारण आता माणसाना काढण्याचा प्रॉब्लेम उरला नाही. बॉडीकोटला ही कंपनी लवकरात लवकर विकायची इतकी घाई होती की अलला चार वर्षा पूर्वी मी जी किंमत मोजणार होतो, त्याच्या अर्ध्या किमतीत त्यांनी मला कंपनी विकली, २००० सालात केवळ साडेसात लाख डॉलर्सना मी " इंडस्ट्रिअल टेस्टिंग लॅब ह्या आणखी एका कंपनीचा मालक झालो.

आता पुढची महत्वाची पायरी होती ती, ही बुडीत गेलेली कंपनी सुधारण्याची, माझं होमवर्क तयार होतं. त्या नुसार एक एक कारवाई करायला सुरुवात केली.

इंडस्ट्रिअल टेस्टिंग लॅब म्हणजे एक भली मोठी जुनी इमारत होती, इथे सुमारे वीस हजार चौरस फुटांची जागा होती, कंपनीच्या कामकाजासाठी एवढ्या मोठ्या जागेची गरज नव्हती. परत ही एवढी मोठी जागा गरजेनुसार गरम किंवा गार करण्यात विजेची खूप नासाडी व्हायची.

मी एका दगडाने तीन पक्षी मारले. मेट्रो बुलेवार्ड इथे केमिरचं मुख्य कार्यालय होतं. ह्या बिल्डींगमध्ये पाच हजार चौरस फुटांची एक जागा रिकामी होती. मी इंडस्ट्रिअल टेस्टिंग लॅबची सर्व मशिनरी, मेट्रो बुलेवार्डवरच्या ह्या रिकाम्या जागेत हलवली. इंडस्ट्रिअल टेस्टिंग लॅबचा सर्व संसार इथे छान मावला आणि ह्या पुढे ही कंपनी इथूनच चालवायची असा निर्णय पक्का झाला. मग इंडस्ट्रिअल टेस्टिंग लॅबची जुनी मोठी जागा मी बंदच करून ठेवली. पुढे मागे ती मला विकता आली असती. किंवा तिथे नवीन उद्योग सुरु करता आला असता. मुख्य म्हणजे वीज, पाणी इत्यादी उर्जेचा अनाठायी खर्च वाचला.

आता माणसं व त्यांची कामं ह्या बाबतीत काही ठोस पावलं उचलणं आवश्यक होतं. इथेही काही माणसं कामचुकार होती. त्यांना मी ठेवलं नाही. पिंक स्लीप (नोकरी सोडा' ह्या नोटिशीला अमेरिकेत ' पिंक स्लीप ' असं गोड नाव आहे. ) मिळालेले काही लोक निघून गेले. काहीना नवीन नोकरी मिळण्यासाठी मी मदत केली. उरलेले कामगार, तंत्रज्ञ  शास्त्रज्ञ ह्या

लोकांना मी भेटलो आणि त्यांनाच विचारलं कि, " ही कंपनी चांगली चालावी ह्यासाठी काय करायला हवं? तुमच्या काही सूचना आहेत? "

ते भांबावले. मी त्यांना म्हणालो, " तुम्ही कंपनीचे मालक आहात असं समजा. तुम्हाला कंपनी वाचवायची आहे. तर तुम्ही काय कराल.? " असा प्रश्न त्यांना कधी कोणी विचारला नव्हता. त्यामुळे आधी कोणी विशेष बोललं नाही. पण मग मात्र त्यांच्यापैकी बऱ्याच जणांनी आपापल्या विभागासाठी वेगवेगळया सूचना केल्या.

कामगारांचा सल्ला घेण्याची माझी कल्पना यशस्वी झाली. कारण बारीक सारीक दुखणी त्यांनाच माहित होती. शिवाय त्यांना विश्वासात घेऊन मी काम करतो आहे, ह्या मुळे त्यांच्या -माझ्या मधली दरी नाहीशी झाली.

त्यांनी केलेल्या ज्या सूचना व्यवहार्य होत्या, त्या मी अंमलात आणल्या. सांगायला अभिमान वाटतो कि, मी ताब्यात घेतल्यापासून केवळ तीन महिन्यात कंपनी चांगली चालायला लागली. वर्षाच्या अखेरीला ह्या कंपनीमुळे एक लाख डॉलर्स इतका नफा झाला आणि त्याच्या पुढच्या वर्षी ह्या कंपनीचा नफा होता. तीन लाख साठ हजार डॉलर्स!

'केमिर ' ह्या छोट्याशा ॲनालीटीकल लॅबचा पाहता पाहता एक उद्योग समूह तयार झाला. ' केमिर ॲनालीटीकल सर्व्हिसेस. '

गम्मत म्हणजे, सर्वसाधारणपणे कुठलाही उद्योग हा शून्यातून तयार होतो. तर माझा हा उद्योग मात्र डिरेक्टरीच्या यलो पेज मधून तयार झाला, असं म्हणायला हवं.

कारण मी शून्यापासून सुरुवात केली नाही तर एकापासून केली. आधी केमिर ही एक चालू असलेली छोटी कंपनी विकत घेतली आणि मग तिचे भाईबंद शोभतील आणि तिचं बळ वाढवतील, अशा छोट्या छोट्या कंपनी विकत घेत गेलो. डिरेक्टरीच्या यलो पेजेस मधून कंपन्या शोधायच्या आणि शक्य होतील तशा घ्यायच्या.

२००२पर्यंत केमिरचा पसारा चांगलाच वाढला होता. एकूण बस्तान छान बसलं होतं. पण एकूण ' सिस्टीम अगदी चोख काम करणारी हवी' ह्या माझ्या आग्रहामुळे अधून मधून मीच एकूण कार्य पद्धतीचा आढावा घ्यायचो. चुका सापडल्या तर त्या दुरुस्त करायचो.

२००२मध्ये मी कंपनीच्या सिस्टीममध्ये काही महत्वाचे बदल करायचे ठरले. आतापर्यंत कंपनीत दोन महत्वाचे घटक असायचे. केमिस्टस आणि डिरेक्टर्स!

ह्या पैकी केमिस्टचं काम ठरलेलं होतं. पण डिरेक्टरना मात्र वेगवेगळी अनेक कामं करायला लागायची. कस्टमर्सशी बोलून त्यांनी नवीन बिझिनेस मिळवायचा. मग त्यानुसार केमिस्टना सूचना देऊन प्रॉब्लेम सोडवून घ्यायचा आणि कामाचा अंदाज घेवून कस्टमरला योग्य ते कोटेशन द्यायचं.

म्हणजे डिरेक्टर हा स्वतः शात्रज्ञ असला पाहिजे, चांगला मॅनेजर असला पाहिजे, त्याला सुसंवाद साधता आला पाहिजे. आणि त्याला फायनान्स ही सांभाळता आला पाहिजे. असे सर्वगुणसंपन्न डिरेकटर्स मिळणं. ही अत्यंत कठीण गोष्ट होती. अशी गुणी माणसं मिळाली, तरी कामाचं अष्टावधान राखताना त्यांची त्रेधा तिरपीट उडायची आणि मुख्य म्हणजे त्यांच्याकडे कामं तुंबून राहायची. डिरेक्टर म्हणजे 'बॉटलनेक ' असं समीकरणं व्हयला लागलं.

मी ह्यावर एक साधा सरळ तोडगा काढला. डिरेक्टर आणि केमिस्टसऐवजी मी तीन नवीनच पदं तयार केली.

पहिलं पद होतं, ' कोटर्स' ह्या  कोटर्सनि कस्टमर्सचे  फोन घ्यायचे. त्यांचे प्रॉब्लेम्स समजावून घ्यायचे आणि त्यानुसार त्यांना किंमत सांगायची. म्हणून ते कोटर्स

दुसरी मंडळी होती, ओनर्स. ह्या लोकांनी आलेला प्रॉब्लेम हा स्वतःचा आहे असं समजून वागायचं. म्हणजे कस्टमर्सशी बोलायचं आणि केमिस्टला प्रॉब्लेम समजून द्यायचा.

तिसरे लोक खरं म्हणजे केमिस्टस होते, पण ते बीएस्सी असोत किंवा पी एच डी, त्या सगळयांना मी नाव दिलं, सॉल्व्हर्स! ह्यांनी प्रयोगशाळेत काम करायचं आणि दिलेला प्रॉब्लेम सोडवायचा.

ओनर्स आणि सॉल्व्हर्स ह्यांना मी सांगितलं की ' तुमच्याकडून प्रॉब्लेम जितका लवकर सुटेल, तितक्या प्रमाणात तुम्हाला जास्त पैसे मिळतील.

ही नवी व्यवस्था जेव्हा अमलात आली, तेव्हा पहिल्यांदा कंपनीतल्या लोकांनी जरा नाकं मुरडली. म्हणाले, " छे, काहीतरीच आहे, हा प्रकार!"

लोकांना बदल नको असतो. पण मी ठाम राहिलो आणि काही महिन्यात लोकांनाही पटलं की ही व्यवस्था जास्त चांगली आहे. ह्या मुळे कोणा एकच व्यक्तीवर कामाचा अति ताण येत नाही आणि लवकर, तसंच चांगलं काम केलं, तर पैसे जास्त मिळतात.

आता कोणी विचारेल,

" जर कंपनीची सगळी कामं, या लोकांकडून मी करवून घेतो, तर मग मी काय काम करतो? "

माझं पदं आहे केमिर ह्या ग्रुपचा सीईओ, चीफ एक्झीकेटीव ऑफिसर किंवा सर्वेसर्वा.

पण मी स्वतःला म्हणतो कंपनीचा कन्सलटन्ट आणि ह्याच भूमिकेतून काम करतो. केमिरचा पसारा आज अमेरिकेतल्या चार प्रांतात, चार ठिकाणी पसरलेला आहे. पेनसील्व्हानिया, फ्लोरिडा, मिनिआपोलिस आणि सेंट लुइस.

सर्व ठिकाणी सर्व बाबतीत लक्ष देणं मला शक्य नाही, तेव्हा मी सेंट लुईस इथल्या केमिरच्या मुख्य कार्यालयातून माझं काम पाहतो.

' प्रत्येक ठिकाणी दररोजच्या कारभारात काय समस्या आहेत?

कंपनीकडे कोणती नवी प्रोजेक्ट्स आहेत?

कोणाची कुठली डेड लाईन आहे?

महत्वाचे कस्टमर्स कोण आहेत?

कुठल्या ठिकाणचा कुठला माणूस दोन तास लवकर गेला? "

असली कुठलीही गोष्ट मी पाहत नाही. ही गोष्ट माझ्यापर्यंत येतही नाही.

माझं काम एकच, आकडेवारी तपासणं, मी तेवढंच करतो, आकडेवारीमुळे बिझीनेसची नाडी कळते.

अधून मधून मी माझ्या मूळ भूमिकेला शोभेलसं सॅंपलिंग करतो, म्हणजे मी कंपनीतल्या वेगवेगळ्या लोकांशी बोलतो. गप्पा मारताना मला अनेक गोष्टी कळतात. म्हणजे समजा, कंपनीत हा एक नवीन माणूस भरती झाला आहे, बॉब! तर कधी तरी बोलताना माझ्या कानावर येत, ' बॉब काही बरोबर काम करीत नाहीये. '

मी त्या क्षणाला काहीच करत नाही. थोड्या दिवसांनी मी सहजच बोलल्यासारखा, बॉबच्या बॉसला विचारतो, " हा नवीन आलेला बॉब कसा आहे रे? ठीक आहे का? "

बॉस म्हणतो, " हो, ठीक आहे. "

मी विचारतो, " काम नीट करतो ना? "

बॉस चं उत्तर " हो नीट करतो. "

मी निघून जातो.

आणखी पंधरा दिवसांनी बॉबचा बॉस मला भेटायला येतो. मला सांगतो,

" मला असं वाटतंय, बॉबचा काहीतरी प्रॉब्लेम आहे हं. "

मी आश्चर्य चकित झाल्यासारखा विचारतो, " हो? तुला कसं कळलं? "

बॉस म्हणतो, " माझं लक्ष असतं ना! बॉबची कस्टमर सर्व्हिस चांगली नाहिये. "

मी म्हणतो, " बरं झालं, तुझ्या लक्षात आलं. आता काय करायचं ते तूच ठरव. "

बॉस जबाबदारीच्या जाणीवेनं खुश होतो.

आणखी पंधरा दिवस जातात, बॉबचा बॉस परत एकदा येतो, म्हणतो,

" बॉबचं कामं अगदीच वाईट  आहे, कस्टमर्स तक्रार करतायत. "

मी म्हणतो, " अरे बापरे, हे फारच वाईट आहे, पण मग तू काय करायचं ठरवलं आहेस? "

बॉबचा बॉस निर्णायक सुरात म्हणतो, " बॉबला काढून टाकू या. "

मी मान डोलावतो.

बॉबचा बॉस आता त्याच्या हाताखालच्या लोकांकडे थोडं अधिक बारकाईनं लक्ष पुरवेल, हे मला कळलेलं असतं.

आपण मराठी माणसं म्हणतो, त्याने नोकरी ' धरली' आणि तो बिझिनेसमध्ये ' पडला'.

पाहिलंत? आपण शब्दच असे वापरतो की बिझिनेसबद्दलची आपल्या मनातली भीती, नकळत आपल्या भाषेत उमटते,

माझ्या सुदैवाने मी नोकरी धरली, तसाच बिझिनेसही धरला, आणि आज चौदा वर्ष, घट्ट धरून ठेवला आहे.

आज अमेरिकेतल्या भारतीयांच्या शंभर टॉप कंपन्यांमध्ये केमिर हे नाव आहे. वेळोवेळी केमिरला उत्तम प्रगतीबद्दल, बक्षीसं आणि सन्मान चिन्हं मिळाली आहेत. १९९९ सालात सेंट लुईस परिसरातला, सर्व्हिस कंपनी विभागातला, सर्वोत्कृष्ट उद्योजक, म्हणून माझं जाहीर कौतुक झालं आहे. इथल्या वर्तमान पत्रातून वेळोवेळी केमिरबद्दल आणि माझ्याबद्दल बातम्या आणि लेख छापून आले आहेत.

हे एवढ्यासाठीच सांगितलं की मी यशस्वी उद्योजक आहे, ह्याचं व्हायचं तेवढं कोड कौतुक झालेलं आहे. आता थोडा वेगळा विचार करायची वेळ आली आहे. असं म्हटलं जात की " बिझीनेसमध्ये थांबून चालत नाही, तुम्ही एकदा थांबलात की संपलात, " मला तसं वाटत नाही. मध्यंतरी दोन वर्ष मी जेव्हा थांबलो होतो, तेव्हा माझा बिझिनेस दामदुपटीने वाढला. त्यानंतर परत एकदा लक्ष घालून, मी तो आणखी मोठा केला. आता मात्र असं वाटतं, की क्षणभर थांबावं आणि नक्की ठरवावं.

" आपल्या आयुष्यात महत्व कशाला आहे? "

" बिझिनेस आणि पैसा, ह्याच चक्रात अडकून पडायचं? ' की?

स्वार्थ आणि परमार्थ दोन्ही साधण्याचा प्रयत्न करायचा?

आता माझी एकूण लाईफ स्टाइल सुखाची आहे, या पुढे बिझिनेस दसपटीने वाढला, म्हणून त्यात फारसा फरक पडणार नाहीये. मग ही दगदग कशाला?

प्रश्न उभे राहिले, की उत्तरं शोधावी लागतात, आपल्या आयुष्यात कुठल्या गोष्टीना महत्व आहे, हे मी तपासून पाहिलं. तेव्हा बिझिनेस व्यतिरिक्त बाकीचेही बरेच मुद्दे सापडले.

१) कुटुंब सर्वात महत्वाचं. नील आता सोळा वर्षाचा आहे. समीर बारा वर्षाचा. त्यांना आता माझी गरज आहे. त्यांचं आणि माझं नातं जन्मभर टिकायला हवं असेल, तर ह्या नात्याला आज खतपाणी घालायलाच हवं.

२) शशीचं आणि माझं नातंही खूप महत्वाचं आहे, उद्या आम्हीच एकमेकांना असणार आहोतं. ह्या नात्यामधला रोमान्स, प्रेम आपलेपणा जपण्यासाठी मला आज वेळ द्यायला हवा.

३) इन्नी, बहिणी, मित्र इतर काही जवळची माणसं ह्यांनीही मला भरभरून दिलं आहे. माझ्यावर त्यांचा अधिकार आहे.

४) आणि शेवटी आपण जिथून इथे आलो, तो आपला देश, आपला महाराष्ट्र! त्याचेही आपण ऋणी आहोतं. हे ऋण फेडायला नको?

बिझिनेस दुप्पट तिप्पट करण्यात सर्व वेळ घातला, तर हे सर्व राहूनच जाईल.

शेवटी आपण बिझीनेसचे मालक आहोतं? की बिझिनेस आपला मालक आहे?

प्रश्नाची उत्तरं शोधायला गेलो, तरी शेवटी काही प्रश्न उरलेच. सुदैवाने परत एकदा डॅन सुलेव्हान मदतीला धावून आला आणि मी ठरवलं, आपण बिझीनेसचे मालक आहोत. मग सर्वच सोपं झालं. कुटुंबासाठी तर मी वेळ काढत होतोच. पण आपल्या मराठीपणासाठीही वेळात वेळ काढायला लागलो. पहिल्यांदा सेंट लुईसमध्ये मराठी मंडळाची स्थापना केली. नंतर अमेरिकेच्या बृहन महाराष्ट्र मंडळात सेंट लुईसचा प्रातिनिधी

म्हणून सामील झालो. पुढची पायरी एक्झीक्युटिव्ह  कमिटीचा मेंबर म्हणून कामं करण्याची आणि मग २००३ साली न्यूयॉर्कच्या मॅडीसन स्क्वेअर गार्डनमध्ये भरलेल्या अधिवेशनात मी बृहन महाराष्ट्र मंडळाचा अध्यक्ष झालो.

समोरच्या पाच हजार प्रेक्षकांमध्ये शशी, नील आणि समीर तर होतेच. पण इन्नी आणि वीणाही मुद्दाम बेळगावहून आल्या होत्या.

माझ्या भाषणात मी सुरुवातीलाच सांगितलं, " मी बेळगावचा असल्याने लोक मला कानडी समजतात, पण मी मात्र स्वतःला महाराष्ट्राचा आणि मराठी मानतो. "

प्रमुख पाहुणे, श्री. मनोहर जोशी पटकन म्हणले, ' बेळगावही महाराष्ट्राचाच की हो!"

कोण कुठला? कोण कोणाचा? हे राजकीय वाद रंगत राहतील. माझ्या पुरता " मी कोण' हा प्रश्न मी सोडवलेला आहे.

अमेरिकेतील बृहन महाराष्ट्र मंडळ, किंवा बी एम एम ही संस्था, अमेरिकेतल्या आणि कॅनडा मधल्या सर्व मराठी लोकांना एकत्र आणते. अमेरिकेतल्या मराठी माणसांचा आणि त्यांच्या पुढच्या पिढ्यांचा मराठी बाणा टिकावा, म्हणून ही संस्था खूप कामं करते. आपला सांस्कृतिक वारसा अमेरिकेत जपण्याबरोबरच, महाराष्ट्रातही  काही उत्तम सेवाभावी प्रकल्प राबविते. संस्थेचा अध्यक्ष ह्या नात्याने काही चांगलं कामं करण्याची संधी मला मिळालेली आहे. अध्यक्ष असताना आणि अध्यक्ष नसतानाही मी महाराष्ट्राशी असलेलं माझं नातं. अधिकाधिक जवळचं करीन, एवढं नक्की!

मी राजकीय पुढारी नसल्याने, उगीचच हे करीन ते करीन अशी टिमकी वाजवण्याची मला सवय नाही. त्यापेक्षा मी ह्या बाबतीत काय केलं आहे, तेच सांगतो, माझ्या बिझिनेस मधीलच एक युक्ती मी माझ्यासाठी वापरतो. ती म्हणजे ' सॅंपलिंग!

म्हणजे दर महिन्याला मीच माझी परीक्षा घेतो. एखादे कडक मास्तर जसे विद्यार्थ्यांच्या उत्तर पत्रिका अगदी कंजूषपणे तपासतील, तसाच मी स्वतःला तपासतो, आणि प्रत्येक विषयाला मार्क्स देतो. विषय नऊ आहेत आणि मार्क्स शून्यापासून चारपर्यंत दिले जातात.

ही निकाल पत्रिका समोर ठेवली की महिन्याभरात मी कुठल्या विषयात किती कच्चा किंवा पक्का राहिलो ते लगेच कळत.

उदाहरणार्थ - ही एक निकाल पत्रिका पहा.

विद्यार्थ्याचे नाव - श्री, ठाणेदार

महिना - ऑक्टोबर

वर्ष - २००४

| विषय | ग्रेड्स (० ते ४पर्यंत ) |
|---|---|
| १) बिझिनेस | ४ |
| २) फायनान्स | ४ |
| ३) शशी | २ |
| ४) नील | २ |
| ५) समीर | १ |
| ६) कौटुंबिक जबाबदारी | १ |
| ७) तब्येत | १ |
| ८) मौज मजा | ० |
| ९) सामाजिक ऋण | २ |

माझी ही निकाल पत्रिका पाहून समीर म्हणतो,

" डॅड, तू माझ्या विषयात स्वतःला इतके कमी मार्क्स का दिले आहेस? माझी तुझ्याविषयी काही तक्रार नाहीये. "

मी म्हणतो, " पण माझी आहे, माझ्या परीक्षेत पास होण्यासाठी मला सर्वच विषयात चांगली ग्रेड मिळाली पाहिजे. कारण मला " गेले द्यायचे राहून!" असं म्हणायला आवडणार नाही. माझं " नक्षत्रांचे देणे" मला फेडायचं आहे. वेळेवर. ! आणि ती वेळ हीच आहे. "

## २००८ साली ... मागे वळून पहाताना.

“ही 'श्री'ची इच्छा!” २००५ मध्ये प्रसिद्ध झालं. त्यानंतर असंख्य वाचकांची पत्रं, फ़ोन, इ मेल्स आल्या. प्रतिक्रिया अनेक प्रकारच्या होत्या.

माझं पुस्तक वाचल्यानंतर बऱ्याचणांना त्यांच्या आयुष्यातल्या प्रश्नांची उत्तरं मिळाली, काहींचं नैराश्य दूर झालं, काहींना नव्यानं जगण्याचं बळ मिळालं.

ही पत्रं भारावून टाकणारी होती. आपल्या अनुभवांमुळे कोणालातरी मार्ग सापडला. ह्या भावनेनं खूप बरं वाटलं.

बरेचदा वाचकांनी कुतूहलानं काही प्रश्न विचारले.

'इन्नी आता कुठे असते?'

'नील आणि समीर आता केवढे आहेत?'

'तुमच्या बिझीनेसमध्ये नवीन काय घडतंय?'

वगैरे वगैरे वगैरे!

ह्या आणि अशा बऱ्याच प्रश्नांची उत्तरं देण्यासाठी हे नवीन लेखन...

## 'सांगण्यासारखं आणखी काही'

2005 चा सप्टेंबर महिना. सेंट लुईसला, मी, शशी आणि मुलं नुकतेच नव्या घरात राहायला गेलो होतो.

ह्या आधी अनेक घरं झाली, पण हे घर म्हणजे माझं स्वप्न होतं. अठराहजार चौरस फ़ुटांच्या ह्या घरातल्या प्रत्येक कानाकोपऱ्याचा मी विचार केला होता. आजूबाजूची मोकळी

जागा, स्वीमिंग पूल, तळघरात कार्यक्रमासाठी बांधून घेतलेला हॉल आणि स्टेज अशी प्रत्येक गोष्ट माझ्या देखरेखीखाली तयार झाली होती.

इन्नीनं हे घर बघावं अशी माझी इच्छा! आणि अर्थातच इन्नी आली. घर मोठ्ठं होतं किंवा खूप सुंदर होतं म्हणून नव्हे तर हे घर माझ्या मुलाचं आहे, ह्याचा तिला आनंद झाला, अभिमान वाटला.

दोन महिने ती इथे अमेरिकेत अगदी मजेत राहिली. तिच्या स्वभावाप्रमाणे मुलाचं, सुनेचं, नातवंडांचं खूप कौतुक केलं. सर्वांना भरभरून प्रेम दिलं आणि मग दोन महिन्यांनी परत गेली.

मग पंधरा जानेवारी २००६ ची गोष्ट ! मला बेळगावहून फोन आला.

" इन्नीला बरं नाहीये. तिला हॉस्पिटल मध्ये हलवलं आहे. तू ताबडतोब ये."

मी काही विचारण्याआधीच फोन ठेवला गेला. मीही परत फोन करून प्रश्न विचारण्यात वेळ घालवला नाही. मिळाली ती पहिली फ्लाईट पकडून मी भारतात यायला निघालो.

का कोणास ठाऊक? पूर्ण प्रवासात मी बेचैन होतो. घरापाशी पोचलो आणि दारात इन्नी उभी नाही, हे लक्षात आलं. माझं पाऊल जड झालं. मी तिथेच थबकलो.

ह्या आधी असंख्य वेळा मी अमेरिकेहून आलो, त्या प्रत्येक वेळी ती हसतमुखाने दारात उभी असायची. मी येणार म्हणून तिनं घरात माझ्या आवडीचे दहा पदार्थ बनवलेले असायचे.

हातातली बॅग खाली टाकून मी धावत घरात शिरलो आणि मला ती दिसली. ही माझी इन्नी नव्हती. हे होतं, आडवं ठेवलेलं तिचं अचेतन जड शरीर.

मी तिच्या शेजारी बसलो, तिचा हात हातात घेतला आणि मला अश्रू आवरेनात. जिवलग व्यक्तीचा मृत्यू पाहण्याची ही माझी पहिली वेळ नव्हती.

तरीही आई जाते, तेव्हा मुलाला खरं पोरकं करून जाते. ह्या पुढे आपल्या डोक्यावर मायेच छत्र उरलं नाही, ही जाणीव फार भयंकर असते.

सगळे विधी यथासांग पार पडले. थोडा निवांतपणा मिळाला तेव्हा मी इन्नीच्या जाण्याचा त्रयस्थ पणे विचार करू शकलो.

इन्नी नेहमी म्हणायची,' मी कधी आजारी होऊन अंथरुणावर खितपत पडणार नाही. देवानं मला चांगली चालती बोलती असतानाच उचलून न्यावं."

आणि खरंच ! इन्नी देवाची इतकी आवडती असणार कि त्यानं तिचं म्हणणं ऐकलं.

बाकीच्या माणसांकडून मला नंतर कळलं कि शेवटच्या दिवसापर्यंत इन्नीचं मजेत होती.

जाण्याआधी बरेच दिवसांपूर्वी ती एकदा नंदाला (माझ्या सावत्र बहिणीला) भेटायला गेली.

ही नंदा लहान असताना इन्नीशी खूप भांडायची. सावत्र आई म्हणजे ती वाईटच असणार अशा बालबुद्धीचं तिचं वागणं, पण इन्नीनं तिला समजून घेतलं. इतकंच नाही तर आपल्या वागण्यानं तिनं नंदाला जिंकून घेतलं.

ह्या वेळी इन्नी नंदाला भेटली. कारण नंदाला खूप बरं नव्हतं. इन्नीने तिची मायेनं विचारपूस केली आणि मग म्हणाली

" नंदा, अगं, माझ्याकडे ये, थोडे दिवस माहेरपणाला, मी तुझं सगळं छान करीन, बरं वाटलं कि मगच परत जा."

नंदा खरंच इन्नीकडे राहायला आली. सत्त्याहत्तर वर्षाच्या इन्नीनं , आपल्या ह्या साठ वर्षाच्या मुलीची मनापासून सेवा केली.

इन्नी गेली तेव्हा नंदा तिथेच होती. इतकंच नाही तर इन्नीनं आपल्या एका लाडक्या नातवाला जेवायला बोलावलं होतं. त्याच्या जोडीला चार जवळचे नातेवाईक .

स्वतः खपून इन्नीनं श्रीखंड पुरीचं जेवण केलं. पाहुणे तृप्त होऊन घरी यायला निघणार तेवढ्यात इन्नीला जोराचा हार्ट अटॅक आला.

घरातल्या कोणीतरी मला फोन केला. कोणीतरी ॲम्बुलन्स बोलावली. इन्नीला हॉस्पिटल मध्ये घेऊन गेले. पण काही उपयोग झालं नाही.

इन्नी नाही म्हणून आजही मनाचा एक कोपरा हळवा होतो. परत वाटतं, मी असा दुःख करत बसलेला तिला नाही आवडणार.

इन्नीनं मला हसत जगायला शिकवलं. कठीण काळात उठून उभं राहायचं बळही तिनंच मला दिलं. आज ती नसली, तरी तिनं दिलेली शिदोरी माझ्यापाशी आहे आणि ती मला जन्मभर पुरणार आहे.

आता नील विषयी थोडंसं. नील ह्या वर्षी वीस वर्षाचा होईल हे मला खरंच वाटत नाही. आजही जुने दिवस माझ्या डोळ्यासमोर येतात.

८८ साली नील जन्मला. त्या नंतर श्यामलला हॉस्पिटल मध्ये बारा बारा तासांची ड्यूटी करायला लागायची. तेव्हा नीलला खाणं पिणं, दुधाची बाटली देण्यापासून त्याचं डायपर बदलण्यापर्यंत प्रत्येक गोष्ट मी केली. आवडीने, प्रेमाने!

आज तोच नील मला मित्र वाटतो. तसाच फिलोसॉफर आणि गाईडही. आम्ही दोघं कुठल्याही विषयावर मोकळेपणाने गप्पा मारतो. चर्चा करतो आणि अनेकदा अनेक बाबतीत मी त्याचा सल्लाही घेतो.

मध्यंतरी जवळ जवळ पंचवीस वर्षानंतर मी अनार्बर शहरातल्या मिशिगन युनिव्हर्सिटीच्या कॅम्पस वर गेलो. कारण नील याच युनिव्हर्सिटी मध्ये दाखल झाला आहे. मॉलेक्युलर बायालॉजी आणि बिझिनेस असे दोन विषय त्याने डिग्री साठी घेतले आहेत.

मला माझे जुने दिवस आठवले. मी जिथे शिकलो, तिथेच माझा मुलगा शिकणार ही भावना खूप समाधान देणारी. आज नीलचं वागणं बोलणं, ऐकताना, त्याचं समतोल व्यक्तिमत्व पाहताना माझं समाधान दुपटीन वाढतं.

अतिशय साधा, सरळ, मेहनती, कामसू, आणि सुविचारी असा हा मुलगा.

कसली घमेंड नाही कि बापाच्या जीवावर मिरवण्याची हौस नाही.

युनिव्हर्सिटीमध्ये गेल्यानंतर त्याला गाडी घ्यायची होती. खरं म्हणजे तो आज कुठलीही कोरी करकरीत अलिशान गाडी घेऊ शकला असता, मी ती त्याला आनंदाने घेऊन

दिली असती, पण नाही. त्यानं एक पाच वर्ष जुनी अशी साधीशी गाडी घेतली. प्रत्येक गोष्ट मी माझ्या कमाईने कमावेन, असा त्याचा विचार.

एकदा त्याने दोन-चार दिवसात फोन केला नाही म्हणून मी चौकशी करण्यासाठी त्याच्या होस्टेलला फोन केला तर म्हणाला.

" डॅडी , माझा सेल फोन बंद पडला आहे. "

मी म्हणालो,

" मी लगेच नवीन सेलफोन घेतो आणि तुला पाठवून देतो."

त्यावर तो " ठीक आहे- " म्हणाला आणि पुढे सूचना केली, " साधंसंच मॉडेल पाठवा."

मी काही त्याच्या सूचनेकडे फारसं लक्ष दिलं नाही. दुकानात जाऊन मी एका चांगल्या कंपनीचा, लेटेस्ट टेक्नॉलॉजी असलेला अत्यंत महागडा सेलफोन घेतला आणि त्याला पाठवून दिला.

मी वाट पाहत राहिलो. आता ह्याचा फोन येईल. मग येईल. त्याचा फोनच नाही. मी परत त्याची असायची वेळ साधून होस्टेलवर फोन केला.

" अरे नील तुला फोन मिळाला कि नाही?"

" डॅडी, मला फोन मिळाला. पण मी तो न वापरता पोस्टानं परत पाठवला आहे. तो तुम्ही परत करा.

" का रे, ? तुला आवडलं नाही का मॉडेल?"

"आवडण्याचा प्रश्न नाही. इट वॉज टू गुड ! पण मला इतक्या महागड्या फोनची गरज नाही. ज्याच्यावरून मी फोन करू शकतो आणि फोन घेऊ शकतो असं एखादं साधं मॉडेल पाठवा."

मी अवाक! मला कळून चुकलं कि मुलाकडून काही शिकण्यासारखी वेळ येते. तेव्हा बापानं ते प्रामाणिकपणे कबुल करावं आणि स्वतःला भाग्यवान मानावं.

अभ्यासाव्यतिरिक्त नीलला इतरही अनेक ॲक्टिव्हिटीज मध्ये रस आहे. फुटबॉल आणि रेसलिंग ह्या खेळांमध्ये तो भाग घेतो आणि विशेष सांगायचा म्हणजे डेट्रॉइट पार्टनरशीप ह्या संस्थेचा लीडर म्हणून समाजकार्यही करतो.

हि संस्था गरीब मुलांना किवा ड्रग ॲडिक्टना मदत करते. त्यांचं आयुष्य सुधारावं म्हणून नील आणि त्याच्यासारखी कितीतरी मुलं आपला बहुमुल्य वेळ देतात. समाजाचं ऋण ही मुलं आपल्या परीनं फेडतात.

श्यामल गेली तेव्हा 'वाईट स्वप्नं पडतात' म्हणून झोपेतून रडत उठणारा नील आज इतरांसाठी आधाराचा हात पुढे करतो. एका बापाला अभिमानानं मिरवण्यासाठी ह्याहून आणखी काय पाहिजे?

समीर आता दहावीत आहे. दोघा भावांचं एकमेकांवर जीवापाड प्रेम आहे. इतकं की नील युनिव्हर्सिटीत राहायला गेला तेव्हा आमच्यापेक्षाही समीर जास्त अस्वथ झाला.

'आता आपला भाऊ आपल्या सोबतीला घरात नसणार आहे, ' हे सत्य पचवायला त्याला बरेच दिवस लागले.

नीलपेक्षा तो जरा जास्त हळवा आहे. पण माझी खात्री आहे, तोही पुढे भावासारखा खंबीर बनेल आणि आमचा छोटा दोस्त!

आता लास्ट बट नॉट लिस्ट . असं म्हणण्यासारखी शशी.

रुळावरून खाली पडलेली, माझ्या संसाराची मोडकी गाडी रुळावर चढवण्याचं खूप कठीण काम तिनं केलं.

आज मागे वळून पाहताना मला वाटतं. शशीशी लग्न करायचा निर्णय घ्यायला मी थोडा वेळ लावला पण माझ्या आयुष्यातला तो सर्वात योग्य निर्णय होता.

आज शशी आहे म्हणून आमचं घर आहे. इथे आल्यानंतर तिनं मलाच नव्हे तर मुलांनाही आपलं म्हटलं. अगदी मनापासून! इतकी कि आज समीरला त्याची आई आठवत नाही. नीलला श्यामलची आठवण आहे पण आज शशी ही त्याला त्याच्या आई इतकीच जवळची वाटते.

मुंबईत असताना शशी होती एक मध्यम वर्गीय, नोकरी करणारी मुलगी. एके दिवशी ती अमेरिकेत येऊन पोचली. ज्या सहजतेने ती मुंबईला ट्रेन मधून प्रवास करत होती, त्याच सहजतेने तिनं अमेरिकन आयुष्याचा स्वीकार केला.

अमेरिकेच्या चकचकटात ती दिपली नाही कि इथल्या श्रीमंत वातावरणानं ती अहंकारी बनली नाही. आज इतक्या वर्ष नंतर शशीचा स्वभाव तसाच आहे, साधा सरळ आणि चांगुलपणा जपणारा.

इथे ड्रायव्हिंग करण्यापासून, अमेरिकन समाजात मिसळून समाजकार्य करण्यापासून ते घरी आलेल्या देशी विदेशी पाहुण्यांची सरबराई करण्यापर्यंत प्रत्येक गोष्ट तिने सहजपणे जमवली.

तिच्या वागण्यात दिखाऊपणा नाही. कृत्रिमता नाही कि श्रीमंतीची ऐट नाही. माझ्या घरी येणारा प्रत्येक पाहुणा तिचं कौतुक केल्याशिवाय घराबाहेर पडत नाही. ती हसून कौतुक स्वीकारते. मी मात्र कॉलर ताठ करतो.

माझ्यावर शंभर टक्के विश्वास ठेऊन ती इथे आली. आजही तिचा माझ्यावर तितकाच विश्वास आहे. आज आमचं चौघांचं एक सुखी समाधानी कुटुंब आहे. ह्या गोष्टीचं मोठं श्रेय मी तिला देतो.

इथे आल्यानंतर शशीला मुंबईला राहणाऱ्या वृद्ध आई वडिलांची खूप काळजी वाटायची. मुंबईत त्यांना तिचा आधार होता. आता ते कसे असतील ह्या विचारानं ती अस्वस्थ व्हायची.

शशी सेंट लुइसला आली आणि दोनच महिन्यात तिचे वडील वारले. शशीकडे माझी 'नियोजित वधू' (फियान्से ) हा व्हिसा असल्यामुळे ती परत जाऊ शकत नव्हती. गेली असती तर तिला इथे परत यायला त्रास झाला असता. त्यामुळे मनाचा कोंडमारा करून तिला इथे रहावं लागलं.

तिच्या मनाची घालमेल मला कळत होती. पण व्हिसाची कायदेशीर अडचण दूर करणं कोणाच्याच हातात नव्हतं.

बऱ्याच दिवसांनी तिला माझी बायको म्हणून तिला अधिकृत व्हिसा मिळाला आणि ती मुंबईला येऊ शकली.

मग तिनं आपल्या आईला काही दिवसांसाठी अमेरिकेत आणायचं ठरवलं. तर तिथेही दुर्दैव आड आलं. तिच्या अंध आईला व्हिसा नाकारण्यात आला.

मी त्यांना दिलासा दिला आणि माझं उदाहरण सांगितलं. काही दिवसांनी नव्यानं अर्ज भरून परत एकदा मुलाखतीसाठी जायची वेळ आली, तेव्हा मी त्यांच्या बरोबर गेलो. अंध-अपंग वृद्ध स्त्री म्हणून त्यांना मला सोबत आणण्याची सवलत दिली गेली. मी व्हिसा अधिकाऱ्यांशी बोललो आणि त्यांना व्हिसा मिळाला.

त्यांना नेण्यासाठी शशी मुंबईला आली आणि आपल्या आजारी अंध आईला अक्षरशः स्वतःच्या मांडीवर झोपवून तिनं प्रवास केला.

शशीच्या आईना आमच्या घरी खूप बरं वाटलं. दिसत नसलं, तरी इथे त्या घरात मोकळेपणी हिंडायच्या. आमच्याबरोबर बाहेर यायच्या. जावयाचा आणि मुलीचा पाहुणचार घेऊन त्या आनंदाने मुंबईला परत आल्या.

आज त्याही हयात नाहीत. पण आई आपल्या घरी येऊन गेली हे समाधान असल्याने शशीला थोडं हलकं वाटत आहे.

आता माझ्या बिझिनेसची खबरबात. सुरुवातीला केवळ एकच कामगार असलेल्या माझ्या छोट्याश्या कंपनीचा आज मोठा विस्तार झाला आहे. केमिर ग्रुप मध्ये आता एकूण नऊ कंपन्या आहेत.

केमिरचं पहिल्यापासून चालत आलेलं डिटेक्टिव्हगिरीचं काम ह्यापैकी दोन कंपन्या करतात. उरलेल्या सात मी आजारी कंपन्या म्हणून विकत घेतल्या. नंतर त्यांची तब्बेत सुधारली आणि आता त्या नफाही मिळवायला लागल्या.

त्या मुळे बरेचदा गमतीने मला आजारी कंपन्यांचा डॉक्टर असं म्हटलं जातं. नवीन घेतलेल्या ह्या सात कंपन्या रिसर्च आणि डेव्हलपमेंटचं काम करतात.

मोठ्या मोठ्या औषधी कंपन्यांना नवीन औषध तयार करण्यासाठी संशोधन करावं लागतं. हे काम त्या ' केमिर' कडे सोपवतात.

आज ' केमिर' मध्ये एकूण चारशे माणसांचा स्टाफ आहे . त्या पैकी ८० टक्के हे डॉक्टरेट ह्या सर्वोच्च पदवीने विभूषित आहेत. आज केमिर ग्रुपची उलाढाल आहे अडूसष्ट

मिलिअन डॉलर्स. www.chemir.com ह्या आमच्या वेबसाईटवर केमिरची सविस्तर माहिती उपलब्ध आहे.

आज माझ्या उद्योगाचा पसारा मोठा झाला असला. तरी माझा गुरु डॅन सुलेव्हान ह्याचं तत्व मी विसरलेलो नाही.

कंपन्यांच्या दररोजच्या व्यवहारात मी लक्ष घालत नाही. त्यासाठी उच्चविद्याविभूषित आणि कार्यतत्पर असे मॅनेजर्स नेमलेले आहेत.

नवीन कंपनी घेताना मात्र मी स्वतः लक्ष घालतो, विचार करतो आणि वेळही देतो.

त्यामुळे एका उद्योग समूहाचा प्रमुख असलो, तरी मी माझ्या आवडीच्या अनेक गोष्टी करू शकतो. कुटुंबासाठीही वेळ देतो. केवळ अधिक मोठा बिझिनेस, अधिक पैसा ह्यात मी गुंतून पडलेलो नाही.

येत्या दोन वर्षात समीरही युनिव्हर्सिटीमध्ये जाईल. मग घरात फक्त शशी आणि मी!

त्या वेळी जास्तीत जास्त वेळ भारतात घालविण्याचा माझा बेत आहे. भारतातल्या न चालणाऱ्या औषध कंपन्या विकत घ्यायच्या आणि चालवायच्या हे एक काम आहे.

त्या शिवाय बिझिनेस इंक्युबेर सारखी नाविन्यपूर्ण कल्पना राबवायचा विचार आहे. ह्या साठी जास्तीत जास्त तरुणांचं मनोगत जाणून घ्यायचं, त्यांच्याशी विचार विनिमय करायचा आणि जे कोणी उद्योग धंदा सुरु करणार असतील त्यांना मार्गदर्शन आणि मदत करायची, असं म्हणतो आहे.

भारतातील मराठी तरुणांना माझ्या अनुभवाचा फायदा झाला तर मला खूप आनंद होईल.

आता पर्यंत मी बरीच स्वप्नं पाहिली आणि ती पूर्ण केली. तेव्हा हे स्वप्नही नक्की पूर्ण होईल अशी खात्री आहे.

# वाचकांच्या प्रतिक्रिया

**हे पुस्तक खूप आवडले. एका बैठकीत वाचून काढले.**

**रश्मी उध्दव ठाकरे, मुंबई.**

This book is simply superb! It has given me great vision. I don't have words to say thank you for writing such book.... such a great inspiration to us... Thanks ' LOT LOT LOT ! waiting for some more books.

Prajakta Mahajan, Mumbai.

I read your book in one sitting. Your positive attitude is Contagious.

Smita Ashtekar, Belgaum.

आयुष्यात मीपण खूप कठीण प्रसंगातून गेलो. तुमचे अनुभव वाचले आणि खूप धीर आला. प्रामाणिकपणे आपण आयुष्यावर लिहिलेत म्हणून खूप आभार.

केदार मोघे, New York , USA

या वर्षीचे सर्वात उत्तम पुस्तक म्हणजे " ही श्री ' ची इच्छा "

प्रशांत राऊत, जळगाव, महाराष्ट्र.

तुमच्या पुस्तकामधून मी खूप काही शिकलो. प्रयत्नांती परमेश्वर! या पुस्तकामुळे मला माझ्या आयुष्यातले बरेच निर्णय घेण्यास मदत झाली. धन्यवाद.

सिद्धार्थ जांभूरनकर , UDCT , Mumbai .

" He Shrichi Ichaa is one of my most favourite books.

Anagha Sawant , Rolla, Missouri, USA

तुमचे पुस्तक एका रात्रीत वाचून काढले, आता परत नव्या उत्साहाने माझ्या ध्येयाकडे वाटचाल करेन, माझ्यासारख्या हजारो मराठी तरुणांना मार्गदर्शन केल्या बद्दल आभार.

अजय पाटील, सांगली.

हे पुस्तक म्हणजे मास्टर पीस आहे. त्यावर सिनेमा जरूर करावा,

D .K . Raakh , Nashik .

I have read a lot of motivational books, but' hee shrichi Ichha' had a greater impact on me because I could identify with your life experiences your book helped me in my entrepreneurial aspiration, and plans to become self-employed.

Shomit mansapure , Missouri, USA

Your zest for life was apparent in the book. It should inspire Indians abroad to seek meaning of life beyond money and material blongings and help their motherland.

Prakash Kulkarni, Paris, France.

Your book is a guide to understand how to overcome difficulties in life.

Rachana Sampath, Dharwad, India.

तुम्ही खूप प्रामाणिकपणे स्वतःच्या आयुष्या बद्दल लिहिले आहे, पुस्तक कायम लक्षात राहील.

प्रिय महेंद्रकर, बदलापूर, महाराष्ट्र.

पुस्तक हाती आल्यावर वाचायला सुरुवात केली आणि एकदम पूर्ण वाचूनच खाली ठेवलं. अतिशय सोप्या भाषेतील हे पुस्तक अमेरिकेतील मराठी माणसाला भावते. त्यांच्या आयुष्यातील अति आनंदाचे क्षण आणि दुःखाचे डोंगर कसे पार केले त्याची ही कहाणी. त्यातून दिसते ती श्रीनिवास ठाणेदार यांची दुर्दम्य जिद्द आणि जबरदस्त महत्वाकांक्षा.

अलका महेंद्रकर, अटलांटा, USA .

आपणास आपली स्वतःची गोष्ट ज्या निष्ठेने लिहावीशी वाटली त्यातच तुमच्या मनाचा प्रांजळपणा दिसून येतो. एकंदरीत तुमची साहित्य रचना थेट हृदयाशी संवाद साधते.

धनराज वंजारी

Assist. Police Commissioner, Mumbai.

आत्मविश्वासाचं क्वचित कोमेजू पाहणारं चैतन्य हे पुस्तक वाचल्यावर पुन्हा झळकायला लागलं. ध्येयनिश्चितीचा नवा मार्ग सापडतो. पुस्तक वाचून आम्हाला खूप काही शिकायला मिळाला.

अनुराधा अभय राजाध्यक्ष
निर्माती, दिग्दर्शिका, अभिनेत्री, मुंबई

Your life story reminds me of the saying " The glory of the man is not in never falling, but getting up every time you fall".

Suhas, Solapur, Maharashtra.

आताच ' ही श्रीची इच्छा' वाचलं. मनापासून आवडले म्हणून हे पत्र. तुमच्या यशाचा आलेख अनेकांच्या मनात सुप्त आकांक्षा जागी करेल. मग ते स्वतः कार्यप्रवृत्त होतील आणि अनेक मराठी उद्योजक अत्माविश्वासाने कामाला लागतील. महाराष्ट्राला आज अशा आत्मचरित्रांची गरज आहे. बुद्धी आहे, सामर्थ्य आहे पण जिद्द कमी पडते. अशी अनेक तरुण मुलं समोर दिसतात. त्यांना ही ' इच्छा ' पथदर्शक ठरेल यात शंका नाही.

वीणा देव, लेखिका, पुणे

पुस्तकातील सरळ सोपी मांडणी, त्यातला पारदर्शीपणा व स्वतःचे प्रामाणिक विवेचन आवडले, लगेचच माझ्या मुलाला हे पुस्तक वाचायला दिले, सर्व तरुणांनी अवश्य वाचावे असे हे महत्वाचे पुस्तक.

डॉ. उदय निगवेकर, इचलकरंजी , महाराष्ट्र.

मी तुमचे पुस्तक वाचले आणि माझ्या नातेवाईकांना आणि मित्रांना वाचायला दिले. Your " Never say Die ' attitude is very impressive .

अमोल टिल्लू, मुंबई

आयुष्यात पहिल्यांदा एका बैठकीत वाचलेले हे पुस्तक! पुस्तकामुळे मला स्वतःला Business आणखी वाढवण्यासाठी प्रेरणा मिळाली आणि नव्या ideas मिळाल्या.

आनंद पोकळे, पुणे

माझ्या आयुष्यात खूप वाईट अनुभव आले, तुमचे पुस्तक वाचून उभारी आली, आत्मविश्वास वाढला.

S.D.Rairikar, pune

I started reading your book and could not stop until I finished. Your journey of life is really amazing.

Sunil Gandhi, Altanta, USA.

i am proud that i have gifted this book to atleast 50 and above persons

Shashi Swami

हे सर्व पुढे यावे. भारतात राजकारणी लोकांना हातात धरुन एखादा अडाणी (न शिकलेला) (कंस मुद्दाम घातला) सुध्दा अरबपति होतो पण भारतामधुन अमेरीकेत जाऊन फक्त ज्ञानाच्या शिदोरी वर आजारी उद्योग चालवुन अमेरीकेमधील कडक कायदे कानुन काटेकोरपणे पाळुन यश संपादन करणारा व अमेरीकेत जाणाऱ्या प्रत्येक भारतीयाचे तो माझा घरचाच आहे असे स्वागत करणारा, अथिति देवो भव:, स्वागत करताना हा महाराष्ट्रातील /गुजराती/तमीळी/असा भेदभाव न करणारा श्री हा मराठी आहे याचा मला अभिमान

-मंगेश गोठिवरेकर

Hello respected sir,I read ur book"hich shrichi icchha" many times since from 2008. its such very inspirable book for all of us. when I read this book,I felt very nice energetic so rightnow I thought that must to do the feedback of this amazing thing by mail.U gave us such wonderful thing so very thanks to u.

regards-ms.anuja kulkarni

मी हे पुस्तक वाचून खूप प्रभावित झालो. हे पुस्तक इतर फिलॉसॉफी व आत्मचरित्र पुस्तकांपेक्षा वेगळं आहे. तुमची इच्छा शक्ती व ' जे ठरवले ते करायचे' या जिद्दी स्वभावामुळे हे पुस्तक तरुण पिढीसाठी एक उत्तम स्फूर्तीस्थान आहे.

उमेश शेलगावकर, पुणे

Interesting & inspiring book, it should be on " Most Recommended book" list for every reader.

Shashank Bhide, pune.

पुस्तक खूप Inspiring आहे. एका मराठी माणसाचे हे यश पाहून खूप आनंद झाला. पुस्तकातून शिकण्यासारखे खूप आहे.

समिता आठवले, Akron , USA

पुस्तक खूप आवडले, अनुभव खूप महत्वाचे आहेत.

विनायक भिडे, Los Angels , USA

रात्रीचा एक वाजला आहे. पुस्तक नुकतेच संपवले. खूप प्रभावित झालो. आता वाटचाल माझ्या पुढील आयुष्याच्या यशाकडे, तुमच्या अनुभवांची शिदोरी घेऊन !

संदीप पारखी . ऑस्ट्रेलिया

ठाणेदार सर , तुम्ही माझे आदर्श आहात व तुम्हीच माझे गुरु. कष्ट करून मोठी स्वप्नं रंगविणाऱ्या साऱ्याच तरुणांना तुमचे पुस्तक उपयोगी ठरेल यात शंका नाही.

गजानन कानडे, नाशिक

तुमचे पुस्तक वाचले , मस्त आहे!!! आयुष्यात आलेल्या प्रसंगात स्वतः वर खुश राहता आलं पाहिजे. ते तुम्हाला जमले आहे व ते पुस्तकातून शिकलो.

आशिष लेले, पुणे

काहीही करणे शक्य आहे असं आत्मविश्वास तुमच्या पुस्तकामुळे वाटतो.

सौ. सरिता कात्रे, पुणे

तुमचे पुस्तक वाचून थक्क झालो. आता नव्या चैतन्याने माझ्या ध्येयाकडे वाटचाल करायला मी तयार झालो आहे. Thanks for being my idol. I will definitely succeed.

Digambar kakade, Solapur

'हि 'श्री ची इच्छा' वाचून प्रभावित झालो व इतरांसाठी काही करावे या भावनेने समाजकार्यांस सुरुवात केली. भारतात याल तेव्हा प्रत्यक्ष भेटण्याची खूप इच्छा आहे.

सागर मोर्खडे , नाशिक

पुस्तक लिहिल्या बद्दल आभारी आहे. याचे सर्व भाषात भाषांतर व्हावे म्हणजे भारतातील तरुणांना मार्गदर्शन होईल.

संजीव कुलकर्णी, Scientist , NIT पुणे

तुमच्या पुस्तकामुळे माझ्या मुलीला प्रेरणा मिळाली व ती पुढील शिक्षणा साठी अमेरिकेला गेली. मलासुद्धा नवे काही करण्याची उमेद आली.

सौ. जान्हवी आठवले, पुणे

सरकारी नोकरी सोडून स्वतःचा Business करण्यासाठी आत्मविश्वास तुमच्या पुस्तकामुळे मिळाला.

उदय देशपांडे, नाशिक

Many times you pulled yourself from the brink of sure disaster and came back by your willpower to succeed. This is the ‘ Mantra’ you have given to all.

Sudhir Kale, Jakarta, Indonesia.

एका बैठकीत पुस्तक वाचून काढले. खूप दिवसांनी खूप चांगले पुस्तक वाचण्याचा आनंद मिळाला. पुस्तक वाचल्यानंतर खूप आत्मविश्वास वाटला. माझे एक स्वप्न आहे ते आता मी पुरे करणारच !

योगेश धोकले, पुणे

पुस्तक फार छान आहे. सर्वांनी अवश्य वाचावे.

डॉ.धोपेश्वरकर , बेळगाव.

इच्छा शक्तीच्या जोरावर काहीही शक्य होवू शकते हे या पुस्तकामुळे जाणवते. हे पुस्तक लिहून आम्हाला मार्ग दाखवल्या बद्दल खूप आभार. माझ्या कुटुंबातील सर्वांनी हे पुस्तक वाचले.

रामचंद्र पंचभाई पुणे

The book made a lasting impression on me. It shows that if you have the desire and willingness to work hard, there is nothing that is impossible in this world.

Mohan Mahadkar, st, Louis, USA

पुस्तक वाचनीय आहे, खूप आवडले.

शाम नाडकर्णी, Chicago , USA

Book is very good and must read for all students and youngsters.

Sumeet kale, Mumabi

# २०१५ च्या ई आवृत्तीच्या निमित्ताने

माझ्या वाचक मित्र मैत्रिणींना, सप्रेम नमस्कार.

एकदा मी शशी, समीर आणि नील फ्लोरिडा च्या समुद्रकाठी फिरायला गेलो होतो. ती तारीख होती डिसेंबर ३१, २००३. म्हणजे १२ वर्षापूर्वी. बीचवर बसल्यावर आयुष्यातील काही प्रसंग आठवले. मुलांना माझ्या लहानपणीच्या गोष्टी सांगताना हे जाणवले कि पूर्व काळातल्या ढोबळ गोष्टी आठवतात, पण त्यातील बरेचसे बारकावे विसरून गेलेत. खूप वाईट वाटलं त्या जुन्या आठवणी अश्या पुसट होत चालल्यात म्हणून. या वेळी नील मला म्हणाला, डॅड, तुम्ही तुमच्या आठवणी एखाद्या वहीत लिहून का ठेवत नाही? त्या दिवशी मी माझ्या आठवणी लिहायला सुरुवात केली. त्या पुस्तक रूपाने प्रसिद्ध करायचा त्यावेळी विचार सुद्धा नव्हता.

या आठवणीच नंतर २००५ मध्ये " ही श्री ची इच्छा" नावाच्या पुस्तकातून प्रसिद्ध केल्या. त्या पुस्तकावरच्या वाचकांच्या रिस्पॉन्सने मी भारावून गेलो. कधी स्वप्नातही वाटले नव्हते कि मला एवढे वाचकांचे Appreciation मिळेल. २००८ मध्ये मी या पुस्तकात एक शेवटचा chaptar लिहिला. तिथेच पुस्तक संपले.

आज २०१४ च्या अखेरीस म्हणजे जवळ जवळ सहा वर्षात मागे वळून पाहतो तर माझ्या आयुष्यात बऱ्याच घटना घडल्या. परत टोकाचे दुःख, अपमान, आणि काही विजयाचे क्षणही! या सहा वर्षात इतक्या गोष्टी घडल्या कि त्या सर्व इथे थोडक्यात सांगणे कठीण आहे. तेव्हा सवडीने " श्री ची इच्छा " चा भाग दोन लिहावा असे ठरवले आहे. लवकरच तो दुसरा भाग आपणास सदर करीन.

एक मात्र जरूर वाटते कि खूप मोठे यश मिळाले कि आनंद होतो, फार छान वाटते पण ते काही काळापुरतेच मर्यादित असते. खरा आनंद या आपल्या ध्येयाकडे वाटचाल करतानाच्या struggle मधेच आहे. जेव्हा जेव्हा माझा मोठा पराजय झाला, आयुष्यात अपयश आले, तेव्हा नैराश्य तर आलं नाहीच पण आले ते अंगात दहा हत्तीच बळ. परिस्थितीशी झगडण्याचे.

मित्रानो दु:खाने खचून जाऊ नका. जेव्हढे हाल, अपमान होतील त्यावर फिनिक्स पक्षा सारखी मात करून राखेतून आकाशात उंच भरारी घ्या. मोठ्या आत्मविश्वासाने. स्वत:वरचा विश्वास अधिक दृढ करत. Never give up my friends, and you will succeed, and you will accomplish all your goals.

या ई आवृत्तीच्या प्रकाशनासाठी आणि तिला लक्षावधी वाचकांपर्यंत वितरित करण्यासाठी मी ई साहित्य प्रतिष्ठानचे आभार मानतो. ई आवृत्तीसाठी माझ्यासमोर अनेक मोठमोठ्या प्रकाशकांचे पर्याय होते. परंतू त्यातून मी ई साहित्य प्रतिष्ठानची निवड केली, ती त्यांचे परिश्रम, निष्ठा व तळमळ पाहून. निस्वार्थी वृत्तीने, सातत्याने चाललेल्या ई साहित्य टीमच्या कार्याला मी मनापासून गौरवतो.

जय महाराष्ट्र !!!

श्री ठाणेदार
Dr. Shri Thanedar, 2479, woodview lane
Ann Arbor Mchigan, 48108, USA.
SHRITHANEDAR@gmail.com

इ मेल द्वारे आपला अभिप्राय अवश्य द्या. मी वाट पाहीन. आपल्या अभिप्रायाची. तुमचे मोठे ध्येय काय आहे आणि ते तुम्ही कसे साकार करणार हे ही मला जाणून घ्यायचे आहे.





कथा संपत नाही.

ती अधिकाधिक तीव्र होत जाते.

श्रीला नवीन काही करायचं आहे.

क्लायमॅक्स तर अजून बाकी आहे.

श्री च्या आत्मकथेचा पुढील भाग...

लवकरच येईल

